# एक ना धड...

( विविध विनोदी साहित्य )

(182)

लेखक :

वि. आ. बुवा

मूल्य १-१२-०




बळवन्त पुस्तक भाण्डार

गिरगांव नाका, मुंबई नं. ४.

माक ४८

प्रकाशक :
त्रिं वि. परचुरे
बलवत पुस्तक भाण्डार
मुबई ४




*

मुद्रक :
य. गो. जोशी, बी ए.
आनद मुद्रणालय
१९६।४६ सदाशिव
पुणे २

*

मुखपृष्ठ
आणि
आतील चित्रे ·
वि. आ बुवा
व्ही. जे. टी आय्.
मुबई १९

*

प्रकाशनदिन आणि स्थळ :
३१ डिसेंबर १९५५
मराठी साहित्य समेलन—
३८ वे अधिवेशन
पढरपूर

*



*

# प्रस्तावना

मराठी हास्यवाङ्मयाच्या क्षितिजावर १९५० इ. च्या आगेमागे नवीन तारा उदयाला आला. सताऱ्या सात्त्विक, बोधपर, भक्तिप्रचुर आणि गंभीर वाङ्मयाला जन्म देणाऱ्या पढरीतील बुवा घराण्याच्या ह्या कौस्तुभमण्याला वेगळ्याच प्रकारच्या वाङ्मयाच्या निर्मितीची स्फूर्ति उत्पन्न होऊ लागली आणि त्यामुळे त्या तऱ्हेच्या वाङ्मयाचे एक प्रसूतिगृह जे मुबई महानगर तिकडे त्याने प्रयाण केले वि. आ बुवा हे प्रथम हस्तलिखित वार्षिक चालवीत होते, अद्यापहि ते चालूच आहे. पण पहिल्याने ते नवशक्ति, लोकमान्य, वेणी या मुद्रित कालिकाच्या अकातून झळकू लागले त्याचा विनोद प्रथम प्रथम तात्कालिक स्वरूपाचा होता वीज जशी चमकून जावी आणि क्षणमात्र तिचा चकचकाट पडून पुन पूर्ववत् अधार व्हावा तशी त्याच्या अगदी छोट्या चुटक्याची चमक क्षणिक वाटे आकाशातून पकडून आणून विद्युत्सचयात साठवून ठेवलेल्या, दीर्घकाल प्रकाश देणाऱ्या विजेसारखा चिरस्थायी विनोद आता ते निर्माण करू लागले आहेत. ' अकलेचे तारे ' हा त्याचा सग्रह १९५३ त निघून त्याने इतकी लोकप्रियता मिळविली की दोन वर्षांत त्याची दुसरी आवृत्ति निघाली १९५४ त त्याचा दुसरा सग्रह ' अकलेचे दिवे ' निघाला. हा तिसरा सग्रह १९५५ च्या अखेरीस निघत आहे. कदाचित् ' अकलेचे कादे ' असे नाव ते यास देतील असें मला वाटले होते पण ' अक्कल ' आता फार झाली असे वाटून त्यानीं ' एक ना धड ' असे या सग्रहाचे नाव ठेविले. पुनः पुन. तीच कल्पना पुनरावृत्त करणें त्याना आवडत नाहीं म्हणून ग्रथनामाच्या सकल्पातील हा फेर स्तुत्य आहे.

जनज्ञानाचा सामोसा आणि चकणाचूर हे पहिलेच दोन व्याजलेख वाचकाच्या मनाची पक्कड घेतात. आचार्य अत्र्याना रौप्यपदक मिळाल्यानंतर भवसक्ती दैनिकाला वेगळाल्या लेखकाचीं पत्रे आलेली देऊन सामान्य जनतेच्या चोबडेपणाचे प्रदर्शन बुवानी माडिलेले आहे. चकणाचूर ही धोंडूनदणाची लघुकथा सात तवे फोडून आरपार निघून जाणाऱ्या

बाणासारखी तीक्ष्ण आहे. तिचें स्वच्छद शुद्धलेखन म्हणजे हल्लीच्या तरुण पिढीच्या मुक्तबध अशुद्धलेखनाचे तिखट विडबन आहे लेखक आपल्याला न झेपणारे सस्कृत शब्द हास्यकारक रीतीने विकृत करतो, नायक आपण मुबईत येस पी कॉलेजच्या रेसीडेन्टमध्ये रहातो असें सागतो, नायकाला 'हटले पामर सिगारेटच' आवडनात लोकमान्य टिळकानी गीतारहस्य लिहून आपण रहस्यकथा लिहू शकतो हे ब्रिटीशाना दाखवून दिले, अशी विधाने करणारा विद्वान् नायक जेव्हा "सुद्धलेखण आणी व्याकर्न निट यावे लागते, मराठि, सौस्कृत, आणी इग्रजि भाषेवर प्रभूत्वतापणा असावा लागतो, मि या भाषेमधलि शेकडो पुस्तके वाचालि म्हनुण इतके आकृष्ट मनोदय साहीत्य लीहू शकतो," असे विधान करतो तेव्हा हसून मुरकुडी वळते. केवळ हल्लीच्या बहुसख्याक लघुकथालेखकाच्या व्याकरणाच्या अज्ञानावर, अशुद्धलेखनावर, सामान्य गोष्टींच्या अज्ञानावर ही व्याजोक्तिमय टीका आहे असे नसून लघुकथा या नावाखाली मोडणाऱ्या साचेबद रडकथावर देखील ही जळजळीत टीका दिसते यातील कित्येक ठिकाणीं अमुद्रणीय कल्पना आणि शब्दयोजना झालेली आहे ती वगळता हा लेख विनोदी लिखाणाचा उत्कृष्ट नमुना म्हणून दाखविता येईल लेखणीभित्र अर्थात् हजार साहित्य पाकक्रिया हा व्याजप्रबध मला फार आवडला. गडकरी आणि कॅप्टन लिमये या दोन लेखकानी कविताच्या कारखान्यावर हास्यप्रबध लिहिले आहेत, त्याच धर्तीवर एकदर वाङ्मयरचनेवर ही खुसखुशीत टीका आहे. हल्लीच्या लघुकथा, कादबऱ्या, ग्रामीण कथा, नवकाव्य आणि नाटके यामधील कटाळवाणी तदावृत्ति, साचेबद विषय, तत्राच्या चौकटीत जखडलेली रचना, लेखक आणि कवि याची परस्परप्रशसा करण्याची सवय, टीकेतील ठराविक अर्थशून्य शब्दप्रयोग याचे यथातथ्य दर्शन बुवानी घडविलें आहे.

काही अलकार हा हास्यनिबध अभिजात वाङ्मयात मोडण्याजोगा आहे. त्यातील उद्यक अलकारातील, 'आजचे साचेबद वाग्य हे उद्याचे सुभाषित आहे,' 'आजची इग्रजी शॉर्ट स्टोरी ही उद्याची मौलिक मराठी लघुकथा आहे' वगैरे उदाहरणे मार्मिक आहेत. या निबधातील

उदाहरणे एकदरीने सूक्ष्म निरीक्षण, निर्भीड वृत्ति, स्वतत्र विचारशक्ति याचे नमुने आहेत. बुवा याचा सर्व विनोद शुद्ध ' मऱ्हाटी ' आहे. त्यात पढरपुरी डाळयाचा खुसखुशीतपणा, पढरपुरी बुक्क्याचा मद सुवास, माहीमच्या हलव्याची गोडी, चौपाटीवरच्या भेळीचा तिखटपणा त्याचप्रमाणे त्या डाळयात मिसळलेल्या खड्याचे खटकेहि आहेत. स्वतःवर आणि स्वतःच्या नावावर मस्करी करण्यास ते डगमगतनाहींत गीतेपासून आधुनिक शास्त्रीय शोधापर्यंतची त्याना ओझरती तरी माहिती आहे आणि तिचा हास्योत्पादनाकडे उपयोग करण्याचे त्यास सामर्थ्य आहे आपण मुद्दाम इग्रजी विनोद वाचीत नाही कारण त्यायोगाने रूपातरे किंवा वाङ्मयचौर्य करण्याची बुद्धि होईल असे मला त्यानी प्रत्यक्ष सागितले व हे त्याचे सागणें ह्या पहिल्या तीन पुस्तकाच्या वाचनावरून मला खरे वाटते. रा. बुवा याचा विनोद आरभी आरभी मला रा दत्तू बादेकराच्या मार्मिक, भेदक, शुद्ध स्वदेशी व जरा असस्कृत विनोदासारखा वाटे अलीकडील त्याच्या लेखात व्यासगाची जोड मिळालेली दिसत आहे ग्राम्य किंवा अश्लील कोट्या, अगदीं गावढळ गालिवचने व क्षणभगुर घटनाचे उल्लेख याचा उपयोग निदान पुस्तकरूपाने आपली कृति प्रसिद्ध करताना त्यानी करू नये अशी सूचना व अभिजात आणि सदभिरुचिसपन्न असलेल्या मराठी हास्यवाङ्मयात त्यानीं अशीच भर घालीत जावी, अशी विनती त्यास मी करितो

३३ नातूबाग पुणे
श्रीदत्तजयती शके १८७७

चिं. वि. जोशी

# माझें थोडेंसें

‘ एक ना धड . ’ हें माझें तिसरे विनोदी पुस्तक रसिक वाचकांच्या सेवेस सादर करताना मला अतिशय आनद वाटत आहे ‘ अकलेचे तारे ’ आणि ‘ अकलेचे दिवे ’ या माझ्या अगोदरच्या दोन्ही विनोदी पुस्तकाची वाचकांनीं, साहित्यिकांनीं आणि नियतकालिकानी प्रशसा केली, एवढेंच नव्हे तर ‘ अकलेचे तारे ’ ची अल्पावधींतच दुसरी आवृत्तिहि नुकतीच प्रसिद्ध करण्याचा योग आला वाचकाच्या या सक्रिय प्रोत्साहनामुळेच हें पुस्तक सादर करताना मला विशेष आनद होत आहे

या पुस्तकात समाविष्ट झालेलें साहित्य प्रथम खालील नियतकालिकातून प्रसिद्ध झाले होते

जनज्ञानाचा सामोसा ( नवशक्ति ), माझे वृत्तपत्रवाचन ( अलका ) लेखणीमित्र ( दीपलक्ष्मी ), बुवा-वाणी ( धनुर्धारी ), काही जाहिराती ) ( हस, मोहिनी, वाङ्मयशोभा ), काही अलकार ( हस, वाङ्मयशोभा ), मी महायोगी, तेथे कर माझे जुळती आणि प्रेमाची भूमिति ( वसत ), चक्काचूर, चद्र अमेरिकेचा . अक्कल माझी, नावे, गावे आणि शब्द, (मोहिनी), दोन हृदये ( हस )

‘ सकाळचे दूध ’ हे मुबई नभोवाणीवर झालेले भाषण होय

वरील नियतकालिकाच्या सपादकांनीं आणि ऑल इडिया रेडिओच्या मुबई केद्राच्या अधिकाऱ्यानीं वरील साहित्य या पुस्तकात समाविष्ट करण्यास समति दिल्याबद्दल मी सर्वांचा अतिशय आभारी आहे

या पुस्तकाला मराठींतील प्रथितयश, ज्येष्ठ आणि श्रेष्ठ विनोदी साहित्यिक प्रा चि. वि. जोशी याची प्रस्तावना लाभली हाहि सुयोगच आहे. माझ्या विनतीला मान देऊन त्यानीं प्रस्तावना लिहिल्याबद्दल मी त्याचा ऋणी आहे.

# एक

गाजलेल्या नि गभीर बोलपटाच्या आरभीं असाव तस जड वातावरण आताहि होते. सारी घर पेटल्यासारखीं धूर ओकत होतीं. दिवसभराच्या काबाडकष्टान शिणलेला गजबजाट घरा-खुराडाच्या वाटानी लागला होता.

एक बस दारूवाला स्टॉपवर थाबताच तिच्यातून ड्रायव्हर व कडक्टरहि पॅसेजर्ससारखे खाली उतरले. स्टॉपवर त्याची प्रतिक्षा करणाऱ्या दुसऱ्या ड्रायव्हर-कडक्टरच्या स्वाधीन बसच मढ सोपवून ते सुटकेचे नि:श्वास सोडू लागले. एका अर्थान बसच ते मढ नव कोर झाल असल तरी दुसऱ्या अर्थान शुष्क-क्षीण उसासे सोडीत परत, म्हटल तर पुढ नि म्हटल तर माग चालू लागल.

त्याच मढ्यातून उतरलेले आप्पा देशकर तें नजरेआड होईपर्यंत उतरल्या जागी उभे राहिले

आप्पा देशकराचा पोषाख अगदीं साधासुधा होता. कमरेला कोणत्यातरी अप्रसिद्ध मिल्च जाडभरड धोतर होत. जुनेपणान कीं मळान कुणास माहीत–ते

इतक गादल होत की, त्याच सूत मुळातल धुब्बट की कोर ते ओळखण आता कठीण होत. आप्पाच्या राठ पायात कोकणी वाहाणा होत्या. एकीच्या एका अगठ्याला आटलेल्या ट्वाईनचा दोरा होता. ' पॉलीश ' नामक चकाकणारी वस्तू त्या वाहाणानी जन्मल्यापासून कधी पाहिली असेल अस दिसत नव्हत आप्पाच्या अगात अघळपघळसा कोट होता. कसा का होईना, मानव जातीच्या अगावर असल्यान केवळ त्याला कोट म्हणण भाग होत; एरव्ही झूल म्हणण अधिक शोभल असत कोटाचा रग नेमका कोणता हे या तरी वेळी ठरवण बिकट होत त्याच्या उजव्या बाहीला खालच्या भागान कोपरापर्यंत डामरासारखे काळे नीबर डाग असल्याच – अर्थात् प्रयत्नान – दिसू शकत होत. कॉलरला आतून टाचण्याची राग लागली होती. वरल्या खिशात पेन्स नि टाटपेन्सची राग लोमकळत होती.

आप्पाची हाड गालाबाहेर डोकावत होती. डोक्यावरली खरड्याची टोपी आपला वर्तुळाकार आप्पाच्या डोक्यावर उमटवून बसली होती त्यात ती सध्या घट्ट होती आप्पाच्या डोळ्यावर डबल भिग असलेला चष्मा होता एकातून ते लाबच नि दुसऱ्यातून जवळच पाहात असत खर तर अलीकडे त्याच्यात भिगातल्या कोणत्या काचा कुठ बघण्यासाठी आहेत याचा डोळ्यानी गोधळ निर्माण केला होता दोन्ही काचातून त्याना सारखच दिसत अग हा काचाचा दोष की डोळ्याचा ह्यावर ते विचार करण्याच मुद्दाम टाळत असत.

ते बसमधून उतरले त्यावेळीं प्रथम ओलाडावयाच्या सडकेवर बस आडवी आहे म्हणून, नतर चष्म्याची भिग पुसायची आहेत म्हणून अन् आता काहीच काम नाहीं म्हणून जागच्या जागी उभे होते.

अस आप्पाच्यान अलीकडे नेहमीच होत असे दिवसभराच्या कष्टान, बसमधून उतरताना कराव्या लागणाऱ्या घाईमुळ ते सुन्न होऊन जात असत. कदाचित् यत्राच्या धावपळीमुळहि असेल कदाचित् स्वतःतल्या कोणत्या तरी व्यथेनहि असेल किवा आणखी कशामुळ असेल – हातातल एखाद काम वेगळ झाल की लगोलग दुसर काम हाताळण आप्पाना अलीकडे अजिबात जमत नसे. दुसर काम सुरू करण्यापूर्वी त्याना विचार करावा लागत असे. स्वतःच्या ह्या अवस्थेला ते ' म्हातारपण ' म्हणत असत.

' म्हातारपण ' या शब्दात त्याच्या दृष्टीन फार मोठा अर्थ होता पेन्शनवर

गुजराण करण. पहाटे लवकर जाग आली तरी अथरुण उशीरा सोडण सकाळी काखोटीत पिशवी नि हातात नातवडाची रांग घेऊन जोशी मार्केटमध्ये जाण. घामाघीस करून भाजीपाला खरेदी करण दुपारी जेवणानतर वामकुक्षीच्या नावे डाराडूर झोपा काढण. दुपारच्या चहानंतर उन्ह उतरण्याची वाट बघत नातवडाबरोबर स्वतः खेळण. उन्ह उतरल्यावर त्यांना घेऊन नॅशनल पार्कमधे जाण. तिथ त्यांच्यावर एक डोळा ठेवून समवयीनांशी आध्यात्मावर मोठमोठ्यान बोलून आपल्या वयाच नि अनुभवाच्या कल्पित गाढेपणाच प्रदर्शन करण. बरेच दिवस सोबत चर्चा करणारा एखादा समवयीन आयुष्याच्या शेवटल्या पायरी-वरून अकल्पितपणे कलंडल्याची वार्ता ऐकून त्याच्या मृत्युबद्दल मनोभावे हळ-हळण अशा हळहळण्यातूनच नकळत स्वतःच्या मृत्यूविषयी चिंता सुरू करण नि आपल्यातल भय दिसू नये म्हणून – ते लपविण्याच्या प्रयत्नानच तोंडातून सुस्काऱ्यासरशी ईशनाम काढण वेळा झाली की नातवडाची पलटण घेऊन घरी परतण. घरी थोरल्या लेका सुनेशी त्यांना झोप किंवा कटाळा येईपर्यंत धाकट्याच्या लग्न-शिक्षणाबद्दल चर्चा करण. काळजी दाखवण वगैरे.

'म्हातारपण'च्या ह्या आप्पाच्या दृष्टीन सुखद नि आकर्षक असलेल्या अर्थापायीच ते स्वतःला म्हातारे समजत होते प्रत्यक्षात मात्र त्यांच्या वाट्याला म्हातारपणातल कोणत आकर्षण आलेल नव्हत मानसिक म्हातारपण मात्र त्यांच्या बोकांडी चांगलच बसल होतं. यामुळ आप्पा त्यांच्या वयात थकू नयेत इतके थकले होते क्षुल्लकशी काम त्यांच्याच्यान लागोपाठ होत नसत. बसमधून उतरताच घराच्या वाटेन लागण हेहि त्यांना एक काम वाटत असे. त्याची सुरुवात करण्यापूर्वी ते विचार करीत असत विश्रांति घेत असत.

टारूवाला स्टॉपला आप्पाच्या मागून आलेली बस लागताच त्यांच्या माग उभ्या असलेल्यान त्यांना बसमध्ये शिरण्याची सूचना केली. तसे आप्पा भानावर आले. आडवलेली रांग सोडून बाजूस झाले आपल्या वाटेन लागले

मुख्य सडकेनंतर आप्पानी चार-सहा आडव्या-उभ्या बोळा ओलांडल्या त्या ओलांडताना आप्पांना कैक मोऱ्यांना आडव-उभ जाव लागल. सरावानच आप्पा हे करू शकत होते. तरी जिवाच्या काळजीन मोठ्याच चपळाईनिशी उठल नसत तर त्यांपैकी एका बोळात नेहमी पडून राहणार मातकट रंगाच एक कुत्र त्यांच्याच्यान तुडवल गेल असत.

आप्पा राहात होते – ती खर तर, आजच्या भाषेतली ' चाळ ' होती. पण लोक त्या वसाहतीच्या पुजक्याला इतकहि आधुनिक नाव द्यावयास नाखुष असावेत. ' चाळ ' हे नाव शोभेशा वसाहतीत राहणारीच माणस आप्पाच्या वसाहतीला आधुनिक नाव बहाल करण्यास नाखुष होतीं, असहि म्हणता यायच नाहीं. खुद्द आप्पाच्या चाळीवर कुण्यातरी आडनावाला षष्ठीचा प्रत्यय लावून ठळक आणि स्पष्ट अक्षरात ' चाळ ' हा शब्द लिहिला असला तरी प्रत्यक्ष त्या चाळींत राहणारी माणससुद्धा तिला कधी ' चाळ ' म्हणून सबोधीत नसत. कदाचित् तींत राहणारी बिऱ्हाड ' चाळ ' व ' वाडा ' या शब्दातला फरक जाणवण्याइतकी किंवा जाणवत असला तरी आधुनिकतेत विशेष काहीं हे मानण्याइतकी मनान वा सस्कृतीन जिवत नसावीत. त्यामुळ अलीकडली पोर कधी काळी या चाळीला खऱ्या नावान, ते बहुधा ऑफिसातल्या ' आटोक्यात ' वाटणाऱ्या एखाद्या तरुणीला स्वतःचा पत्ता सागताना काही काळ ' चाळ ' या शब्दान सबोधत असलींत तरी त्या वसाहतीच्या नावें हा शब्द काही केल्या रूढावत नसे. हे कदाचित् त्या चाळीत राहणाऱ्यामध्यें आडजातीच नि कमी शिकलेल्याच प्रमाण जास्त असल्यान होत असाव.

त्या चाळीला ' हेमाडपथी ' अस भक्कम दार होत. नावापुरतच. कारण त्याला पाखे अजिबात नव्हते. अतराअतरान ते सार्वजनिक होळीत स्वाहा झाले होते. उरली होती ती नुसती सताड चौकट.

चौकटीच्या उजवीकडे बकाराम न्हावी राहात होता दिवसभर तो बॉम्बे हेअर कटिंग सलूनमध्ये अगावरल काम करीत असे रात्री जवळ जवळ बाकीच्या सर्व बिऱ्हाडाना झोप लागण्याच्या सुमारास घरी येत असे त्यानतर बायकोला बडवत असे. निदान तिच्याशी भाडत तरी असेच.

उबरठ्याच्या डावीकडे बाजीराव वॉचमेकर राहात होता. पूर्वी त्याचा काचेचा उभट चौकोनी खोका डाम्बरी रस्त्यावरल्या एका कापडाच्या दुकानात होता. पण तेवढ्यापुरतहि भाड त्याच्याऱ्यान नियमित देववल्या न गेल्यान आता बाजीरावन घरीच खोका माडला होता. चाळीतल्या इतर बायका पाण्याला जातेवळी बाजीराव खिडकीतल्या खोक्यात तोड खुपसून एका डोळ्यान काही तरी काम करीत असे. बाई खेप घेऊन त्याच दार ओलाडत असली म्हणजे नेमका तो ' आलार्म ' ची ट्रायल घेत असे दुपारीं त्याच्या पायऱ्या पादत्राणानी

बुजलेल्या असत. मधल्या – घरातल्या कंदीलाभोवती माणसं बसलेली असत. पत्ते पिसत असत. पैसे टाकत. सावडताना बाहेरून ये-जा करणाऱ्यानाहि दिसत असत.

बाजीरावची बायको सतत आत बाहेर करीत असे. तिच्या हातात कधी दुधाच भाड तर कधी साखर–चहाचे पुडे असत कधीं पानाचे विडे तर कधी सिगारेटसच पाकीट वा सुट्या सिगारेटस् असत. ती अशी आत-बाहेर करीत नसे तेव्हा बहुधा घरातल्या सर्वात मागल्या खोलीत काळा गर्द धूर साचलेला असे.

बाजीरावच्या पलीकडे घरी असे तेव्हा दारूत तर्रर राहणारा अबकारी खात्यातला कुणी अधिकारी राहात असे त्याच्या घरात बाईमाणूस कुणीच नसे. त्याच लग्न झाल नाही अशातला हा प्रकार नाही, पण बायको त्याच्यापाशी राहात नाही. तो 'माणसात' नाही–अशी तिच्या सदैवच्या गैरहजेरीच्या समर्थनाथ 'चाळ'भर बोलवा आहे खर खोट तीच जाणे !

अबकारी खात्यातल्या अधिकाऱ्याच्या पलीकडे कुणी जमादार राहात असतो. सदर इसम कशात 'जमादारी' करतो हे चाळीतल्या बहुतेकाना माहीत नाहीं. त्याच घरहि जमादाराला न पेलण्याइतक सजलेल आहे. बायकोबाबत त्याचीहि अवस्था अबकारी खात्यातल्या अधिकाऱ्यासारखी आहे फरक एवढाच की त्याच लग्न झालेल नाही. होण्याचे वय पण उरलेल नाहीं. परतु त्याच्याकडे सोळा वर्षाच्या आतली मुल फार ये–जा करीत असतात त्यातली कित्येक नोकराच्या नात्यान त्याच्याकडे येत असतात तर कित्येक शिक्षणासाठीं त्याचा आसरा घेऊ पाहात असतात. पण त्यापैकी सहसा कुणाच्याच वाट्याला जमादाराची मर्जी येत नाहीं कोणत्याहि नात्यान घरात आणलेल पोर आठवडा–दीड–आठवड्याच्या आत पळ काढीत असते. अशीं पोर बहुधा उजाडता–उजाडता आपला बोरा––बिस्तारा लपेटून जमादाराच्या शिव्या खात घराबाहेर पडत असतात. काहीं काही तर रात्री––बेरात्रीहि रडत–जळफळत घराबाहेर धावत सुटत असतात. अशा वेळीं चाळ झोपलेली असते नि जमादार पळणाऱ्या पोरावर घरातल्या अधारातून मायबहिणीवर दात–ओठ रगडत शिव्या–धमक्या देत असतो. पण कोणत्याहि वेळी एकदा घराबाहेर पडलेल पोर त्या घरात परत कधींच फिरकत नाहीं.

जमादाराच्या समोरील रागेत जवळ जवळ आमोरासमोरीस एका दारावर

'ना. ग. जोशी ज्योतिष्याचार्य, येथे नाव–राशीवर संपूर्ण आयुष्याचें भविष्य वर्तविले जाईल.'

वगैरे पांढरी अक्षरं असलेली काळ्या रंगाची लाकडी पाटी होती. प्रमुख मजकुराखाली जोशीबुवांच्या भेटण्याच्या वेळा दिलेल्या होत्या. वस्तुतः ते कधीहि घरी असत. त्यांच्याकडे फारशी गिऱ्हाइकच नसत. तरी ही वेळा ते स्वतःची फावली वेळा समजत असत. या फावल्या वेळात ते घरातल्याच्या कुडल्या आळीपाळीनं अभ्यासत असत. आपल्या ज्ञानाची चाचणी बघत असत. बरोबरच थोरल्या मुलाचं लग्न कधीं जमतं याची चिंता करीत असत.

ज्याला जोशीबुवा नानासाहेब म्हणत असत तो त्यांचा थोरला मुलगा बाजारात कुठंतरी जुनी नाणी बदलून देण्याचं दुकान चालवत असे. अर्थात् हा केशवचा दुय्यम धंदा होता. आजच्या काळात एका धंद्यावर कुणीहि पोट भरू शकत नाही–असा त्या अुद्योगी माणसाचा समज होता. त्यामुळ केशवचा दुसरा धंदा लग्नं जमविण्याचा व वेळप्रसंगी ती तोडण्याचाहि असे. वडिलांच्या धंद्याला मदत म्हणून तो दैवाच्या कचाट्यात सापडून भांबावलेली अशी काही माणसं घरी आणीत असे. त्यांच्या राशिभविष्याचा जोशीबुवा विचार करीत असत. कधी त्यांना ग्रहशांतीचा तर कधीं एखाद्या देवाची सतत अुपासना करण्याचा सल्ला देऊन त्यांना आधिक भांबावून सोडत असत.

यातून जोशीबुवांना जेव्हा केव्हा वेळ मिळत असे तेव्हा तेव्हा ते एक तर हस्तसामुद्रिकाचा अभ्यास करीत असत किंवा ए. बी. सी. डी शिकत असत. यापैकी कोणतीहि विद्या आपल्याला अवगत झाली की आपला भाग्योदय आला असं ते मानीत असत. घरातल्या सर्वांना सांगत असत.

जोशीबुवांच्या पलीकडेच आप्पा देशकरांचं घर होतं. दोनच पायऱ्यांनी अुंचीवर असलेल्या या घराला कमरेइतक्या भिंतीचा व्हरांडा होता. भिंत ते छपरापर्यंतचं अुरलेलं अंतर लोखंडी पट्ट्यांच्या अुरकट चौकोनी जाळीनं भरून काढलं होतं. अशीच पायापासून छपरापर्यंत जाळी असलेलं व्हरांड्याला दार होतं. जोशीबुवा नि आप्पांच्या घरांची दोन्हीं दारं एकमेकांना भिडून होती. यामुळ दोघांपैकी एखाद्याचा पाहुणा रात्री लघवीवरून परतला की कोणतंहि दार ठोठावत असे. आतून कुणी तरी 'ओ' दिल्याशिवाय त्याला नेमकं घर ओळखता येत नसे. दार अुघडं सापडलं की पाहुणा सरळ आतहि घुसत असे.

मग चेहेरे पाहून, बैठकीतल्या रचनेचे अस्पष्ट बदल लक्षात घेऊन तो संकोचत असे, पुटपुटत असे,

" मला वाटल, जोशीबुवाचच घर आहे—"

सुसंस्कृत असला तर माग फिरताना म्हणत असे,

" क्षमा करा . "

याच दोन्ही बिऱ्हाडाना नवल वाटत नसे. ते कदाचित् त्याच्यातल्या सबधामुळहि असेल.

व्हराड्याच्या आत, चाळीतल्या प्रत्येक घरात होत्या तशा अधारान दाबून भरलेल्या दोन खोल्या आप्पा देशकराच्या सुद्धा घराला होत्या. आप्पा व्हराडयाला ' बैठक ', मधल्या खोलीला ' स्टोअर ' किवा ' झोपण्याची खोली ' अन् सर्वात मागलीला ' स्वयपाक घर ' म्हणत स्वयपाक घराला माग दार होत. ते चारीकडून बद असलेल्या तीन–साडे–तीन फुटाच्या बोळीत उघडत होत. प्रत्येक बिऱ्हाडकरूची न्हाणीघर अन् तुटकी फुटकी टाकी ह्या बोळीत, गोळभर रागेन पसरली होती. त्यामुळ ह्या बोळीत प्रत्येक दाराच्या वाट्याला साधारणतः बोळभर रुदीची नि चार – साडे– चार फूट लाबीचीच तेवढी मोकळी जागा येत असे.

अशा अगदी सारख्या बाधणीच्या अन् आकाराच्या दोन रागा चाळीच्या दारापासून सुरुवात होऊन पुढ गेल्या होत्या. त्या प्रत्येक घरात वर उल्लेखिलेल्या धद्या–स्वभावा अन वागणुकीची माणस राहात असत कदाचित् यामुळच असेल–ही सारी बिऱ्हाड त्या चाळीला ' चाळ ' न म्हणता ' आडतीयाचा वाडा ' म्हणत असत. वाड्यातल्या वाडयात मात्र सारे भाडेकरू आमचा वाडा म्हणत असत.

या वाडयाच्या वरच्या टोकापासून मुख्य दारापर्यंत एका बोडकी मोरी वाहात होती. घराच्या दोन्ही रागा मोरीच्या थडीन काही–म्हणजे उभ्या खाटा पडू शकेल इतक अगण सोडून बाधल्या होत्या. त्यामुळ भाडेकरूनाहि आपापल्या हद्दीतून ये–जा करण्याची सवय झालेली होती. एखादा किवा त्याचा पाहुणा परक्या हद्दीतून चालू लागला की, त्या हद्दीचा मालकी हक्क मानणारी बिऱ्हाड त्याच्याकडे रोखून बघत असत. पाहुणा एकटा असला म्हणजे दार ओलाडल जाईपर्यंत तो आपल्याकडेच येतो की काय अस प्रत्येकाला वाटे.

ह्या वाड्यात अगदी दाराशी जी घर होती, ती चार-ते पाचपर्यंतच्या पायऱ्यावर बाधलेली होती, पुढ जवळ जवळ प्रत्येक घरानतर त्यातली एकेक पायरी कमी होत गेली होती अगदी वरली घर तर भुइमपाट बाधली होती. त्याहिपेक्षा वरल्या घरात शिरताना, तळघरात घुसताना अुतराव्या लागतात तशा काही पायऱ्या जमिनीत उतरल्या होत्या.

प्रत्यक्ष आप्पाच्या ' बैठकी 'त समोरल्या भिंतीशी खाटाची चळत रचली होती घरातल्या सर्वापेक्षा उशिरा उठणाऱ्या आप्पाची खाट सर्वात वर होती. तीच खाट सर्वात वर ठेवण्याचे आणखी एक कारण म्हणजे त्या घरात तीच एक खाट ' खाट ' म्हणण्याइतकी व्यवस्थित होती. पण तिच्यातल्या देखील दोऱ्याची भोक जागजागी वाढलेली होती कुठकुठल्या भोकातून दोऱ्याचे पदर फुसडे लोमकळत होते. चौकट लोखडासारखी काळसर दिसत होती. ठाव जाग-जागी भेगाळले होते गात काचली होती. हे सार लपविण्याच्या धडपडीत सदैव राहणारा बोळ सकाळी खाटेवर त्याच्या वास्याची नि त्या घरात सर्वात चागली समजली जाणारी मतरजी टाकून देत असे.

व्हराडयातल्या उभ्या भिंतीशी उत्खननात हाती लागल्यासारख्या मोडक्या-तोडक्या ट्रकस पेट्या होत्या त्याच्या थप्पीवर आप्पाच्या घरातली अथरुण नामक लक्तर लोमकळत होती. बोळची जागृकता अथरुणावर देखील एक चादर अथरुन देत असे.

व्हराडयातली दुसरी अुभी भित, दारापुढून जात असल्यान अगदी मोकळी सोडली गेली होती शोभेसाठी त्या भितीवर कुण्या छापखान्याची, कुण्या टाइग्स फौड्रीची, तर कुण्या कागद-विक्रेत्याची नवी-जुनी कॅलेंडर अडकवली होती.

व्हराडयातच मागल्या खोल्यात जाण्यापुरती बोळ सोडून उरलेल्या जागेत अप्पाचा टेबल माडला होता. त्याच्या पुढ्यात दोन खुर्च्या होत्या. वेताच्या मुख्य जागी जुन्या काळातली लोखडी खुर्ची होती. पूर्वी दुसऱ्याच कुण्यातरी कामासाठी घडविलेला हा टेबल आता रायटिंग टेबल म्हणून आप्पाच्या घरात काम करीत असल्यान त्याच्या उचीशी खुर्चीच्या उचीचा मेळ घालण्या-साठी खुर्चीवर एका जुन्यापुराण्या दुलईची अनेक पदरी घडी कायमची अथर-लेली असे. आप्पाच्या बायकोची ही दुलई होती-त्यामुळ सध्या रिकामीच राहात असे. नाही म्हणायला एखादा आला-गेला तिचा उपयोग करू शकत

असे. कधीं कधी हिंवाळ्यात हट्टान व्हराड्यात झोपणाराहि मध्यरात्री तिची घडी अुकलत असे. एरव्हीं ती खुर्चीखेरीज कुठ भटकत नसे.

मधली नि आतली खोली सामान–सुमानान खचाखच भरली होती. मधलीचा रग अन् आत सदैव कोंडून राहणाऱ्या अंधाराचा काळोख इतका होता की, भर दिवसाहि कंदील लावून खोल्यातल्या सर्व वस्तू स्पष्ट दिसण शक्य नव्हत्या. समजा असत्या, तरी त्याचे प्रकार बाहेरल्या वातावरणावरून सहज कल्पिता येण्यासारखे होते.

आता आप्पा देशकर पायऱ्या चढताच घरातली सारी माणस हललीत. अभ्यासाची पुस्तक सावरत लोखंडी खुर्चीतला बाळ उभा झाला. घाईघाईन टेबलावरला पसारा दप्तरात कोंबू लागला. स्वयपाकघरातल्या सुधान भांडी लावण्याच काम थाबवल. परकराला हात कोरडवत ती व्हराड्यात आली, आप्पाजवळची पिशवी घेऊ लागली. तिच्या लक्षात राहिलेल आईच एवढच काम करण्यात सुधाला धन्यता वाटे.

आप्पानी वाहाणा कोपऱ्यात सरकवल्या होत्या टोपी काढून सुधापाशी दिली होती मग सुस्कारत, जवळ जवळ सर्वांना उद्देशून ते म्हणाले,

"गजू आला नाही अजून?"

हे आप्पा आपल्याला उद्देशून विचारताहेत अस त्या दोघानाहि वाटल. पण गजूबद्दल थोडी थोडकी माहिती अन् अतरान आप्पांना जवळ असलेली सुधा म्हणाली,

"नाही येईल एवढ्यात—"

ती आणखीहि बोलणार असावी. पण धीर धरवून आप्पा परत म्हणाले,

"त्यान एवढा उशीर का लावला, काही कळत नाही"

"दादा पेठ्याकडे जाणार होता म्हणे—"

पिशवीतल्या प्रुफाच्या वेटोळ्या टेबलावर ठेवताना ती म्हणाली,

"तुम्हाला सांगितल नाही, त्यान?"

"अ हो. मला आठवण नव्हती.. पोरगा उगाच मृगजळाच्या मार्गं धावतो आहे"

आप्पा वेताची एक खुर्ची कमरेखाली घेताना म्हणाले,

"लागू दे. असेल नशीब चलतीवर तर त्याच्याहि इच्छेप्रमाण होईल"

जाणाऱ्या वाटेवर नाहीं ! वाटा नेहमींच अडचणींच्या असतात. त्यातल्या अडचणीच तेवढ्या लक्षात घेतो म्हटल, तर मनुष्य कधींच ध्येयाप्रत पोचत नाहीं अडचणीतच गुरफाटून तो वेळ प्रसगीं ध्येय विसरून बसतो . ”

बोलता बोलता, कुठल अन् का कुणास माहीत, ते म्हणाले,

“ तुझ्या जागी गजू असता तर त्याला ह्या–तुझ्याहि वयात काहीं सागण्याच काम पडल नसत. पण ईश्वरान तुमची स्थान बदलविल्यामुळे मला एवढा विचार करावा लागत आहे . ”

बाळला आप्पाच कितपत समजत होत कुणास माहीत. पण आप्पाच्या वचकान अन् वडीलधारी माणस बोलत असताना आपण मध्यें बोलू नये, या शाळेतल्या सस्कारान तो चेहरा गभीर करून सार ऐकत असल्यासारख दाखवत होता.

आप्पाच लक्ष तीन दिशाकडे गेल होत. एकीकडे ते गजूची वाट बघत होते दुसरीकडे सुधाच्या हाकेची शक्यता पाहात होते तिसरीकडे म्हणत होते,

“ अरे, आम्हाला जर तुमच्यासारख्या शिक्षणात सवलती मिळाल्या असत्या तर आज आम्हीं कुठल्या कुठ जाऊन पोचलो असतो ! सरकारी गाडी असती आमच्या ढुगणाखाली आज

“ पण म्हणताातना, दात आहेत तिथ चणे नाहीं . तशी आहे आमची अन् तुमची अवस्था

“ तरी आता देखील काही कमी नाही तुला माहीत आहे ? अरे, मी नवव्या वर्गातून शाळा सोडली आहे रे ! पण अजून माझ्यापुढ मराठीत एम् ए. झालेला मनुष्य प्रुफ तपासू शकत नाहीं ‘ सृष्टि ’चा ‘ ष्टी ’ ऱ्हस्व की दीर्घ ते विचारायला येतो एवढ मी भाषाशास्त्रात ज्ञान मिळवल आहे

“ जाऊ दे. एवढहि करून आता त्याचा कोणता फायदा मिळवला म्हणा ! उलट डोळे मात्र गमावून बसलो. ”

आतून सुधान कितव्यादा तरी मारलेली हाक त्याच्या कानी आली. आप्पा खुर्चीतून उठले पण बाहेरल्या अधारात डोळे टवकारीत पुटपुटले,

“ आज येतोय की नाहीं हा–”

“ कोण, दादा ना ? ”

त्याच्यासारखी बाहेर बघत सुधा म्हणाली,

" येईल ना ! तोवर तुम्ही जेवून तर घ्या चल रे बाळ "

" ते झाल ग ! पण त्यान आज इतका उशीर का केला ते कळत नाहीं–"

" पेठे सराकडे लागत असेल उशीर "

" तेहि झाल रे. पण इतका ? "

" कदाचित् पूर्वी सर भेटले नसतील. तेव्हा येताना परत गजूदादा गेला असेल त्याच्याकडे "

" असच असेल तर मग काहीं हरकत नाही म्हणा– "

पण आपली शका स्पष्ट करण्याच धाडस न होऊन ते म्हणाले,

" शिवाय कोणतीहि भिक्षा तडकाफडकी मागता येत नाहीं दात्याच्या कलान ती घ्यावी लागते "

आपल बोलण सुधा–बाळच्या उपयोगाच नाही हें लक्षात आल्यावर आप्पा म्हणाले,

" पण रात्र किती होतेय् रे ! "

" होय ना– " सुधा म्हणाली

पण बाळ म्हणाला, " काय होय ना ! दादा लहान थोडाच आहे तर– "

" जाऊ द्या रे मी रात्र झालीय् म्हटल ती प्रुफ तपासायला किती उशीर होईल, या काळजीन. गजू अधाराला भितो म्हणून नाही आणि त्या बिच्याऱ्याला आता असल्या गोष्टीना भिऊन चालायचहि नाही कुणीतरी म्हटल आहे, भय हे सुखवस्तुपणाच लक्षण आहे "

अशासारख आप्पा आणखी काही बोलत राहिले असते. कारण अजाणतेपणीं त्याना आपल भवितव्य दिसू लागल्यान ते अलीकडे असच, म्हटल तर तात्त्विक नि म्हटल तर वायफळ बोलत राहात असत. त्यामुळ कित्येकदा आपण कुणापाशी बोलतो याच त्याना भान राहात नसे. तें फार उशीरा जागे होत असत. मग मात्र आपल आटोपत घेत असत. तसच आताहि सुधान पुन्हा जेवावयाची आठवण करून देताच आटोपत घेतल ते जेवायला बसले.

# दोन

गजूचा पोषाख त्याच्या नावाइतका साधा होता कमरेला 'कोऱ्या' हरकाचा मळूल पायजमा होता. अंगात हॅंडलूमचा रंगीत हाफ्-शर्ट होता. डोक्यावर मात्र काही नव्हतं. पाय पण अनवाणी होते. गजूची उंची जास्त असावी किंवा तो रोड असावा अथवा त्याच्या वयात बहुतेक सारी मुलं दिसतात तसा तोहि उंच दिसत होता. गजूचे गाल बसल्यासारखे होते. नाक प्रमाणापेक्षा टोकदार होतं. असे असलं तरी बौद्धिक तेजामुळं असेल वा तात्कालिक परिणामामुळं असेल या क्षणी त्याचा चेहरा उजळल्यासारखा दिसत होता. अधीर असून तो अंगणातल्या कित्येक अडथळ्यांना तुडवत अन् कित्येकांना उडवत घाईघाईनं चालत होता.

दाराशी टेकताच टेबलवरल्या बाळला म्हणाला,

"बाळ, दार उघड रे लवकर।"

"हो थांब—"

"हो–हो, काय करतो नुसताच? उठ ना!"

" हो, आलोच. "

तरीहि बाळ जागचा उठला नाहीं. आप्पाना टेबल द्यावा लागल्यावर आपल्याला जमिनीवर बसून अभ्यास करावा लागेल या काळजीन अभ्यासाला भिडलेल्या बाळकडून जागच हल्वत नव्हत हातातल वाक्य पूर्ण करूनच दार उघडाव असा त्याचा विचार होता गजू ओरडण्याच्या धाकान त्यान जागच्या जागी थोडी फार हालचाल सुरू केली होती. पसरले होते—ते पाय आवरले होते, एका हातान बाजूला पडलेल्या पेनच टोपण सावरून धरल होत.

गजू परत बाळला काहीतरी म्हणणार—तशात जोशीबुवाच त्याच्यावर लक्ष गेले. जोशीबुवाच नुकतच जेवण झाल होत अपचनाच्या विकारान त्याना लवकर झोप येत नसे त्यामुळ रात्रीच कुणी गप्पा करायला मिळत की कायशा शोधात ते अशा वळी नेहमी असत त्यातल्या त्यात गजू त्याना नेहमीच हवा-हवासा वाटे ! आता अनायासे तो दिसताच आवाज मोकळा करीत ते म्हणाले,

" कोण, गजाननराव काय ? "

गजूला देखील त्याच्या घराबद्दल चाळीतल्या इतर घरापेक्षा विशेष आपुलकी वाटत असे कारण जोशीबुवाच्या घरातली, त्याची बायको वगळून बहुतेक सारी माणस त्याला आहो—जाहो म्हणत असत आहो जाहोचा मान यावळी तरी गजूला फार मोठा वाटत होता. त्यानळ जोशीबुवाचा अघळपघळ आवाज ऐकताच आपण यापूर्वी बाळला दार काढायला सांगितल आहे, हे गजू साफ विसरला तशात निघालेल जोशीबुवाच दार स्वतःच समजत आत घुसला तोंड लाबवत हसला नि म्हणाला,

" कोण, अण्णाकाका काय ? "

" अ—"

जोशीबुवा लटका राग दाखवीत म्हणाले,

" बघा, बघा गजाननराव ! परत तुम्ही मला काका म्हटल बर ? "

" अरे हो ! मामा म्हणायला हव होत. नाही काय, अण्णाकाका—— "

" बघा, बघा—"

जोशीबुवा गालात हसत म्हणाले,

" आताहि काय म्हणता इकडे लक्ष ठेवा ! "

" आता नाहीं म्हणणार ! "

" हे तुम्हीं आतापर्यंत कितीदा कबूल केलं हो ? "

" का ग बरोबर आहे ना ? "

" पण अण्णासाहेब ! "

गजू देखील आज जोशीबुवात रंगण्याइतका खूष होता. त्यामुळं कधी नव्हे ते जोशीबुवाना विचारू लागला,

" वाड्यातली सारी मुलं तुम्हाला काका म्हणत असताना–त्याना तुम्ही कधी काहीं म्हणत नाहीं "

" मला हे सांगा बरं, वाड्यातली सारी मुलं तुमच्याच नावाची आहेत काय ? "

बायकोकडं अर्थपूर्ण नजरेनं बघत जोशीबुवा म्हणाले,

" नाहीना ? म्हणूनच म्हणतो, तुम्ही मला काका म्हणू नये का ग, बरोबर आहे ना लीलाची आई ? "

" ते तुमचं तुम्ही पहा काय ते—"

" ते झालं म्हणा—"

" पण अण्णासाहेब, आमचे बाळ–सुधा सुद्धा तुम्हाला काकाच म्हणतात ना ? त्याना तर तुम्ही कधी काहीं नाहीं म्हणत—आणि मलाच का ?—"

" तुम्हालाच का तुम्हालाच का "

जोशीबुवा बायकोकडं तिरक्या नजरेनं बघत अन् परत गालात जीभ घोळवत म्हणाले,

" आहे–आहे. प्रश्न थोडा विचार करण्यासारखा आहे खरा पण असो. सांगू–त्याचंहि कारण सांगू तुम्हाला–वेळ येताच "

अन् त्यानी घरातल्या हालचालीकडे कान दिल्यासारखे केले. काय ते समजून जोशीबुवाची बायको म्हणाली,

" आता झोपली असेल ती—"

" कोण हो, अण्णासाहेब ? "

" कुणी नाहीं—"

जोशीबुवा गजूला अदाजत–माघारू लागलं,

" अजून सांगण्याचा योग दूर आहे असं दिसतं. ईश्वर जे करतं ते बऱ्यासाठी करतं असं म्हणतात. तेव्हा समजलं काय, गजाननराव, सध्या आपणा

सर्वांचे ग्रह झोपले आहेत, असं समजून आज या बाबीला चाट देऊया."

तं एकदम गप्प झाले. भिंतीला पाठ टेकवली गजूला न्याहाळू लागले. गजू स्वत हून बोलत नाहींसा अदाज करून अस्वस्थ होऊ लागले.

आज पेठेकडे जाण्यापूर्वी आपल काम होईल कीं नाही हें त्यान त्याना विचारल होत यावर त्यानी त्याच्यावरील वेगळया प्रेमामुळ किंवा प्रश्न-कुडलीच्या आधारे असेल–त्याच काम होईल अस सागितल होत. पण प्रत्यक्षात मात्र ते झाल कीं नाहीं, हे विचारण्याची जोशीबुवाची हिंमत होत नव्हती. ते झाल असत, तर गजूसारख्या सरळ पोरान आल्यासरशी सागून टाकल असत असा त्याचा होरा होता. त्यामुळ आता त्याला कोणती उत्तर देऊन त्याच्याजवळची नि धद्यातलीहि प्रतिष्ठा सावरावी याचा ते विचार करीत होत.

गजूची स्थिति किंचित् वेगळी होती. पेठ्याच्या घराबाहेर पडल्यापासून त्याच्यात आनंद मावत नव्हता कधी एकदा घरी जाऊन तो व्यक्त करतो अस त्याला वाटभर झाल होत पण सुरुवातीसच बाळन त्याच्यावर हिरमोडाच बूच बसविल्यान नि नतर जोशीबुवाच्या 'मामा' प्रकरणान बराच वेळ घेतल्यान आता गजूलाहि त्याचा विसर पडत आला होता

क्षण–दोन क्षणाच्या या शाततेत त्याच्या आनदावरले दोनहि थर उडायला लागले. त्या आठवणीसरशी तो म्हणाला,

"अहो, अण्णासाहेब—

"तुमच भविष्य खर ठरल, बर का—"

"कशाबद्दल हो ?"

"पेठे सराकडल्या कामाबद्दल—"

"हा–हा–ते म्हणताय्—"

"अग लीलाची आई, ऐकल काय ? हे बघ, आपल भविष्य खर ठरल म्हणतात गजाननराव ! ऐकल का ग, लीला–ये, लीला—"

"लीला झोपली आहे—"

"खरच ! काय दळभद्री कार्टी आहे ना . बर, झोपू दे"

"ह, गजाननराव–बोला आता पेढे कधी देता ते लवकर–का ग, असच ना ?"

खरोखरच पेढे द्यावे लागतील या विचारान गजू विचारात पडला कारण तो याहि वयात आणि अशाहि बाबतीत शब्द पाळलाच पाहिजे, अशा मताचा होता त्यामुळ अण्णानी त्याला मागला हौद भरायला सागितल असताना तो कचरला नसता तितका आता कचरू लागला

भानावर आल्यावर ( खर तर हिरमुसत ) तो म्हणाला,

" आताच कुठले अण्णासाहेब पेढे ! देऊ मॅट्रिक झाल्यावर..."

तस जोशीबुवानी बायकोकडे हात उडवत म्हटल,

" म्या—! पाहिल ग, हे तुमचे कोण लागणार आहेत ते ? म्हणताहेत, मॅट्रिक झाल्यावर कुठ आपल्याला पेढे देणार ! घ्या, ऐकून स्वतःच्या कानानी नाही तर म्हणाल, ह्यानी काहीं तरी बनवून सागितल ! समजल की नाही ? "

आणि स्वतःच मोठ्यान हसत सुटले. त्याचा आवाज वाढत होता. तसतसा गजूचा चेहरा कोणत्यातरी विचारान गभीर, नीबर होत होता. शेवटी न राहवून तो म्हणाला,

" काहो अण्णासाहेब, मी मॅट्रिक होऊ शकेन काय ? "

" होऊ शकेन काय, म्हणजे ? अहो, आजच्या काळात मॅट्रिक होण म्हणजे आकाशाला गवसणी घालण्याइतक कठीण वाटत की काय तुम्हाला ? "

" तस नाहीं—"

गजू खाली बघत म्हणाला,

" माग तुम्हीं माझी कुडली पाहून सागितल होत की तुमच्या शिक्षणात अडथळे निर्माण होतील म्हणून—"

आठवताच जोशीबुवाहि किंचितसे सुन्न झाले. गजूचा हिरमोड होईल म्हणून बोलण चालू ठेवत म्हणाले,

" हो, पचमस्थानी चद्राबरोबर शनि असल्यामुळ माग अस सागितल होत खर— "

मग लगेच सूर बदलवून म्हणाले,

" पण, खर सागू गजाननराव ? माझ स्वतःच मत अस आहे की हे सारे ग्रहयोग—ह्या साऱ्या कुडल्या आणि ग्रहदशा माणसानी अपेशी ठरल्यावर पाहावयाच्या असतात. कर्तृत्वावर कुठ खोट लागू नये म्हणून देवाकडे बोट दाखवून समाधान मानण्यासाठी असतात .

" आता तुम्हीच सागा बर, जीवनात सारीकडून सतत यशस्वी होणारा माणूस कधी ज्योतिष्याकडे जाताना तुम्हीं पाहिला आहे काय ?

" तात्पर्य, माणसान प्रयत्न करीत राहाव म्हणतात ना,

*प्रयत्ने वाळूचे कण रगडिता तेलहि गळे*

मी तुम्हाला, कितीहि सागितल असल तर आज तुम्ही पेठ्याना भेटून तुमच काम करून आलाच की नाहीं ? "

गजून मान हलवली

" बस, तर मग . प्रयत्नावर विश्वास ठेवा, की सार जमल म्हणून समजा, का ग लीलाची आई—कस म्हणतो ? "

तशात गजूला घरातून हाक ऐकू आली. ती दिली होती बाळनच. पण प्रत्यक्ष होती आप्पाची हे गजून ओळखल. जोशीबुवाचा तडकाफडकी निरोप घेऊन तो आपल्या घरात आला. आल्यासरशी उशीर होण्याच कारण सागण्याच्या निमित्तान आपला आनद व्यक्त करता झाला,

" मी पेठेसराकडे गेलो होतों, म्हणून इतका उशीर झालाय्—"

" अस्स काय म्हणाले पेठे ? "

" ते म्हणाले, की जवळ जवळ जमल्यासारखच आहे..."

" अस्स—"

आप्पा विचारात म्हणाले,

" तर मग ' जवळ-जवळ ' हे शब्द कशाला वापरले त्यानी ? "

" अशात त्याच्या सस्थेची सभा आहे म्हणतात. तीत पेठे सर स्वतः प्रश्न काढणार आहेत. "

" ते झाल—पण प्रश्न माडण म्हणजे जमल्यासारख कस समजायच—"

" तशी सरानी खात्री दिली आहे. उद्यापासून वर्गात बसायला सागितल आहे दूर कशाला, पुस्तक देखील आणायला सागितल आहे.. "

" इतकी खात्री दिली त्यानी ? "

" हो. बघा ना, पुस्तकाची यादीदेखील आणलीय् मी त्याच्याकडून—"

गजून खिशातला कागद आप्पापुढ धरला. ते कागदाकडे पाहात असताच त्याचा चेहरा बदलत गेला. बोलले मात्र अस,

" प्रेसमध्यें नव्हता गेला काय ? "

" अलका ना ? गेलों होतों—"

राहून तोच म्हणाला,

" पण तात्यासाहेबानी प्रुफ दिली नाहींत "

" अस्स. काय म्हणाले ? "

" तुम्हाला भेटायला सागितल "

" सागणारच. "

" का, काय झाल ? "

" काहीं नाही—"

आप्पा थाबत म्हणाले,

" त्याना मला प्रुफ तपासायला द्यायची नसतील, दुसर काय असणार आहे आणखी . "

" पण ते तर—"

" म्हणो काहींहि—पण अर्थ हा आहे माणूस प्रत्यक्षात जे बोलतो—तेवढच त्याला करायच नसत "

" पण त्याना अस करायच कारण ? "

" कारण जाऊ दे !

" तुझ जेवण घे आटोपून आणि मला मदत कर थोडी कामात . कटाळला नसलास तर—"

नतर ते बाळला म्हणाले,

" का रे, आटोपल काय तुझ ? "

" अ–हो. वाटल्यास बाकीचा अभ्यास उद्या पहाटे करीन मला उठवून द्याल ना ? "

बाळशी यावर आप्पाना खूप बोलावस वाटल पण ' अलकाच्या ' हबक्यान त्याच्यात फारस त्राण उरल नव्हत. बाळच्या आवरा–सावरीकडे ते शून्यपणे बघत असताना गजूला परत जेवण करण्याबद्दल सागू लागले. पण खर की आप्पाना मदत करून साधावयाच्या स्वार्थापोटी कुणास माहीत–तो आपल जेवण मघाशीच आटोपल्याच सागत होता, हें तिसऱ्यादा ऐकल्यावर आप्पाच्या लक्षात आल. ते कामाला लागले.

गजूकडून त्यानी दौतींत पाणी टाकवून घेतलं. स्वतः प्रुफाची एक भेडोळी

उकलली. दोन ते आठ क्रमाकापर्यंतच्या गॅलीज् बाजूच्या ट्रकाच्या चळतीवर काढून ठेवल्या एक नबरची तपासायला म्हणून पुढ्यात पसरवली ओलेपणी तिचा कागद गुडाळला गेल्यान तो सहजीं सरळ राहिना. तेव्हा आप्पानी तो मजकुराच्या उलट बाजून दुमडला. मोड पाडली अन् परत टेबलावर पसरवला. कदील शक्य तितक्या जवळ ठेवून त्यानी दौतीत पेन बुडवला ( ते पेनचा उपयोग असाच करीत असत. ) गजूला म्हणाले,

"वाच –"

गजूच्या हाजात हस्तलिखिताची चळत होती. सरावाप्रमाण त्यात जिथ पेन्सीलची खूण होती अन् त्या खुणेच्या रागतच – पण मार्जिनमध्ये 'चालू' असं वाकड्यातिकड्या अक्षरात लिहिल होत – तिथून मजकूर वाचावयास सुरुवात केली. आता तो वाचत होता,

"डॉ. भडभड्यानीं जेव्हा आशाशी लग्न केल तेव्हा ते एम्. बी. बी. एस्. व्हायचे होते –"

पुढ्यातल्या प्रुफातल एकेक काळ अक्षर बारकाईन वाचणारे आप्पा गजूला थाबवून स्वतःहि थाबले. दोन-तीनदा प्रुफात डोळे रुतवून पाहिले. एकदा प्रुफ आणखी कदीलाशी नेऊन अन् एकदा प्रुफ व स्वतःच्या मध्यें कदील ठेवून पाहून थकल्यावर मात्र जें यापूर्वीच करायला हव होत – पण मुलाला आपला दुबळेपणा दिसू नये अशा भयान त्यानीं त्याच्यापासून ( नि त्यालाहि माहीत असून ) जे उगाच लपविण्याचा प्रयत्न चालवला होता – ते असहाय्यपणान उघड पाडीत म्हणाले,

"अरे गजू, जरा इकडे बघ बर रे "

गजून हस्तलिखित टेबलावर टाकल. आप्पाच्या माग जाऊन उभा राहिला. त्याच्या खाद्यावरून प्रुफात बघू लागला. तेव्हा अक्षराअक्षरावर पेनच टोंक ठेवत आप्पा विचारू लागले,

"हा 'भ' आहे की 'म' रे?"

"'भ'च तर आहे "

"नक्की?"

"हो नक्की ."

"आणि हा 'व' आहे की 'ब'?"

" 'व' – "

" नक्की ? "

" हो "

" मग बदलवू ? "

" हो. तिथ 'बी' पाहिजे . "

याच भरवशावर प्रुफातल्या 'एम्. बी. बी एस्.' मधला दुसरा 'बी' खोडून परत ते 'बी' लिहू लागले तेव्हा गजू म्हणाला,

" तो तर 'बी' च होता हो, आप्पासाहेब ! "

" खर काय रे ? बर, असू दे. पाहून घेईल कपॉझिटर काय ते –

" ह, वाच बघू परत – "

आप्पाचा हा गोंधळ 'ध' – 'घ' 'प' – 'ष' 'क' – 'फ' आणि 'र व' 'ख' सारख्या अक्षराबद्दल सतत चालू होता. जिथ अशा स्पष्ट अक्षराची ही गत तिथ अनुस्वार-रफारानी त्याना किती जेरीस आणल असेल, याची कल्पना केलेली बरी. त्यामुळ जिथ-जिथ ते अडत तिथ-तिथं मराठी भाषेला शिव्या मोजत.

अशा तऱ्हेन एकच गॅली पूर्ण होण्याच्या आत त्याचे डोळे गळू लागले.

तपासलेली गॅली त्यानी कशीबशी बाजूच्या रिकाम्या खुर्चीत ठेवली आणि डोळे पुसायच्या निमित्तान कपाळासकट सर्व तोंडभर धोतराचा सोगा लावला. पळाभरात त्याचे डोळे कोरडे झाले असावेत. पण कपाळावरला सोगा मात्र दूर होईना. तेव्हा त्याना भानावर आणण्याच्या हेतून असेल, कटाळल्यामुळ असेल किंवा जाग्रणामुळ असेल गजून जांभई दिली तसे तोंडावरल्या धोतरानिशी आप्पाच्या तोंडून शब्दहि बाहेर पडले,

" अरे गजा, माझ्याच पोटी जन्माला यायच होत – तर जरा लवकर यायच रे ! " ·

गजू वयान बेताचा असला तरी समजेन वयापेक्षा थोडा मोठाच असावा त्यामुळ वडिलाना म्हणायच ते त्याला अस्पष्टपणे जाणवून गेल परंतु ते स्पष्ट करण्याचा त्याच्यापाशी अधिकार आणि शब्दहि नसल्यान तो वयाच्या आसन्यान लहानच राहून आप्पाच्या तोंडाकडे केविलवाणेपणान पाहू लागला.

भानावर आलेल्या आप्पाना हे जाणवल. आपण काय बोलतोय् हें गजूला

समजू नये म्हणून त्यानी निर्विकार चेहरा केला. हालचालीत उत्साह ठोसत म्हणाले,

"ह, आता पुढली गॅली घेऊया तपासायला!"

आणि ते बाप-लेक परत कामाला लागले.

मोठ्या कष्टान दोन गॅलीज् तपासून झाल्या. आता त्याच्या डोळयात जाग्रणाच्याहि त्रासाची भर पडली होती. ते गळती लागलेल्या घरासारखे गळत होते कधी कधी आतले थेब दाढीच्या साहाय्यान चष्म्याच्या काचेवर येत होते. तेव्हा कुठ आप्पा थाबत होते. काच पुसत होते. एकदा अशीच काच पुसताना ते म्हणाले,

"अरे गजू, माझ्या डोळयात औषध देतो रे टाकून?"

"औषध?"

"हो."

"औषध तर तुम्ही बद केल होत ना?"

"आज परत आणल आहे . दुसर ..देतोस काय टाकून?"

"हो. आणि प्रुफ?"

"तपासू पहाटेला. चल बघू तर याहि औषधाचा प्रयोग करून ."

आप्पा खाटेवर आडवे झाले. गजून ठाव्याच्या बोडक्यावर औषधाची बाटली ठेवली पेन भरावयाच्या ड्रॉपरन तो त्याच्या डोळयात औषध पिळू लागला. ते की त्यान काढलेल गढूळ पाणी कुणास माहीत – आप्पाच्या डोळ्यातून निघत होत. चाळ्यावरून घरगळत कानात अन् तिथ मावेना तेव्हा केसात जात होत. आप्पा डोळे किलकिलवत होते.

जराशातच त्याना डोळे नेहमीपेक्षा वेगळे वाटू लागले. खर तर हा नव्या औषधाचा मानसिक परिणाम होता. पण न राहवून आप्पा गजूला म्हणत होते,

"अरे गजू, या औषधान गुण येणार अस वाटत रे!"

"कशावरून?"

"बघ ना, जरा वेगळच वाटत ते –"

"कुठन आणल?"

"आणल कुठण –?"

अप्पा म्हणाले,

"आणल एका शिखापासून.. राजकमल चौकावर बसला होता तो ह्या बाटल्याच दुकान माडून.. आठ आण्याची एक बाटली आहे मीं म्हटल, बघाव. आठ आणे कुठ जात नाही पण लेकाच औषध बर दिसत रे!"

अप्पा औषधाच्या गुणाबद्दल आणखी वाखाणत राहिले. गजूला झोप लागल्यावर त्यानी बोलण बद केल.

## तीन

बाळन घरातून फुलपात्रात पाणी आणल. टेबलच्या एका कोपऱ्यात ठेवल. खुटीवरले कपडे ओरबाडले. त्यात पडद्यासारख्या जाड कापडाची निळी हाप-पॅट होती सदरा पांढरा स्वच्छ होता. टिनोपॉल किंवा निळीऐवजी आप्पाच्या दौतींतली निळी शाई टाकून तयार होणाऱ्या निळसर पाण्यातून बाळ तो बुचकळून काढत असे. त्यामुळ घरातल्या सर्वांपेक्षा त्याचा सदरा दिसायला पांढरा दिसत असे. सदरा टेबलवर पसरवताना बाळला आठवण झाली. कपड्यावर पाणी शिपडायचं टाकून तो आत गेला. भितीगत कपाटातला घासून चकचकीत असलेला ओतीव तांब्या काढला. चुलीशी बसून त्यात निखारे भरू लागला. उकिडवा बसून, समोरल्या दारापेक्षा मागल्या दारी जास्त सावधपणान बघत.

अशातच घासलेल्या भाड्याचा पसारा घेऊन सुधा आत शिरली. बाळचा उद्योग पाहून तिच्याच्यान राहवल नाही. आपल्या आईसारखा आवाज चढवत ती म्हणाली,

" हे रे काय चालवलस बाळ ? "

" व्हाट् डू यू मीन ?"

खाद्यावरून तिच्याकडे बघत तो म्हणाला,

" दिसत नाही काय ? "

" अरे, पण तू सर्व विस्तव घेऊन गेला तर चूल विझेलना ! "

ती म्हणाली,

" मग मी अप्पाचा चहा कसा करू? त्यात लाकड ओलीचिंब. पेटता पटत नाहींत मेली "

" हे बघ, उगाच इम्प्रेशन नको मारूस, सागून ठेवतो – "

" थान रे कमल आल आहे – "

' इंप्रेशन ' हा शब्द तिला उच्चारता न आल्यान ती किंचित्सं थबकून परत म्हणाली,

" मी आपली सरळ सागत्येय तर राहू दे. मला काय कराव लागत. होईना अप्पाना उशीर. मी सागन त्याना तुझ नाव– "

" हो हो, जा. ओरड तुझ्याच्यान नसेल होत तर आणखी बोलाव कुणाला– "

पण प्रत्यक्षात मात्र त्यान तडजोड सुरू केली पूर्वी त्यान आपल्या ताब्यात चुलीतले जवळ जवळ सर्व निखारे घेतले होते. आता अर्ध्यापेक्षा अधिक परत चुलीत टाकले. पण एवढ्यान त्याच निभणार नव्हत. त्यासाठीं त्यान डब्यातले दोन–तीन मुठा कोळसे ताब्यात टाकले. फडक्यात ताब्या धरून तो टेबलकडे आला. पॅटवर पाणी शिडकलं. मुडपून ती बाजूला ठेवली. ताब्यातला विस्तव फुलविण्यासाठी त्यान वारा घालायला काही हाती लागत काय ते पाहिल. शेवटी अगावरल्या सदऱ्यान तो ताब्या फुलवू लागला वारा घालू लागला.

सुधा चुलीत नवीं लाकड घालत होती. चुलीवर चहाच आधण माडून झाल होत. ती फुकणींत फुकत असताना मागल्या दारातून पचा गुडाळलेले आप्पा आणि पुढल्या दारातून हातात बादल्या असलेला गजू एकदमच आत शिरले. आप्पा आले त्या दारापलीकडल्या हौदात पाणी खिचवायला म्हणून गजू आणि गजू आला त्या दारापलीकडल्या खोलीत कपडे घालायला म्हणून आप्पा निघून

गेले. आपापली काम आटोपल्यावर परत दोघाची स्वयपाकघरात गाठ पडली.

यावेळी मनातल्या कशान तरी गजूचा चेहरा पुलकीत होता. आप्पाच्या मनात गजूपेक्षा अगदी वेगळ असं काहींतरी असल्यान त्याना मात्र तो नेहमीं-पेक्षा उत्साही वाटत होता. या अन् स्वतातल्या हेतूमुळ त्याना त्याची कीव देखील येत होती पाहता पाहता आप्पाची ही स्थिति त्याना अस्वस्थ करून गेली. कुणाची तरी फसवणूक करणाऱ्या प्रामाणिक माणसाच्या मनात व्हावी ती कालवाकालव त्याच्यात सुरू झाली. आणि आपल्यात काय होतय् ते कळण्यापूर्वीच गजूला अडवून म्हणाले,

" काय गजाननराव, कुठवर आलय् पाणी ? "

" बस्, आता आटोपतच आल आहे. फार तर आणखी दोनेक खेपा आणाव्या लागतील– "

त्यानी अडवलेली वाट सोडविण्याचा तो सौम्य प्रयत्न करू लागला. त्याची वाट आणखी अडवत, अन् सहज सुरात ते म्हणाले,

" आधी चहा टाक घेऊन मग होईल पाणी– "

" पण तिकडे क्यू लावला आहे ना नळावर बादली भरत आली असेल आपली– "

" जाऊ दे रे ! क्यूच काय घेऊन बसतोय् क्यू लावून देखील माणसाला, ज्याच्यासाठी तो लावला ते आयुष्यात मिळतच अस नाही–"

गजूला कळणार नाही, असा समज करीत आप्पा पुढ म्हणाले,

" एवढी घाई कसली आलीय्. मगहि होईल पाणी. आधीं चहा घे माझ्यासोबत .

" सुधा, किती वेळ आहे ग ? "

" पण आप्पासाहेब, मला पेठेसराकडे जायच आहेना नतर नळ बद होईल–म्हणून "

या क्षणी आप्पाना पेठ्याची आठवण नको होती ते एकाएकी गभीर झाले पण आपल्या हट्टामुळ ते दुखावले असावेत अशी गजूची समजूत झाली. त्यान उभ्या जागी बादल्या ठेवल्या. आप्पा शोधत होते तो त्याचा पाट त्यान त्याच्या जागेवर माडून दिला पण तोवर आप्पानी दुसराच पाट घेतला होता. गजून माडलेल्या त्याच्या पाटावर त्यानी त्यालाच बसायला लावल थोड्याशा

आग्रहान गजू त्यावर बसलाहि. हें भाग्याच लक्षण कल्पून आप्पानी पुसट समाधान मानल. मग बराच वेळ सुधाला दाद न देणाऱ्या ओल्या लाकडाकडे ते बघत राहिले. नाईलाजान गजूहि एकीकडे हेच करीत होता.

शेवटी या कुढ्या गुदमरण्यातून आप्पानी स्वतःला सोडविण्याची धडपड सुरू केली.

" पेठ्याच्या खटपटीन तुला फ्रीशीप मिळेल, अस वाटत ? "

वाटतो अन् दिसतो तितका हा प्रश्न साधा – सरळ नव्हता. श्री. पेठे आणि आप्पा याच्यात कोणतेच बरेवाईट सबध नव्हते. गजूला एक हुशार विद्यार्थी म्हणून पेठे ओळखत होते. तो ज्या शाळेत आतावर शिकत होता त्या शाळेचे पेठे हेडमास्तर होते. सस्थेत त्याना मान असल्याची शहरभर बोलवा होती. हे अप्पाना माहीत नसण शक्य नव्हत. तरी त्यानी असा सवाल करावा हे गजूला गोंधळात पाडणार होत. पण आप्पानी सवालासरशी त्याच्याकडे रोखूनच पाहिल – तेव्हा त्याच्याकडे सशयान बघत नि सदिग्ध आवाजात तो म्हणाला,

" हो, मला तस वाटत खर – सराच्या त्या दिवसाच्या बोलण्यावरून "

एवढ्यावर न थाबवून त्यान विचारल,

" का ? "

" समज, मिळेलहि – "

आप्पा म्हणत होते,

" पण तेवढ्यान तुझ्या हायस्कूलच्या शिक्षणाला काहीं मदत होईल अस तुला वाटत काय ? "

" अ – हो. पूर्ण नाहीं – पण थोडी फार होईल अस वाटत मला वाटत, सर्व फी धरून हायस्कूलला दहा रुपये – पन्नास कीं साठ नवे पैसे पडतात – "

" ते ठीक आहे – "

शक्य तितक्या सौम्यपणान आप्पा म्हणाले,

" माझ्या बोलण्याचा अर्थ – मी शिक्षणाच्या विरुद्ध आहे असा तू घेणार नसशील तर मी बोलतो – "

" बोलू ? "

" बोलाना – "

" तेच म्हणतों –

" माझ म्हणण, केवळ फी माफ झाली म्हणजे शिक्षण घेता येत नाहीं. अलीकडल तर मुळीच नाहीं. शाळेत जायच म्हणजे सोबत्यासारखे कपडे हवेत. पुस्तक तर ओझभर लागतात वह्या पेन्सीली हव्यातच.

" महत्त्वाच, पोटात वेळच्या वेळीं अन्नहि पडायला हव –

" नाहीं काय ? "

" हो. ते तर हवच – "

" माझ्या आताच्या अवस्थेवरून तुम्हा लोकासाठी माझ्याच्यान तेवढहि होईल की नाहीं हें सागता येणं कठीण आहे, हे तूहि पाहतोसच, सर्वात मोठा मुलगा म्हणून तुला कमीत कमी मॅट्रिक करायच झाल तरी आणखी तीनेक वर्ष मला माझ्या डोळ्यानी साथ द्यायला हवी. मनात आणलं तर शरीर हे काम करू शकेल. पण ह्या डोळ्याचा मला अजिबात विश्वास वाटत नाहीं.

" तुला माहीत आहे – त्या दिवशी अलका प्रेसन मला प्रुफ तपासायला देण बद केल आहे. परवा माणिक मुद्रणालयान सागितल कीं आता आमच्याकडे कॉन्ट्रॅक्टॅन बाहेर देण्याइतक काम नाहीं. हे कारण खर नाहीं – हे मी ओळखू शकतो माझ्याच्यान प्रुफ नीट तपासली जात नाहींत हे त्याच मुख्य कारण आहे

" अशा तऱ्हेन तर माझीं बाहेरचीं काम बद झालीत तर तुम्हा लोकाच्या शिक्षणाचा खर्च कसा काढावा हा माझ्यापुढे मुख्य प्रश्न आहे –

" नोकरीच्या पगारात तर आपल खाणंपिणहि जेमतेमच निभत एक चतुर्थांश पगार घरभाड्यात जातो

" दुसर – भाऊसाहेबाचे थोरले चिरजीव नुकतेच इग्लडवरून आले आहेत. ते फार स्ट्रिक्ट आहेत. आमच्या प्रेसचा सर्व कारभार ते आपल्या हाती घेत आहेत. नव्या कल्पना आणि योजना राबवत आहेत. त्यामुळ माझ्यासारख्या जुन्या माणसाला त्याच्या कल्पनात कितीसा वाव आहे, याचा मला अजून पत्ता लागला नाहीं –

" घे, तो चहा घे – "

" तेव्हा यावर तू दुसरा काहीं तरी विचार करशील तर अधिक बर होईल – अस मला वाटत .घे – घे, चहा घे आधी – "

आणि त्यान चहा घ्यावा म्हणून स्वतः बशी तोंडाशी लावली. स्वतःच्या कपाकडे बघत गजू म्हणाला,

" मी दुसर काय कराव, अस तुम्हाला वाटत ? "

" माझ्या शब्दाला काही मान असला तर सागण्यात अर्थ —"

" मी कधी तुमच्या आज्ञेबाहेर गेलो आहे काय, आप्पासाहेब ? "

आणि आप्पा आपल्याकडे रोखून बघत आहेत अशा कल्पनेन गजू मध्येच थाबला. कारण तो आठवी पास झाल्यापासून आप्पा त्याला कोणत तरी दुसर काम शिकण्याबद्दल कधी प्रत्यक्ष तर कधी अप्रत्यक्षपणे साग – सूचव करीत होते. पण गजून मॅट्रिक होण्याचा जवळ जवळ हेकाच सुरू केला होता. आप्पानी या बाबतीतल त्याच्यातून लक्ष काढून घेतल्यावर तो स्वत त्यात धडपडू लागला होता बाप नसलेल्या मुलान करावा तो प्रयत्न स्वतः करू लागला होता. पेठ्याकडल यश त्याच्या प्रयत्नाच फळ होत. मनान नसल तरी परिस्थितीन ते आप्पाच्या डोळ्यात खुपवल होत. त्यामुळ खरोखरच ते गजूकडे रोखून बघत होते.

तरीहि, कदाचित् गजू बोलला नाही म्हणून असेल, ते आता म्हणत होते,

" नाहीं, माझ्या आज्ञेबाहेर तू आतावर गेला नाही हे खर आहे. जाणारहि नाहीं, अस वाटत. म्हणूनच परत एकदा म्हणावस वाटत की, अजून तू एखादी टेक्निकल लाईन धरशील तर बर होईल आय–टी–आय आहे. ग्रामसेवकाचा ट्रेनिग कोर्स आहे. पटवाऱ्याच शिक्षण घेता येईल मेलनर्स होणसुद्धा कमी महत्त्वाच नाही. सध्या वार होण्याची शक्यता असल्यान मेडिकल लाईनमधल्या माणसाना डिमाड आहे

" म्हणून वाटत तू अशापैकी एखाद्या लाईनमध्यें शिरला तर माझे डोळे सपूर्ण जाण्यापूर्वी तू माझी जागा भरून काढू शकशील –

" शिवाय ह्यापैकी काही धदे असे आहेत की त्यात मॅट्रिक कारकुनापेक्षा कितीतरी पैसा जास्त मिळवता येतो. उदाहरणच द्यायच झाल तर फिटरच देता येईल. तुझ्यासारखा बुद्धिवान मुलगा अशा धद्यात पुढ माग स्वतत्रपणे काम करू लागला तर महिन्याकाठी चार आकड्याचहि उत्पन्न मिळवू शकेल. नोकरीहि करतो म्हटल, तरी कुठ कमी पडत नाहीं.

" आमच्या प्रेसमधल्या एका कपॉझिटरचा मुलगा नुकताच फिटर झाला होता.

नाशिकला निघणाऱ्या मिगच्या कारखान्यात काहीं फिटर्स हवे होते. त्यान अर्ज केला इटरव्ह्यूचा कॉल आला. लगेच त्याची नेमणूक झाली. आता काम शिकत असताना त्याला पचाहत्तर रुपये महिन्याची स्टायपेड मिळत आहे. नतर एकशे ऐशी रुपये पगार मिळणार आहे. शेवटीं तो सात-आठशे रुपये पगाराचा मनुष्य होईल. अस असत त्या टेक्निकल लाईनच .."

दरम्यान गजू बोलला नव्हता. कदाचित् निवण्याच्या धाकान तो चहा संपविण्यातहि तो गुतला असावा म्हणून अन् आपला कप सपवताना फेर-विचार करताना ते अस्वस्थ झाले होते म्हणून आता गजूकडे कणवेन पाहू लागले. कारण गजूच्या शिक्षणाआड येण्याचा त्याचा मुळींच हेतू नव्हता. स्वतःच्या उमेदींत त्यानी आपल्या शालेय शिक्षणाबद्दल गजूसारखाच आग्रह धरून पाहिला होता. पण आता परिस्थितीन त्याना भूमिका बदलवण भाग पाडल होत. त्यामुळ किंचित्शा शाततेनतर ते आपल्या नव्या भूमिकेशींच अधिक समरस होऊ लागले. झटक्यासरशीं जमिनीवर कप ठेवताना म्हणाले,

" मग, काय ठरवतों आहेस शेवटी ? "

पण तेच म्हणाले,

" माझ तुला पटल तर एक होईल. आपण दोघे मिळून बाळला तरी चागल शिकवू शकू सुधाच लग्न आपल्या रीतीभातीला शोभेस करू शकू एकदा बाळ खुर्चीवर बसला की आपल्या घराण्यातली, माझ्यापासून सुटलेली ही ऑफिसची खुर्ची परत आपल्या घराण्याच्या स्वाधीन होईल. पुढल बाळ बघून येईल

" काय पटत की नाहीं ? "

" अ – हो – "

" अस तुटक उत्तर नको. तुला काय आवडत ते तू अजून ठरवू शकतोस – "

" बोल, काय आवडत तुला ? "

एवढ असून आप्पानी हा सवाल स्पष्ट विचारावा – याच गजूला दुःख झालं. पण राहवेंाह ना तेव्हा म्हणाला,

" खर सागू आप्पासाहेब ? "

" अगदीं खर – "

" मला शिकावसच्च वाटत — "

" अरे, पण मॅट्रिक होण, याला काय तू शिकण म्हणतोस आजकाल ? "

" तरी पण – आठव्या नवव्या वर्गातून शाळा सोडण्यापेक्षा — "

" मग आम्ही काय उपाशी मेलों काय ? "

" तस नाहीं. तुमचा काळ वेगळा होता—"

" डोक असल कीं कुणालाहि आपला काळ आपल्या उभेटींत आणता येतों. नसल तर मॅट्रिक होऊन काय दिवे लावताहेत तेहि दिसतच आहे. साध्या पट्टेवाल्याच्या जागेसाठीं फर्स्टक्लास मॅट्रिकवाल्याची झुंबड पडते.

" दूर कशाला, पगारपटावर आंगठा मारणारा आमच्या प्रेसमधला मशीन-मन साडे-तीनशे रुपये पगार घेतो एम्. ए. होऊन नुसतीं प्रुफ तपासणाऱ्या पाध्येपेक्षा ठसणीन वागतों मालकाशीं — "

" याऊपर काय तें तुझ तू ठरव — "

आप्पा ताडकन् जागचे उठले. कपडे करायला मधल्या खोलीत आले. परतु स्वस्थपणे कपडे करवेना तेव्हा अधून मधून गजूकडे बघू लागले. तो मख्खासारखा जागल्या जागीं उभा होता. याचा अर्थ लावत आप्पा मोठ्यान म्हणाले,

" ठीक आहे. चालू दे. माझ म्हणण सध्याच नाहीं पटायच तुला. वाटतहि असेल की मी तुझी दिशाभूल करतों आहेस तुला. काहीं अशी हे खर देखील असेल. पण यात मी तुझ्या सोबत घरातल्या सर्वांचा स्वार्थ पाहतो आहे. आज नाहीं पटायच तुला हे —

" बर, जातोंय मी — "

तरीहि त्याचीं पावल घराबाहेर पडली नाहींत. ते गजूला परत म्हणत होते,

" कर, सावकाश कर विचार "

" त्यात कसला विचार करायचा ? "

काहींसा चिडून अन् काहींसा अगतिकपणे गजू म्हणाला,

" तुम्हीं म्हणाल तर नाहीं जाणार मीं — "

" नाहीं – नाहीं – नाहीं ! "

कानावर हात दाबत आप्पा म्हणाले,

" तुला मी कोणतीहि बळजबरी करीत नाहीं. मोलान रडायला लावलेला

माणूस खरखुर रडत नसतो. तुझ तूं आधीं ठरव. आज तूं परत पेठ्याकडे जाणार आहेस म्हणून तुला एवढ सार सागून पाहिल ."

"बर जातोय् —"

पण ते हलू शकले नाहीं. पूर्वीची तयारी वाढलेली दाखविण्यासाठीं आत-बाहेर करू लागले. शेवटीं म्हणाले,

"बोल, मग काय ठरवलंस ?"

"मला शिकायच आहे —"

गजूला आपला निर्धार मागाहून कडक वाटून गेला. सावरायला म्हणून तो थाबला, पण आप्पानीं आपल सुरू केल होत.

"अरे हो. ते आल लक्षात. पण तोंवर मला माणूस म्हणून जगता आलं तरच ना रे."

आप्पानाहि सौम्य व्हावसं वाटू लागलं. तमा प्रयत्न करीत ते म्हणाले,

"मुख्य म्हणजे, शिक्षण माणसाच्या नशिबात असाव लागत तुला माहीत आहेच – जोशीबुवानीं तुझ्या पत्रिकेत काय माडले आहे तें —"

पत्रिकेबाबत बोलताना जोशीबुवानी गजूला सागितलेली उलट बाजू त्यान आप्पाना सागून टाकली याचा परिणाम आप्पाच्या ह्या बोलण्यात झाला,

"बघ तुझ तूच आता —"

पण गजूनं याचा वेगळाच अर्थ लावला. तो किंचित्शा निर्धारान म्हणाला,

"मी माझ्या शिक्षणाचा तुमच्यावर कोणताहि भार पडू देणार नाहीं, आप्पासाहेब मी माझ पाहून घेईन —"

यान, हळवे हळवे म्हणण्यापेक्षा दुबळे आप्पा देशकर तळापासून ढवळून निघाले. अंग थरथरवत आणि दमासरशी चालत गजूकडे गेले. त्याच्या पाठीवर हळुवारपणे हात ठेवला. दुसरा स्वतःच्या डोळ्यावर ठेवला. ते निपटून काढले. मग त्याच्या डोळ्यात बघत म्हणाले,

"अरे गजू, माझ्या गजानना, तू तुझ – माझ अशी भाषा वापरावी या हेतून मी नाहीं बोलल्लो रे तुझ्याशीं ! माझ्या मनात असा कोणताहि हेतू नाहीं. हे – हे सार घर मी आपणा सर्वांच समजतों रे. त्याच्या चागल्यासाठींच मला वाटल ते तुला सागण्याचा मी प्रयत्न केला

"याउपर तुला पटल नाहीं तरी चालेल – पण मी तुला तुझ – माझची

भाषा वापरू देणार नाहीं – आल लक्षात ?

" या घरात जें काय असेल तें आपणा सर्वांच आहे. मग ते सुख असो अगर दुःख असो. अन् ते आपण सर्वांनीं एकत्र भोगल पाहिजे. वेगवेगळ – ाहेर पडून एकेकट्याला भोगता यायच नाहीं. समजलास ? "

आपल्या बोलण्याचा अर्थ असा काहीं होऊ शकेल याची गजूला कल्पना नव्हती. आता तो सावध झाला. आपला खरा हेतू कोणत्या शब्दात माडावा या विचारात म्हणाला,

" मला तस काहीं नव्हत म्हणायच आप्पासाहेब. माझ्या म्हणण्याचा अर्थ- माझ्या शिक्षणाचा शक्य तितका खर्च कुठून तरी काढीन.. "

" म्हणजे ? "

" बघेन, कुठ पार्टटाईम नोकरी वगैरे मिळाली तर–"

" तुझ्यासारख्याला कुठली रे पार्टटाईम नोकरी मिळायला गेली ? "

" पाहीन–"

हें तर गजूलाहि माहीत नव्हत अडलेली बहुतेक माणस अशा वेळीं बोलतात–तस तोहि बोलला,

" कुठ तरी प्रयत्न करून–जमेलच आज ना उद्या–"

आप्पावर याचा परिणाम असा झाला. ते म्हणाले,

" शिक्षणाकडे तुझी इतकीच ओढ असेल तर ईश्वर ते तुला देईलच. पोरा, काळजी करू नको. डोळ्यात बुबुळ असेपर्यंत मीहि तुला मदत करीनच. "

पण डोळ्याच्या आठवणीनिशीं आप्पाचा सूर आणि बोलहि बदलला,

" मी तुला शिक्षणापासून वेगळ ठेवण्याचा आग्रह धरीत होतो तो कुटुंबा- साठीं. उद्या मला डोळ्यानी घरीं बसवल तर बाळ सुधाला साध पिठल–भाकरी तरी मिळावी ह्या हेतून.

" पण तू म्हणतोस तर चालू दे ! काय सागाव—ईश्वर तुझी इच्छा पुरी- सुद्धा करील–नाहीं असं नाही—"

वगैरेंसारख बोलत आप्पानी डब्याची पिशवी खांद्यावर टाकली. वाहाणा घातल्या आणि त्यानी—ते नोकरी करीत होते—त्या ' शाम छापखान्यात ' जाण्यासाठीं बसस्टॉपची वाट धरली.

# चार

शाम–छापखान्यातल्या आपल्या टेबल्वर आप्पा देशकर प्रुफ तपासत बसले होते. त्याच्या डावीकडे प्रुफाची थप्पी लागली होती. आता ते तपासत होते तो सिलेंडर मशीनचा फॉर्म होता. हा फॉर्म आप्पाना शक्य तितक्या काळजीन तपासावा लागत असे. तो फॉर्म घेऊन आलेला पाडुरग शेंडे नावाचा मशीनमन आप्पाच्या मशीनवर कोपर जमवून बाजूच्या बाकावर बसला होता. आप्पाचा फॉर्म तपासून होण्याची तो वाट बघत असावा किंवा इतर प्रुफरीडर्सपेक्षा आप्पाना प्रुफ तपासायला जास्त वेळ लागत असल्यान ड्युटींतला तेवढा वेळ फुकट घालविण्याची सधि साधत असावा. आप्पाच्या भिडस्त स्वभावामुळ असेल वा मशीन-प्रुफ तेच चागल तपासू शकतात या आतापर्यंतच्या लौकिकामुळ असेल, इतर प्रुफरीडर्सपेक्षा त्याच्या टेबलवर प्रुफाची खूप गर्दी राहात असे. प्रेस सुटेपर्यंत आप्पाना मान वर करायला वेळ मिळत नव्हता. बाबासाहेब प्रेसमध्यें येऊ लागल्याच्या सुमाऱ्या पासून आप्पा चष्मासुद्धा घाईन पुसत असत.

पुढल्या फॉर्ममधली सारीं पान आप्पानीं एकेकदा तपासून काढली होतीं आणि आता ते तींच पान परत एकदा वाचून काढण्याच्या विचारान (दुसऱ्यादा वाचण्याची ही मेहनत आप्पा आपल्या दृष्टीवरील अविश्वासामुळ मुद्दाम घेत असत.) नव्यान वाचावयास सुरुवात करणार होते. सुरुवात होते न होते तर देवराव त्याच्या पुढ्यात हजर झाला. जवळ जवळ थबकण्यापूर्वींच म्हणाला,

"देशकरसाहेब, तुम्हाले भाऊसाहेबान बोलावल--"

"हो. एवढा फॉर्म वाचून येतों म्हणाव—"

"पण लवकर बलावल ना साहेब—"

"फॉर्महि झालाच आहे. फक्त आता एकदाच काय तो वाचायचा राहिला आहे—"

आप्पा म्हणाले,

"तोवर उगाच मशीन खोळबून राहील, म्हणून म्हणतोंय्--"

"थे तुमच तुमी पाहा बा! मले लवकर बलावून आनाले सागितल, मून मतो—"

"याना आप्पाजी जाऊन—"

पाडुरग शेंडे ऐसपैसपणें बाकावर पाठ टाकत म्हणाला,

"फारम तपासाले दहाक मिन्ट उसीर होईन–एवढच. या, आधी जाऊन या—"

बोलता बोलता पाडुरगन बाकभर हात अन् आप्पाच्या टेबलाखाली पाय ताणले.

यामुळ आणि देवरावनहि परत घाई केल्यामुळ आप्पानी फॉर्म बाजूस सारला. पाडुरग शेंडेला थाबायला सागून ते देवरावमाग चालू लागले. तीं दोघ पहिलाच जिना चढत असताना आप्पानी देवरावला विचारल,

"का रे, भाऊसाहेब एकटेच आहेत ना वर?"

"नाहीं, बाबासाहेबहि आहेत."

"बाबासाहेब आलेत?"

"हो मघाच आले. तुमी कामावर याचेच असन, तवाच आले!"

"बापरे! इतक्या लवकर येऊ लागले ते प्रेसमध्यें?"

"हें तर काहीं नाहीं. थे साडे–नव वाजताच येतात प्रेसमध्यें...आम्ही

सुद्धा यायचे असतो, तेव्हापासून थे गॅलरींत उभे राहून कोन किती वाजता येते-थे पाहात असतात सर्वांना नकळत—"

"कधींपासन रे ?"

"कालपासून—"

कालपासून आपण किती वाजता कामावर येत असतो, याचा विचार करीत आप्पा म्हणाले,

"बर झाल सागितलस ते—"

जिने चढेपर्यंत आप्पानी हेच चालू ठेवल होत. आता ते तिसऱ्या मजल्या-वर पोचले होते.

शाम छापखान्याचा हा मजला ऑफीससाठीं होता तळघरात मशीन विभाग, पहिल्या आणि दुसण्याबर कपोझिग विभाग, चौथ्यावर बायडिग आणि पाचव्यावर कागदाचा स्टॉक अशी त्या प्रेसची सर्वसाधारण रचना होती.

ऑफिस असलेल्या मजल्याच्या एका कोपऱ्यात साधारणतः जिथून मोकळी हवा येऊ शकेल, जिथ बसल्यान ऑफिसात काम करणारीं सारीं डोकी स्पष्ट दिसू शकतील अशा जागी भाऊसाहेबाचा टेबल–जो त्या कार्यालयात आकारा-नेहि सर्वात मोटा होता–होता. त्याच्या एका कोपऱ्यात इग्रजी, हिंदी, मराठी आणि गुजराथी पुस्तकाचे अर्धवट छापील फॉर्म्स असलेल्या फाईल्सची थप्पी होती दुसऱ्या कोपऱ्यातल्या फाईल्समध्यें डिझाईन्स होत्या कशात नुकत्याच केलेल्या ब्लॉक्सची एकरगी तर कशात बहुरगी प्रुफ होतीं.

टेबलभोवतीं सध्या तरी जुनाट बाधणीच्या खुर्च्यांचा वेढा होता. पैकी मुख्य जागेवर, खुर्चीत साधारणतः आप्पाच्या वयाचे भाऊसाहेब बसले होते. त्यानी खुर्चीसह पाठ भिंतीला रेलली होती त्याच्या डावीकडे, टेबलवर मुद्दाम रिकाम्या केलेल्या जागेवर बाबासाहेबानी कोपर टेकवले होते. सध्या तरी ते बसले होते ती खुर्ची आल्या–गेल्यासाठींच होती. सत्तावीस-अठ्ठावीसच्या दरम्यान अस-लेल्या बाबासाहेबाच्या ताबूस अंगावर 'समर-सूट' होता. नुकतीच इस्तरी त्याला मारली असल्यान त्यावर कुठ सुरकुती दिसत नव्हती वयाच्या मानान बाबासाहेबाचा चेहरा फारच करडा-कठोर वाटत होता. अर्थात् तो त्यानी मुद्दाम ठेवलेला असावा.

आता बाबासाहेबाच्या पुढ्यात काहीं फाईल्स होत्या. फॉरीन-मेकच्या अत्यत

आधुनिक अशा छपाईच्या मोठमोठाल्या मशीन्सचे त्यात अनेक रंगी कॅटलॉग्स होते. काही कॅटलॉगला आर्टपेपरच्या लेटरपॅडवर टायपिंग केलेले कागद स्टिच केले होते. त्यात कॅटलॉगमध्यें दाखविलेल्या मशीन्सचे तपशील लिहिलेले असावेत. तपशीलात मशीनचा आकार, वेग, वजन, फॅक्टरीची आणि स्थानिक किमत वगैरे लिहिल होत

आप्पा देशकर तिथ टेकले त्यावेळी भाऊसाहेब आणि बाबासाहेब याच्यात लाखाच्या गोष्टी चालल्या होत्या. सोबत फॉरीन एक्स्चेंज कसे मिळवावें, त्यासाठी अर्थमन्त्र्यापाशीं लग्गा लावण्याकरिता काय करावें, इम्पोर्ट लायसनसाठी दिल्लीत कुणाचा वशिला लावावा, इडस्ट्रिअल मिनिस्ट्रींत आपल्या कामीं पडण्याजोग कोण आहे आणि तिथ अॅप्रोच होण्यासाठीं महाराष्ट्र राज्यातल्या कुणाला गाठाव वगैरेवर चर्चा चालली होती. यामुळ आणि इच्छा असून बाबासाहेबाचा अति उग्रट चेहरा पाहून विचार बदलल्यान आप्पानी प्रथम भाऊसाहेबाकडे पाहिल आणि नमस्कार केला तशी बाबासाहेबानी आपल्या केसाळ भुवयाची कमान कपाळावर चढवली. 'डिस्टर्ब' नजरेन ते आप्पाकडे पाहू लागले. खालपासून वरपर्यंत न्याहाळत राहिले. तोंवर या कशाची सवय आणि तमाहि नसलेले आप्पा सरावासरशी पुढ्यातल्या खुर्चीत टेकले.

बाबासाहेबाच्या भुवया आणखीच वर चढल्या.

पण निर्विकार आप्पा भाऊसाहेबाना म्हणत होते,

' तुम्हीं मला बोलावल ? "

" त्यानी नाहीं, मी बोलावल—"

बाबासाहेब म्हणाले,

" आप्पा देशकर आपणच ना ? "

" अ–हो. मीच तो. "

" आपण किती वर्षांपासून काम करता या फर्ममध्यें ? "

खणखणीत करड्या आवाजातला हा रोखठोक प्रश्न ऐकून आप्पा देशकर हबकलेच. त्याच्याच्यान बोलवेच्चना. त्याना विचाराला फुरसद देण्याइतका बाबासाहेबाना धीर नसावा. ते लगेच म्हणाले,

" मी, शाम फडके–या फर्मचा नवीन संचालक या नात्यान परत एकदा आपणाला विचारतोय्, आपण इथ कधींपासून काम करता ते ! "

" अ  मला वाटते, आपण परदेशीं गेलात त्याच वर्षी मी इथ नोकरीला लागलो "

" म्हणजे चार वर्ष—"

बाबासाहेब वडीलाकडे बघून म्हणाले,

" या धद्यात किती वर्षोपासून आहात ? "

" मला म्हटल ? "

" मग ? "

" बावीस-तेवीस वर्षांपासून—"

" शिक्षण किती आहे आपल ? "

हे आप्पाना चागलच लागल कारण त्याना असा सवाल प्रथमच केला गेला होता. शिक्षणाच्या अभावात देखील त्यानी आपल काम चोखपणे बजावून व्यवसायातल्या लोकात कीर्ति सपादन केली होती शिवाय कमी शिकलेल्या माणसाला खूप शिकलेल्यान अशा प्रसगीं असा सवाल केल्यावर येतो तो स्वाभाविक रागहि आप्पाना आता आला होता. तो न धरवून ते एकदम म्हणाले,

" तुमच्या म्हणण्याचा हेतू मला कळला नाहीं ! "

" डोन्ट से–तुमच्या, तुम्ही, तुम्हाला ? कॅनॉट यू से, आपल्या, आपण, आम्हाला ? "

झटक्यासरशीं बाबासाहेबानी फाईल्सच्या थप्पीतली सर्वांत वरची फाईल काढली. तींत एका पुस्तकाच्या छापील फॉर्म्सची चळत होती तींतला सर्वांत वरला फॉर्म बाबासाहेबानीं भराभर उकलला. आप्पाच्या अंगावर फेकताना म्हणाले,

" हा फॉर्म तुम्हींच तपासला आहे ना ? "

आप्पा फॉर्ममध्यें बारकाईन नजर फिरवत होते. त्यातल्या जवळ जवळ प्रत्येक पानावर तावड्या दॉट पेनच्या खुणा होत्या. फॉर्ममध्यें सुटलेल्या चुका त्या दाखवीत होत्या. सुटलेल्या चुका स्पष्ट आणि योग्य होत्या, तशाच त्या फार ढोबळहि होत्या. त्यामुळ आप्पा पकडल्या गेल्यासारखे त्या फॉर्मकडे पाहात राहिले नुसतेच.

बराच वेळ ते बोलले नाहींत, हातातला फॉर्म आलटून पालटून पाहात राहिले

तेव्हा परत चेहरा अन् आवाज चढवत बाबासाहेब झटक्यान म्हणाले,

"बोला, तुम्हींच तपासला ना हा फॉर्म ?"

"हो."

"काय हो म्हणता ?"

बाबासाहेब म्हणाले,

"किती करेक्शन्स आहेत त्याच्यात ?"

" .. "

"काय म्हणतोय् मी ?"

"हो. आहेत चुका "

"अशींच काम करीत होतात काय आजवर ?"

" . "

"बोलाना !"

"अ...तस नाहीं. अलीकडे मला कमी दिसत !"

"गिऱ्हाईकाला मला अस सागता येईल काय ?"

"अ नाही."

"मग काय जाब देऊ त्याना ?"

"पुढल्या वेळेपासून अधिक काळजी घेत जाईन "

"ते झाल. पण ह्या फॉर्मच काय करायच ?"

" .. . "

"बोला ना ?"

"मला वाटते, ह्या सर्व चुका गिऱ्हाइकाच्या लक्षात येणार नाहींत—"

"ते आधळे आहेत, अस तुम्हाला वाटत की काय ?"

अस बोलायला नको होत, हें बोलून गेल्यावर बाबासाहेबाना जाणवल. पण त्याच्यातला तरुण चालक आणि मालक थाबायला तयार नव्हता.

"समजा, काम प्रेसमध्ये असेपर्यंत हे शक्यहि आहे पण नतर कधींना कधी ह्या चुका लक्षात आल्याशिवाय राहतील काय ?"

"नाहीं—"

"समजा, नाहींहि आल एखाद्याच्या शेवटपर्यंत लक्षात—तरी हा क्रेडिटचा प्रश्न आहे. आम्हाला आमच्या फर्मची क्रेडिट गमवायची नाहीं! आम्हाला

आमची फर्म वाढवायची आहे क्रेडिट इज इम्पॉर्टंट थिंग फॉर अ बिग फर्म .. बिझिनेस आलं लक्षात ? ”

“ हो—”

“ तर मग आता काय करायचं ? ”

“ ... ”

“ बोला ना ? ”

“ तुम्ही–आपण म्हणाल ते—”

“ हो–तेंच. मीं मीं म्हणजे फर्मनं ठरविलं आहे की चुका असलेले सर्व फॉर्म्स रद्द करायचेत . ”

बोलता बोलता त्यांनी बेल वाजवली. देवरावला पोतनीसला बोलावून आणायला सांगितलं. आप्पा परत खुर्चीत बसले. त्यामुळं त्यांच्याकडे आणखी त्रस्तपणे बघत बाबासाहेबांनी भाऊसाहेबांशीं अशा निर्विकार सूराविर्भावात गप्पा सुरू केल्या; जणू त्यांच्या गप्पांत कोणताच खंड पडला नव्हता. विषय देखील पूर्वीचाच होता.

जराशांत तिथं पोतनीस आला. टेबलच्या किंचित् अंतरावर उभा राहिला. तिथं कंपार्टमेंट नसून कंपार्टमेंटबाहेरून विचाराव–तशा अत्यंत आदबदार आवाजात विचारू लागला,

“ मे आय कम इन, सर ? ”

त्यांच्याकडे न पाहता बाबासाहेब म्हणाले,

“ यस्—”

पोतनीस किंचित् पुढं सरकला. मागं, कमरेशी हात बांधून उभा राहिला. किंचित् वाकलाहि. यानं बाबासाहेबांच्या चेहऱ्यावर नाजुकशी प्रसन्नता डोकावली. पण लगेच ती लोपली. मघाशीं आप्पांच्या पुढ्यात आदळलेली सुट्या फॉर्म्सची फाईल पोतनीसच्या दिशेनं सरकवत ते म्हणाले,

“ ह्यातले सर्व फॉर्म्स पाध्याकडून तपासून घ्या. कमीत कमी आठ चुका असलेले फॉर्म्स वेगळे काढा. असे सर्व फॉर्म्स पुन्हा कंपोज करवून छापून घ्या. आणि त्या सर्वांचा कागदासह सारा खर्च आप्पा देशकरांच्या नावें टाका—”

“ हो, सर ”

अन् बगलेत फाईल मारून पोतनीस तिथून जाणार होता. तशी त्याला

आठवण झाली

"सर, सेक्रेटरीच्या वॉन्टेडची जाहिरात द्यायची होती ना?"

"हो. मघाच सांगितल ना?"

"आणि बघा, विश्वकर्मा फर्निचर मार्टवाल्याच लेटर टाईप करून झाल काय?"

"पाहतो सर—"

"मला दाखवा तें टाईप करण्यापूर्वी—"

"हो, सर—"

"जा—"

बाबासाहेबानी आप्पाच्या नावें पैसे मांडायला सांगताच आप्पा खुर्चीतल्या खुर्चीत मेल्यासारखे झाले होते. पोतनीस दृष्टीआड होईपर्यंत त्याच्या तोंडून शब्द निघाला नव्हता. पण आताहि तो काढला नाहीं तर खरोखर मरू, या भयान त्याच्यात जीव येऊ लागला तशात भाऊसाहेब त्याच्याकडे कीवेन बघत असल्यासारख त्याना वाटल. त्यामुळ आसऱ्यासाठीं म्हणून आप्पा भाऊसाहेबाना म्हणाले,

"भाऊसाहेब हे फार होईल! एखाद्या फॉर्मचा प्रश्न असता तर वेगळी गोष्ट होती—"

कदाचित् भाऊसाहेब विरघळू नये म्हणून असेल, बाबासाहेबानी घाई केली,

"त्याशिवाय तुम्हा लोकाना कामाच्या जबाबदारीची कल्पना कशी येणार? नोकरी म्हणजे तास भरण नव्हे, हे तुम्हा इंडियनाना कळायला हव—"

"पण बाबासाहेब—"

आप्पाना म्हणाव लागल,

"मी मुद्दाम नाहीं केल. मला दिसत नाहीं ."

"तर मग नोकरी नका करू कुणी आग्रह केलाय् तुमच्यावर नोकरीचा?"

आता आप्पाना बोलण शक्य नव्हत. त्यानी घालवली तितका वेळ मान खाली घातली. शेवटी भाऊसाहेबाकडे सहाय्यार्थ बघू लागले. हें सोसवेना तेव्हा भाऊसाहेब म्हणाले,

"बर जा, तुमच्या नावें पैसे वगैरे काहीं लागणार नाहीं. पण एक लक्षात ठेवा. यापुढ अस होता कामा नये—"

बाबासाहेब कांहीं तरी बोलणार होते. पण आप्पानी मध्येंच सुरू केल,

“ या बाबतींत मी कस्सून प्रयत्न करीन भाऊसाहेब ! माझ्याच्यान झाल तें मुद्दाम झाल नाहीं. माझी ती फिजिकल डिफिकल्टी आहे—”

आपल्या शेवटच्या वाक्यान परत नोकरीवर घाव येईल या भयान आप्पा देशकर थाबले. नाहीं तर ते,

“ शक्य तर मशीन प्रुफ पाध्याना देत चला—” असं म्हणणार होते.

आता ते घाईघाईन उठत असताना बाबासाहेब वडिलाना म्हणत होते,

“ आपण माझ्या व्यवहारात असे अधेमधे करीत राहाल तर मला माझ्या पद्धतीन फर्म कंट्रोल करण कठीण जाईल—”

जाता जाता आप्पाच्या कानी भाऊसाहेबाचे शब्द आले,

‘ मी आता इथ असा येतच किती दिवस जाणार आहे—”

“ ते कांहींहि असलं तरी–फर्म माझ्याच पद्धतीन चालायला हवी–त्या शिवाय हे लोक—”

पुढल आप्पाना ऐकावस वाटल, पण तें शक्य नव्हत.

# पांच

मुलाचा अभ्यास जेमतेम सुरु झाला होता. पण यावा तसा गर्दपणा त्याला आला नव्हता. धडधाकट बाप असलेली मुल अजून अळटळ करीत होतीं. शिक्षणाची काळजी असलेली गजू सारखी मुल मात्र उद्यावर परीक्षा आहे, अशा काळजीन अभ्यास करीत होतीं.

वर्गात शिक्षक नसतानाहि गजू मानेवर खडा असल्यासारखा ग्रामर वाचण्यात गढला होता पुस्तकातला एकेक नियम वेंचून मेंदूत टिपण्याच्या प्रतिक्रिया त्याच्या चेहऱ्यावर उमटत होत्या. त्यामुळ शब्द ऐकू न येण्याइतक्या लाबून पाहणाऱ्याला तो वेड्यासारखा दिसत होता. शिक्षणाचा षौक फर्मावणारी काही मुल कोपऱ्यातल्या बाकावरून त्याची टवाळी करीत होतीं. याला गजूचा त्या वर्गातला थोराडपणादेखील कारण होता. गजूच मात्र पुस्तकाखेरीज कशाकडेहि ध्यान नव्हत.

अशात वर्गात घुसलेल्या पट्टेवाल्यान गजूच नाव घेतल त्याला पेठ्यानी बोलावल्याच सागितल. डेक्सात पुस्तक कोंबून गजू पट्टेवाल्यामाग चालू लागला. चिकाच्या पडद्यात फट पाडून गजू पेठ्याच्या टेबलपुढ उभा राहिला. शाळेच्या

शिस्तीमुळ त्यान पेठ्याना जयहिंद ठोकला. सावधानच्या ऑर्डरमध्यें उभा राहिला. मग स्वभावतः म्हणा अगर पेठ्याच्या उपकारान म्हणा–अत्यत अदबशीर आवाजात म्हणाला,

" सर, आपण बोलावल मला ? "

" हो, शाळेन तुला माग युनिफॉर्मबद्दल सागितल होत ना ? "

" हो, सर– "

मान खाली घालून गजू तोंडातल्या तोंडात पुटपुटला,

" सागितल होत. पण अजून पैशाचं जमल नाहीं– "

" अरे, पण अस म्हणून कुठवर लोटत नेणार आहेस ? या पधरा तारखेच्या आत शाळेतल्या सर्व विद्यार्थ्यांनीं युनिफार्मच्या पैशाची व्यवस्था करायलाच हवी  जवळ जवळ सर्वांचे पैसे ऑफिसात जमा झाले आहेत . फक्त तुझेच तेवढे अजून यायचे आहेत अस मला आताच केळकरानी सागितल. खर ना ? "

" हो, सर. मी पण या एक–दोन दिवसात व्यवस्था करतो . "

" बघ बुवा. काय ते तूच ठरव. पण हें मात्र तुला करायलाच हव. तेहि ठराविक तारखेच्या आत .या बाबतींत कोणतीहि सवलत देण सस्थेला शक्य नाही. म्हणून, केवळ तुलाच मी बजावून सागतोय्– आल ना लक्षात ? "

" हो, सर– "

याखेरीज गजू काहींहि बोलायला तयार नव्हता. खर तर त्यान आपली हीहि अडचण पेठ्याना मोकळेपणान सागितली असती तर उसन्याच्या नावान युनिफॉर्मपुरते पैसे ते स्वतःहि त्याला देऊ शकले असते. त्याच हेतून त्यानी त्याला बोलावून घेतल होत.

पण गजू या बाबतींत काहीं बोलायला तयार नव्हता. त्याच्या मनात पेठ्यासारख्या विचार नसेलच अस नाहीं. पण प्रामाणिक माणूस उपकाराच्या जाणिवेन दबत असल्यान उपकाराच अधिक ओझ वाढवाव अस गजूला वाटत नव्हत. आणि मागितल्याखेरीज दान देण दात्याला ते अनाठायीं जात अस वाटत असल्यान पेठेना सुद्धा स्वतःहून गोष्ट काढण कमीपणाच वाटत होत. दुसरीकडे गजू विषयींची आपुलकी त्याना स्वस्थता लाभू देईना.

या सर्वांचा परिणाम गजू उभा होता व पेठे त्याला खोलवर बारकाईन

न्याहाळत होते. या कामीं नजर अपुरी पडू लागली तेव्हा त्यानीं शब्दाचा आधार घेतला.

" का रे, तुला एक विचारू ? "

" विचारा ना सर–"

" तुझ वय काय रे ? "

" या जानेवारीला सतरा पूर्ण होतील सर ! "

" वाटलच "

आपण विचारतों ते योग्य कीं अयोग्य याचा निर्णय घेण्यापूर्वीच पेठे म्हणाले ,

" काय रे मध्यें तू नापास-बिपास झाला होतास की काय ? "

" हो, सर "

गजू उचबळून म्हणाला,

" माझीं आतावर तीन वर्षं फुकट गेलीत सर. एकदा आई खूप आजारी होती म्हणून मला परिक्षेला बसता आल नव्हत. दोनदा मी स्वतः टायफॉईडन आजारी होतों सर .. "

" तरीच. नाहींतर एव्हाना तुझ्याएवढा मुलगा मॅट्रिक होऊन जायला हवा होता.. .

" बाय दी वे–

" का रे, नाईन्थ बी–हो, मला वाटते. बीच-मध्यें शिकतो तो देशकर तुझा कुणी लागतो का रे ? "

" हो, सर. तो माझा भाऊ आहे . "

" सख्खा ? "

" हो. "

" ऑ ! पण तो तर तुझ्यापेक्षा खूप वेगळा दिसतो रे ! राहणी कशी टाप-टिपीची असते त्याची. आणि तू असा–

" बर, जाऊ दे. मी काय म्हणत होतों ! हो, युनिफॉर्मच करशील ना ? "

त्यान मान हलवली.

" नाहीं तर बघ रे बुवा– एवढ्यासाठीं तुला शाळेबाहेर पडण्याची पाळी यायला नको...

" बर, जा– "

तसा गजू जागचा वळला. तो पडद्याबाहेर पडणार होता– पण त्याच्या व्यक्तित्वातल्या केविलवाणेपणान सोबत नेलेल पेठ्याच मन त्याना स्वस्थ बसू देईना. खणकन् बेलवर तळवा मारून त्यानी गजूला परत आत बोलावल, विचारल,

" का रे ! तू युनिफॉर्मची व्यवस्था कधीं करणार आहेस ? "

" लवकरच करतो, सर– "

" हो, पण कधीं ? "

" या दोन–चार दिवसात सर ! "

" कुठन रे ? "

" करीन सर, घरूनच. "

" काय घरूनच करीन म्हणतोस शहाण्या ! "

त्याच्याच भल्यासाठीं पेठे म्हणाले,

" अरे, गेल्या दीड–दोन महिन्यापासून एकाहि मुलाच्या युनिफॉर्मची व्यवस्था करू शकला नाहीं तो तुझा बाप काय या एक–दोन दिवसात तुम्हा दोघा भावाच्या कपड्याची व्यवस्था करू शकणार आहे ? "

बोलून चुकल्यावर आपल्या शब्दाची तीव्रता पेठ्यानाच खुपली. ते शल्य कमी करण्यासाठीं म्हणून ते आपल्या पद्धतीन, मोठ्यान हसले. गजूला जवळ बोलावल. टेबलाच्या डावीकडे उभ केल. त्याच्या खाद्यावर हात ठेवला. तसेच म्हणालेहि,

" खरच शक्य आहे काय तुला कपड्याची व्यवस्था करण ? "

" हो, सर– "

तरीहि बिचारा गजू म्हणाला.

" मी निश्चित करतो, सर ! "

" बघ बर ? "

" हो, अगदीं निश्चित सर ! "

" दोघाहि भावाची ? "

" बाळबद्दल मला नाहीं सागता यायचं सर. "

" काऽऽरे ? "



…४

गजूकडे संशयान बघत पेठे म्हणाले,

" त्याच्याबद्दल का नाहीं रे ?"

" त्याला आप्पासाहेब देतीलच घेऊन "

" आणि तुला नाहीं देणार ? का, तो तुझा सावत्र भाऊ आहे की काय ?"

" तस नाहीं सर मला शिक्षण लाभीं नाहीं, असं आप्पासाहेबाना वाटत सर त्यामुळ त्यानी बाळवर जास्त लक्ष द्यायच ठरवल आहे."

" अस्स– तर मग तुला वडीलाकडून पैसे मिळण कस शक्य आहे कपड्यासाठीं ?"

" त्याच्यापाशी नसले तर ते नाहीं म्हणणार नाहींत, सर. पण नसले तरी मी दुसरीकडून व्यवस्था करीन–"

" अस्स !"

म्हणताना पेठेनी त्याच्या खाद्यावरला हात काढला. कारण गजूच्या बोलण्यान त्याचा अहकार डिंवचला गेला होता. त्यामुळं आता ते किंचित् सतापानच त्याला म्हणाले,

" बर, जा. पण लक्षात ठेव ह–तारखेच्या आत युनिफॉर्मचे पैसे भरले नाहींत तर तुला वर्गात बसता यायच नाहीं–मग म्हणशील, आधी सागितल नव्हत–"

यावर जेमतेम काहींतरी बोलून गजू दाराबाहेर पडला. वर्गात आला.

पण आता त्याच लक्ष ग्रामरवर लागत नव्हत. नजरेसमोर सतत पधरा रुपये साठ नवे पैसे हा आकडा दिसत होता.

पूर्वी अभ्यासामुळ आणि आता पधरा रुपये साठ नव्या पैशाच्या काळजीन त्याला शाळेतला गोधळ जाणवत नव्हता.

कोपऱ्यातल्या बाकावरली मुल त्याच्या थोराडपणाला हसतच होतीं.

# सहा

वेळ सायकाळची होती. बहुतेक सारी कार्यालय आणि कारखाने बद होण्याच्या तयारीत होते.

हातात नेहमी राहणारी पिशवी घेऊन आप्पा देशकर भारत–मुद्रण–कला मदिरात शिरले. त्यावेळीं रात्रपाळीवाल्या कामगाराची तिथला टाईम–कीपर वाट बघत होता. आलेल्याच्या वेळा माडत होता. एक कपॉझिटर आपण सहा वाजून सात मिनिटानी आलों असता टाइम–कीपरन कार्डात सव्वा–सहाचा टाईम लिहिल्यामुळ कपार्टमेटमधल्या व्यवस्थापकाला ऐकू जाईल एवढ्या मोठ्यान टाईम–कीपरशी वाद घालत होता.

आप्पाना पाहताच कार्यालयात विखुरलेल्या काहीं कामगारानी आपुलकीच हास्य केल. काहीनी नमस्कार केले एका पोरसौदाशा कामगारान आप्पाबद्दल नमस्कार करणाऱ्यापाशीं चौकशी केली. आप्पानी चपराशाला व्यवस्थापकाबद्दल खुणेन विचारल. चपराशानहि खुणेनच व्यस्थापक कपार्टमेटमध्यें असल्याच सागितल.

ईश्वराच नाव पुटपुटत आप्पा त्या कपार्टमेंटमध्यें शिरले. त्याना पाहताच व्यवस्थापकानी आपल्या कामात डोळे खुपसले. आप्पानीं कपाळापर्यंत दोन्ही हात जोडून नमस्कार केल्यावर कुठ व्यवस्थापकानीं परत त्याच्याकडे पाहिल. अघळपघळ आवाज काढीत म्हणाले,

" काय, आप्पासाहेब, आम्हा गरीबाकडे कस काय येणं केल आज अचानक ? "

" गरीब, आणि तुम्ही ? "

" नाहीं तर काय ? बर, बोला—कसे काय आलात आमच्याकडे ? "

आप्पानी बाकावर आसरा घेतला रेंगाळल्या आवाजात ते म्हणाले,

" आलों होतों, जरा तुमच्याचकडे– "

" आमच्याकडे आणि तुम्ही ? "

अघळपघळ हास्य उधळत ते म्हणाले,

" काय थट्टा करताहात काय गरीबाची, आप्पासाहेब ? "

नकळत आप्पा चिडल्यासारखे झाले. कारण त्यानी पूर्वी या प्रेसमध्यें नोकरी केली होती. त्यावेळीं आताचे व्यवस्थापक त्याच्या मार्गदर्शनाखाली प्रुफ दुरुस्तीच्या खुणा समजावून घेत होते. सिलेंडरवर किती पानाचा फार्म असला तर पानाचा क्रमाक कोणत्या रीतीन असला म्हणजे फार्म बरोबर असतो, पेजिंग चुकत नाहीं—वगैरे तांत्रिक बाबी शिकत होते. आणि आता तेच हे असं बोलत होते त्यामुळ लाचार असले तरी माणूस असलेले आप्पा म्हणाले,

" अहो नानासाहेब, थट्टातर चालवली आहे तुम्ही ! "

" आम्ही ? ती कशी काय बुवा ? "

मानभावीपणें व्यवस्थापक म्हणाले, " सागाल तर ! "

" मग काय तर – तुम्ही स्वतःला शब्दोगणिक गरीब म्हणवून घेण्यात आम्हा खऱ्याखुऱ्या गरीबाची थट्टा होत नाहीं काय ? "

" छे : ! छे : ! "

व्यवस्थापक खर की, खोट कुणास माहीत, म्हणाले,

" मी तुम्हाला म्हणजे तुमच्या प्रेसला म्हणतोय् . आम्हीं ऐकलय कीं आता तुमचा प्रेस खूप वाढणार आहे म्हणून. आधुनिक पद्धतीचीं यत्र येताहेत इग्लड–अमेरिकेच्या धर्तीवर प्रेसचा कारभार चालवला जाणार आहे .

खरं ना ? ”

“ अहो, पण हें सार प्रेसच ! त्यात माझा मोठेपणा कुठ आला आहे, सागा बर नानासाहेब ! ”

“ ते झाल हो. पण तुम्ही त्याच प्रेसचे ना ? मग अशा प्रेसमधल्या माणसाना आमच्यासारख्या तुटपुज्या प्रेसच्या माणसान मोठ म्हणाव—नाहींतर काय म्हणाव बर ? ”

खूपसं हसून घेतल्यावर त्याच ओघात परत तेच म्हणाले,

“ जाऊं द्या. बोला, कसं काय येण केल इकडे बऱ्याच दिवसात ? ”

आप्पा विचारात पडले. खर तर ते ज्या हेतून इथ आले होते त्याविषयीं कोणत्याच विचाराची गरज नव्हती पण अशा प्रसंगीं कोणत्याहि माणसान घ्यावा तितका वेळ घेतल्यावर ते म्हणाले,

“ मी आपल्याकडे काहीं काम मिळत की काय तें विचारण्यासाठीं आलों होतो—”

“ ऑ, का ? शाममधली नोकरी होती ना ? ”

इथ आप्पा परत विचारात पडले. कारण आप्पाची नोकरी सुटली नसली तरी बाबासाहेबानी कारभार हातात घेतल्यापासून तिचा त्याना भरवसा राहिला नव्हता. तेव्हा पुढ माग आपण तिथन उखडलोंच तर पाय ठेवायला जागा मिळेल की काय, ते पाहण्याच्या हेतून ते विषय सोडून बोलले,

“ सुटली नाहीं म्हणा अजून, पण कधी काय होईल तें आता सागता येत नाहीं बाबासाहेबाचा इग्रजी खाक्या माझ्यासारख्या सपत आलेल्या माणसाला कितपत निभावू शकेल, ही एक शकाच आहे ! ”

पण याबाबत आप्पानीं अधिक पाय पसरवू नयेत म्हणून व्यवस्थापकानी काहींतरी बोलून तो विषय तात्काळ सपुष्टात आणला. मग नव्या दमान त्यानी आप्पाचा यावेळीं इथ येण्याचा हेतू विचारला. तेव्हा ते म्हणाले,

“ मी बघत होतों, आपल्याकडे काहीं पार्ट–टाईम वर्क मिळेल काय–”

“ पार्ट–टाइम वर्कची आणि तुम्हाला हो काय गरज ? ”

“ म्हणजे ? मला का नाहीं, अस मीं विचारल तर ? अहो मी म्हातारा झालों म्हणून तर तुम्हाला असं वाटत नाहीं ना ? ”

म्हटल तर थट्टेन अन् म्हटल तर तळमळीन आप्पा म्हणत होते,

" पण हें लक्षात घ्या की, मी नुसताच म्हातारा झालों आहे. म्हातारपणा-पर्यंत करावयाच्या कर्तव्यापैकीं माझ्याच्यान एकहि पार पडलेल नाही तेव्हा म्हातारपणातल सुख माझ्या वाट्याला येण शक्य नाहीं. त्याची अपेक्षाहि करण व्यर्थ आहे. म्हणतात ना करणी तशी भरणी—त्यामुळ मला पार्टटाइम वर्कची गरज आहे ! "

एवढ्या साऱ्या वेळात–ज्या कारणासाठीं पण वेगळ निमित्त सागून आप्पाना या प्रेसमधून काढून टाकल होत ते कारण आणि ऑफिसच्याच बाबतींत आपल्या-पेक्षा अधिक अनुभवी मनुष्य नसावा ही सर्वसामान्य असूया–व्यवस्थापका-च्या डोक्यात एकदमच जागी झाली. दिलगिरीच्या सुरात ते आप्पाना म्हणाले,

" तुम्हाला देण्यासारख काही काम तर दिसत नाहीं बुवा सध्या आमच्या-कडे.. "

धक्क्यानिशी आप्पाच्या तोंडून निघाल,

" ऑ ! म्हणताय् काय नानासाहेब ?

" अहो, कुणाला तरी खर वाटेल काय की, ज्या प्रेसमध्ये दोन–दोन पाळ्या चालतात, तो प्रेस एका प्रुफ–रीडरला पार्टटाइम काम देऊ शकत नाहीं म्हणून ? बोला ? "

" तस नाही आप्पासाहेब ! "

अति गभीर चेहरा करून व्यवस्थापक म्हणाले,

" सर्व गोष्टी दिसतात, तशा नसतात. काहीं बाबतींत न सागण्यासारख्या अडचणी असतात "

" सागा, बर–"

व्यवस्थापकावरील पूर्वीच्या उपकाराचा फायदा घेत आप्पा जरा अधिक बोलू लागले,

" अशा कोणत्या अडचणी आहेत, त्या तर–"

" . "

" बोला ना ? त्यात सकोच कसला ! "

" सागूच म्हणता ? "

विचार झाल्यावर व्यवस्थापक म्हणाले,

" सध्या आमच्याकडे प्रुफाची ने–आण करायला मनुष्य नाहीं–"

" एवढच ना ?"

" मग ती व्यवस्था करण माझ्याकडे सोपवा ..आता तर झाल की नाहीं ?"

पण व्यवस्थापक पळवाट शोधण्यासाठी वेळ घालवत म्हणाले,

" तुम्ही प्रुफाची ने–आण करण्यासाठीं काय व्यवस्था कराल ?"

" त्याची नका तुम्ही काळजी करू सायकाळी माझा मुलगा प्रुफ घेऊन जात जाईल आणि सकाळी शाळेत जाताना आणून टाकीत जाईल तुमच्या प्रेसमध्यें—"

तरी व्यवस्थापक मान हलवत होते.

आप्पानीं केविलवाणेपणान विचारल,

" का, यात तुमची कोणती अडचण आहे ?"

" त्याच अस आहे–" व्यवस्थापकानी आता विचार केला होता.

" आमच्या प्रेसमध्यें दोनहि पाळ्याना एकच पुस्तक चालू आहे.–पुस्तक फार मोठ आहे. शिवाय ते फार अर्जंट आहे. यदाच्या कॉपिटिशनला समाविष्ट करायच आहे. त्यामुळ प्रुफ इथल्या इथ आणि वेळच्या वेळींच तपासून घेण आवश्यक आहे "

या व्यवसायात अर्ध्यापेक्षा अधिक आयुष्य घालविलेल्या आप्पाना ह्या गप्पेचा कच्चेपणा तत्काळ ओळखायला आला. पण गरजेस्तव त्याना आपला चेहरा निकोप ठेवावा लागला. बोल मात्र लाचारच राहिले,

" तुमच्याकडे काम मिळेल, याचा मला खूपच भरवसा होता. तो कदाचित् माझ्या गरजेमुळहि वाटत असावा. कारण पोराच्या युनिफॉर्मसाठी मला तीस-चाळीस रुपयाची फार गरज आहे. सध्यापुरते सोळा–सतरा तरी रुपयाच काम मिळाल असत तर बर झाल असत. म्हणजे आमच्या घरात शिक्षणाच्या बाबतींत वारवार दुर्दैवी ठरणाऱ्या–तरी ते मिळविण्यासाठी जिवापाड प्रयत्न करणाऱ्या थोरल्या मुलाला त्याच्या शिक्षणासाठी मींहि काहीं खटपट करतो–हें दिसून आल असत अज्ञात माझ्याबद्दल त्याचा ग्रह वाईट होत आहे जाऊ द्या "

तरीहि आप्पा म्हणाले, " तुमच्याकडून काम मिळाल असत तर कदाचित् याच बैठकीत मी पधरा–वीस रुपयाची मागणी केली असती. मला खात्री

होती – तुम्ही नाकारल नसत !"

आप्पाच्या ह्या अतिविश्वासाला देखील व्यवस्थापक दाद द्यायला तयार नसावेत पण अशा दया—भावनाना ते दाद देणारेच नव्हते. तसं असत तर आप्पा देशकरासारखे जन्मभर प्रुफ-रीडरच राहिले असते म्हणा ! मग त्याच्या पुढ्यात, एकेकाळी त्याना काम शिकविणारे आप्पा देशकर आलेच कशाला असते ? यामुळ आप्पा देशकर बोलत असताना त्याची मान सतत हलत होती.

त्यामुळ आप्पाना पिशवी सावरावी लागली खांद्यावरून पाठीवर टाकावी लागली. ते उठून उभे झाले. शेवटीं आजवर ज्या गरजेन त्याना इथवर आणून ठेपवल होत—त्या गरजेनच ते परत म्हणाले,

" पुन्हा एक बोलून बघतो, उपयोग झाला तर ठीक. नाहींतर गजूच दैव "

आप्पा थाबले. लाचलुचपतीचा व्यवहार करताना बघून घ्याव तसं आजू-बाजूनी बघून घेतल्यावर पातळयत्री सूर काढून म्हणाले,

" वाटल्यास तुम्ही कॉन्ट्रॅक्ट बेसवर इतराना जो भाव देता त्यापेक्षा मला पेजवर चार–दोन पैशानी कमी दिला तरी चालेल पण शक्यतर काम हें द्याच .."

इथ मात्र प्रेसच्या व्यवस्थापकाचा चेहरा बदलला त्यानी विचारलहि,

" तर मग तुम्हाला इथ येऊन प्रुफ तपासण शक्य आहे काय ? "

आप्पा विचारात पडले. कारण घरी ते गजूच्या मदतीन प्रुफ तपासत असत. त्याला इथ आणत जाण आणि प्रेसमधल्या सर्वांसमोर आपल्या दुबळे-पणाच प्रदर्शन करण त्याना याहि परिस्थितींत आवडण्यासारख नसाव. ते म्हणाले.

" घरच्या घरीं बरं जमल असत. इथ येण्याजाण्यातच माझा बराच वेळ जाईल. शिवाय नाहीं म्हटल तरी मुलाच्या स्वयपाक–पाण्यात थोडफार लक्ष हें घालावच लागत .."

" मग शक्य नाहीं—"

तशीं आप्पाची पावल उचलली गेली, जरा झटक्यानच. मग ते कंपार्टमेंट-बाहेर आले. तेव्हा त्याना नानासाहेबाना आपण नमस्कार न केल्याच आठवलं. पण आता तें शक्य नसल्यान ते स्वतःवरच रागावून आपल्या वाटेन लागले.

*

# सात

कुणीतरी पाठीशी लागल्यावर चालाव तशा घाईन बाळ चालत होता. तावासरशी तो आपल्या घरात घुसला कोपऱ्यात चपला आणि उकिरड्यावर केर – कचरा फेकावा तस आपाच्या टेबलवर दप्तर नामक काळ्या गर्द रंगाची पिशवी फेकली. दाणदाण पावल टाकत मधल्या घरात आला मग मागल्या घरात गेला. तिथ नेहमींच्या थंड आणि पोक्तपणान सुधा तादूळ निवडत बसली होती, चुलीशी. त्याच थंड नजरेन तिन बाळकडे पाहिल तिच्या या कृतीन त्याचा संताप आणखी भडकला. गाल फुगवले गेले. पूर्वीच्याच चालीन तो तिथन माग फिरला. ते कशासाठीं हें न सुचून असेल वा सरावान असेल तो तिथूनहि माग फिरला तो थेट न्हाणींत आला मनातल्या अर्धवट बेतान त्याला न्हाणीत आणल होत पण संतापाच्या आठवणीन त्याचा हात – तोंड धुण्याचा बेत रद्द झाला दमासरशी सारे उंबरठे ओलांडत आणि कुण्या-कुण्याला ठोकरावत बाळ एकदम व्हराड्यात आला. खाटाच्या चळतींतली सर्वात वरची खाट झटक्यान तिरकस केली. मधली एक बाहेर फरफटली. मधल्या घरात आणली.

आढळली. अंथरुणातल्या बंगरशा बोक्स्यातून आपल्या वाटयाच अथरुण काढल, खाटेवर पसरवल. अंगावर ढुसा अन् खाटेवर अंग एकाच दमात आदळल. खालीवर ढुसा मुडपत तो कसाबसा शरीरान स्थिर होऊ लागला.

त्याचा हा अपरिचित अवतार पाहून बघत असणारी सुधा स्तमित झाली होती. त्यान खाट पसरल्यापासून ती स्वयपाकघराच्या उबरठ्यावर उभी होती. त्याची एकूण – एक हालचाल पाहात होती. तो स्थिर झाल्यावर मोठयाच गभीरपणान आणि धाडसान म्हणाली,

"का रे बाळ, काय झाल रे ?"

तिच्या अशा दोन – तीन प्रश्नाना बाळन दाद दिली नाहीं. तिसऱ्यावर मात्र तो डाफरला,

"सागून ठेवतो. माझ्याशी कुणी एक शब्द बोलू नका !"

जरा वेळ असाच गेला. मग पूर्वीपेक्षा अधिक भीत सुधा म्हणाली,

"अरे, पण झालय् काय – ते तर सागशील ?"

"मेलो .."

"ऑ ?"

"हो. मी मेलो आहे !"

"हे रे काय बोलण झाल ?"

"सागून तू काय करणार आहेस ग ?" मोठ्ठी आजीबाईसारखी विचारत्येस तर ! ऑ ?"

बोलाबरोबर तो तिच्याकडे रोखून पाहू लागला. यावेळीं त्याच ढोपर उशीवर होत. हाताच्या तळव्यात मान तोलली होती डोळे खाऊ की गिळू अशा तऱ्हेन सुधाकडे बघत होते.

त्याच्या डोळ्यातली आग तिला सोसवेना तेव्हा तिन मान खाली घातली. पण म्हणाली,

"जेवण तरी करून घ्यायला हव होत —"

"सागितल ना, माझ्याशी कुणी बोलायच काम नाहीं म्हणून ?"

"बोलत्येय् कोण ! जेवण करून घे म्हणत्येय्. मघाची आमटी आणि भाकरी ठेवली आहे मीं तुझ्यासाठी !"

"फेक ती आमटी – भाकरी नेऊन मोरींत. मला यापुढ तुमच्या घरातलं

काहीं एक नको — ”

“ वा ऽऽ रे शहाण्या ! अन्नाला कुठ अस म्हणत असतात काय कधीं ? ”

तस त्यान परत तोंडावरल पांघरुण फेकल. एका हातान मघासारख डोक तोलत म्हणाला,

“ तू करंगळीएवढी कार्टी मला अक्कल शिकवायला आलीस काय इथ ? होत्येस की नाहीं आपल्या कामाला चालती ? ”

आणि ती तिथन हालली असेल अशा समजुतीन तो परत अंथरुणावर निपचित होऊ लागला. तशात जेमतेम एक पाऊल माग घेतलेली सुधा म्हणत होती,

“ मग नाहीं येत म्हणतोस जेवायला, नाहीं रे ? ”

“ अरे ! परत तुझ तेंच ? ”

बाळन आपल्या सराईत पवित्र्यात तिच्याकडे बघत म्हटल,

“ जात्येस इथून की देऊ दोन थोबाडात ठेवून ? ऑ ? बोल लवकर ? ”

आता मात्र सुधा बोलली तर नाहींच – पण तिथन हलली. घरात तिसर नसल्यान बाळच्या थोबाडण्याची तिला भीति वाटली असावी म्हणून सरळ सैपाकघरात परतली. वातावरणात तादूळ निवडण्याइतका उजेड नसल्याच तिच्या लक्षात आल. ती दिवाबत्तीच्या कामीं लागली मग चूल पेटवली खिचडीसाठी आधण ठेवल. जाळ मनाजोगा पेटला होता. शिवाय तिला मध्यें वेळहि होता. तो भरून काढण्यासाठी तिन दप्तरातून ‘ समाज – शिक्षण ’ काढल. चुलीशीच बसून ती ते वाचू लागली जसजसा अंधार वाढत चालला तसतशी तीं पुस्तक वाचनासाठीं कधी पाठीमागल्या भिंतीवरील दिवालगिरीचा तर कधीं पुढ्यातल्या चुलीतला प्रकाश आळीपाळीन वापरू लागली.

सुधाची पाच – सात पान घोकून झाली असतील वा नसतीलहि – तशात आप्पा घरीं आले. आज ते शाम – छापखाना सुटल्यावर भारत – मुद्रण – कलामंदिरात गेले असल्यान त्याना घरी यायला खूप उशीर झाला होता. आता चप्पल काढताना त्यानी टेबलवर पाहिलं. तिथ कंदील नव्हता. मुख्य खुर्चीसुद्धा रिकामीच होती. त्यामुळ बाळ जेवत असेल अशी कल्पना करीत ते मधल्या खोलीतला अंधार ओलांडत सैपाकघरात आले. येताना मधल्या खोलीतली खाट त्याच्या पायाना अडली नाहीं. ती दिसण तर शक्यच नव्हत.

तेव्हा स्वयपाकघरात पोंचल्यावर ते म्हणाले,

" का ग, कुठ गेलीत हीं मुल ? "

" कोण ? "

" गजू - बाळ वगैरे ? "

" दादा, कुण्यातरी प्रेसमध्यें गेला आहे "

" प्रेसमध्यें, तो ग कशाला ? "

" काम बघायला . "

" कोण म्हणे ? "

" त्यानच सागितल "

" पोर आहे झाल — "

ते स्वतः पुटपुटले.

" प्रेसच कोणत काम येत तर कुणी काम देणार आहे त्याला. "

" तो तर म्हणाला की फोल्डिग कीं काय म्हणतात ते काम कुणालाहि करता येत म्हणून ? "

" अस्सं. ते म्हणत्येस "

पण आप्पा लगेच म्हणाले,

" पण तेंहि त्याला मिळायच नाहीं — "

" का ? "

" कारण दोन आहेत. एक तर अशीं काम प्रेसमध्यें काम करणारी माणसच स्वतःच्या घरी घेऊन जात असतात. फावल्या वेळात बायका – पोराकरवीं करवून घेत असतात.. दुसर, कामगाराच्या युनियनन कॉन्ट्रॅक्ट – पद्धतीन काम करण्यावर बदी घातली आहे — "

" मग प्रेसमधली माणस कशी करतात तर घरीं नेऊन तीं कामं ? "

" अग, बदी असलेल्या सर्वच बाबी प्रत्यक्षात थोड्या बद राहतात "

आपण कुणाशी बोलतों ते लक्षात आल्यावर आप्पा म्हणाले,

" आणि हो, बाळ दिसत नाहीं ? "

तशी सुधान तिच्यावर बेतेपर्यंतच सार बाळ–प्रकरण आप्पाना सागायला सुरुवात केली. ते पुरत ऐकण्यापूर्वीच आप्पा बाळच्या खोलीत आले. चालताना खाटेला अडूं नये म्हणून अधारभर, अंदाजान डोळे वासत ते म्हणत होते,

" का रे बाळ, कुठ आहेस रे ? "

एकदा म्हणाले,

" झोपला कारे, बाळ ? "

पण बाळन हा–हूहि केल नाहीं.

तोवर दिवालगिरी घेऊन सुधा उबऱ्यात उभी झाली अंधारात किंचित्सा उजेड झाला. खोलीच्या एका कोपऱ्यात टाकलेला खाटेचा लांबट–चौकोनी तुकडा आप्पाना अधुकसा दिसला. त्यावर आप्पा वाकले. शेवटीं, हाक मारता मारताच त्यानी बाळच पाधरुण काढण्याचा प्रयत्न केला. तसा तोवर त्याच्या दिशेला तोंड करून असलेला बाळ झटक्यानिशीं तोंड फिरवू लागला. बाळच्या या वागणुकीन, आप्पामधली त्याच्याविषयींची भीति कमी झाली. पण ती सपूर्ण कमी झाली नव्हती. ते विचारू लागले.

" का रे, काय झाल रे ? "

एक नाहीं की दोन नाहीं.

" हे बघ, मी काय म्हणतोय् ? "

" माझ्याशीं कुणी बोलू नका "

" अरे, पण झालय् काय–ते तर सागशील ? "

" सागतो ना, की माझ्याशीं— "

" हे बघ. काय झाल ते साग बर मुकाट्यान ! उगाच फणफण नको आहे मला "

आता बाळ, खर की खोट कुणास माहीत रडत म्हणाला,

" करा, तुम्ही पण करा माझा इन्सल्ट ! आमचे सारीकडून ग्रहच फिरले तेव्हा तुम्हीसुद्धा कशाला गप्प बसता ? "

आणि तो रडू लागला. मोठमोठ्यान.

" अरे, पण झालय् काय तें तर साग— "

आप्पा जीव तोडून म्हणाले,

अशी कोणती आपत्ति आलीय् तुझ्यावर ? कुणी केला तुझा अपमान ? आणि अपमान होण्याइतका का तू मोठा झालाय् एवढ्यात ? "

आप्पाचा हा स्वर आणि अवतारहि बाळला नवा होता. त्याला काय माहीत की आज ते देखील कुठून तरी पोळून आलेले आहेत म्हणून ! तो

आपला त्याना नेहमीचे आप्पा मानून बोलत होता,

"अपमान व्हायला मोठच व्हाव लागत, असं थोडच आहे. ज्याना स्वाभिमान आहे, त्या माणसाला आपला अपमान जाणवल्यावाचून राहात नाहीं . मग तो वयान केवढाहि का असेना–"

माग कोणत्या तरी नाटकात काम करताना बाळन हेंच वाक्य पाठ केल होत. नाटकापूर्वीं तो हे घरीं घोकत असल्यान आप्पाच्या स्मरणात राहिल. आता मात्र ते त्याना सहन झाल नाहीं. ते परत आवाज चढवत म्हणाले,

"हे बघ, अशी नाटकी भाषा नको आहे, सागायच असल तर साग आणि नसल तर मर आपल्या खाटेवर

"नाहींतर काय !

"मनुष्य इकडे आपल्या चिंतेत मरतोय्, आणि हीं कार्टीं आपलच लावताहेत एकेक माग "

बोलता बोलता आप्पा खाटेच्या आजूबाजूनीं मागपुढ करू लागले. जराभरात काहीं एक न सुचून तरारा चालत न्हराज्यात आले. अगावरला एकेक कपडा काढू लागले. अधारातच.

अशात खोकला आल्यान गजूचा त्याना सुगावा लागला. अंधारातल्या खुर्चींत गजू यापूर्वींच येऊन बसला असावा. तो केव्हा, कधी–कसा आला. याबद्दल आणि विशेषतः त्याला कुठ काम मिळाल कीं नाहीं याबद्दल आप्पानी चौकशी करावीशी वाटली. पण तशात बाळच्या खाटेवरून बाढत्या हुदक्याचा आवाज आला. आप्पाकडून तो सोसवला नाहीं कपडे काढण्याच काम अर्धवट टाकून ते तरारा चालीन परत बाळच्या खोलीत गेले.

आता बाळ खाटेवर उठून बसला होता. त्याचे गुडघे पोटाशीं होते. त्यात खुपसलेल्या तोंडातून हुदके निघत होते. ते बाळच सार अंग थरथरवत होते. यामुळ आप्पा एकदम त्याच्या अगावर चवताळत ओरडले,

"सागतोस आता मुकाट्यान की फोडू थोबाड, बोल लवकर ?"

अन् त्यानी हातहि उगारला.

तोवर आप्पाचा हा क्वचित्काळीं दिसणारा अवतार पाहण्यासाठीं म्हणा अगर बाळला बचावण्यासाठीं म्हणा गजू त्या खोलीत दाखल झाला होता.ऐनवेळीं आप्पाना आवरता याव, अशा बेतान, तिथ उभा राहिला होता. पण बाळ न बोलल्यामुळं

आणि त्याचे हुदके कमी झाल्यामुळ आप्पाचा उगारलेला हात तसाच राहिला होता. त्यामुळं आता गजू बाळच्या खाटेवर टेकला. एक हात त्याच्या पाठीवर ठेवला दुसऱ्यान गुडघ्यातून तोड काढत विचारू लागला,

" काय झाल तर साग ना रे, सरळ सरळ ? "

" नाथेसरानी माझा वर्गात अपमान केला ! '

" कशाबद्दल रे ? "

" युनिफॉर्मचे पैसे नाहीं भरले म्हणून ! "

" हात् तुझ्या तर ! आणि तितक्यासाठीं रडतोय् ? "

" म्हणजे काय ? "

बाळ चवताळत म्हणाला,

" एवढ्या साऱ्या मुलासमोर त्यानी मला वर्गाबाहेर हो म्हणून म्हणाव–हा काय कमी अपमान झाला माझा ? "

" वाः का नाही ! "

उगारलेला हात खाली घेत नि उरलेले कपडे काढण्याच्या आठवणीन परत व्हराड्यात जात आप्पा म्हणाले,

" आपला बाळ म्हणजे काय लहान–सहान मनुष्य समजतो तू ? आता तो तर जवाहरलाल नेहरुइतका मोठा झाला आहे ! "

" मोठ्याच नाही म्हणत आप्पासाहेब ! "

बाळ व्हराड्याकडे तोड करून म्हणाला,

" प्रश्न युनिफॉर्मचा आहे. या एक–दोन दिवसात मला पैसे भरता आले नाहीत तर सर मला वर्गात बसू देणार नाहींत ! "

" नाही बसू देणार, तर सोड शाळा आणि बस घरात ! "

आप्पा सतापान जागच्या जागीं थरथरत म्हणाले,

" सागतोस कुणाला इथ ? माझ्या बापान काहीं माझ्यापाशीं इस्टेट ठेवली नाही तर तुम्हा लोकाचे सारे लाड पुरवायला हवा तितका पैसा तींतून वेळच्या वेळी वापरता येईल !

" मी सागून ठेवतों. माझ्याच्यान तुमच शिक्षण पुर होण शक्य नाहीं. माझ्या भरवशावर कुणी राहू नये. धरा मिळेल तिथ नोकऱ्या आणि भरा आपापली पोट ! सागता कुणाला एवढी मिजास ? "

बोलून चुकल्यावर आप्पाच्या लक्षात आल, आपण अनेकवचनी बोलायला नको होत म्हणून अर्थात् हे गजूच्या चेहऱ्याकडे लक्ष गेल्यावरच आप्पाना फार जाणवल. स्वतःच्या शस्त्रान ते स्वतःच दुखावले गेले. शेवटीं ही जखम स्वतःच कुरवाळूहि लागले. शक्य तितका स्वर काबूत ठेवून वातावरणावर बोलू लागले,

" मी काही स्वस्थ बसलेलों नाहीं ! मला शक्य तें सार करीतच आहे. हव तेव्हा वाटेल तिथ धडपडतोंच आहे ! पण तुमच्या दैवान नाही येत मला यश त्याला मी तरी काय करू ?

" काय मला वाटत नसेल की माझीं मुल शिकली पाहिजेत, मोठी झाली पाहिजेत–समाजात मानान जगली पाहिजेत म्हणून ?"

जेवण होईपर्यंत आप्पा असच बोलत राहिले त्याच बोलण बाळ–सुधाला किती समजल कुणास माहीत–पण ते गजूला इतक लागलं की, पेठ्याच्या रूम-बाहेर पडल्यापासून आतावर त्यान डोक्यात जो विचार घोळवत ठेवला होता तो–कुठल्या कुठ नाहींसा झाला कदाचित् आप्पाच्या संतापाच्या ओघात तो वाहूनहि गेला असावा.

या सर्वांमुळ आपल्या युनिफॉर्मबद्दल गजून घरात चकार शब्द काढला नाहीं. स्वतःशीच विचार करीत तो झोपी गेला.

# आठ

पिशवी खांद्यावर टाकून आप्पा घराबाहेर पडताच गजून पाणी भरण्याचं काम बंद केलं. तें पूर्ण होईपर्यंत केशव घरात राहील कीं नाहीं—या शंकेन गजूला हातातलं काम अर्धवट टाकावं लागलं. लगबगीन हातपाय धुवून तो जोशी-बुवांच्या पायऱ्या चढला.

केशव भिंतीला टेकून बसला होता. त्याच्या हातात एक 'कायम' डायरी होती. कॉपिंग पेन्सिलन तींत मुला–मुलींचे पत्ते सर्वभर लिहिले होते. एखाद्या रिकामटेकड्यान ती बारकाईन चाळली असती तर तींतून विदर्भातलं एकहि गाव सुटलं नसल्याचं त्याच्या लक्षात आलं असतं. या डायरींतल्या काही पत्त्यांवर फुल्या मारल्या होत्या. तसे तींत काहीं अगदीं नव्यानहि लिहिल्यासारखे दिसत होते.

रोज घराबाहेर पडण्यापूर्वी केशव ही डायरी चाळत बसत असे. ती चाळता चाळता त्याच्या डोक्यात काहीं तरी विचार येत असत. मग तो उत्साहासरशीं जोशीबुवांना त्यावेळचा ग्रहयोग विचारीत असे. तो अनुकूल वाटला तर केशव तडक तयारी करीत असे. देवापाशीं डोकं टेकवत असे. अंगात शक्य तितके

सभ्य कपडे घालत असे. बाहेर पडताना कुणी हटकू नये म्हणून घरातल्याना आधींच सागून देत असे. मग घराबाहेर पडलेला केशव कधीं कधी तर आठवडा–आठवडाभर चाळीला दिसत नसे. दुकानावर भेटत नसे. परते तेव्हा कधीं कधीं त्याच्याजवळ घराला दोन–दोन महिने पुरेल इतका किराणा वा धान्य राहात असे. कापड पण राहात असे कधी कधीं.

ग्रहयोग प्रतिकूल असतो तेव्हा मात्र तो सहसा ' डायरींतल्या पत्त्याकडे ' जात नसे धोपटमार्गी माणसासारख्या आपल्या नाणे बदलवून देणाऱ्या दुकानावर जाऊन बसत असे. त्याच्या दुकानावर सतत माणसा–पाहुण्याची ये–जा सुरू असे. पाहुण्याकडूनच चहा–विड्या होत असत. पाहुणे दुकानात नसत तेव्हाहि केशव आतासारखा डायरी चाळत बसलेला असे. एवढ्याचसाठी कदाचित् तो दुकानाच भाड भरत असावा. कारण त्याच दुकान फारस चालत नसे. शिवाय घर पाहून पाहुण्यामधला आपला सभ्यपणा कमी होईल अशीहि त्याची कल्पना होती तरीहि अधून–मधून काही पाहुणे त्याच्या घरात येऊन थडकत असत. ये–जा करणाऱ्याच्या बाबतींत–या वाड्यात वॉचमेकरच्या घरानतर जोशीबुवाच्याच घराचा क्रमाक लागत होता.

यावेळी, कशान तरी चेहरा खूष असलेल्या केशवला पाहून आपल दैव जोरावर आहे, अस गजूला वाटल. तो बोलण्यापूर्वीच, बोलण्यात पटाईत असलेला केशव म्हणाला,

" काय गजाभाऊ, कस काय येण केल ? "

सतरजीच्या रिकाम्या कोपऱ्यावर हात मारून तो म्हणाला,

" या, बसा असे ! "

गजू बसला. पण त्याच्याच्यान एकदम मुद्द्याच बोलवेना काहीं तरी बोलावं म्हणून त्यान जोशीबुवाची चौकशी केली. ते कुठ तरी कुडली काढायला गेले होते दुसऱ्यादा केशवच्या आईची चौकशी केली. ती कुठतरी सवाष्ण म्हणून गेली होती. तिसऱ्यादा गजू लीलाची चौकशी करणार होता; पण तीच त्याला घरातून रिकाम्या बादल्या घेऊन ओसरी ओलाडताना दिसली पायऱ्या उतरताना ती मोठ्यान म्हणत होती,

*" तो, तो, तो पाव्हणा बरा दिसतो—*

*" ह्यो, ह्यो, ह्यो पाहुणा चागला दिसतो ! "*

तिचा आवाज नाहींसा होतो न होतो तर केशवन डायरी खिशात घालताना गजूला विचारल,

" ह, बोला गजाभाऊ–कस काय येण केल ? "

" आलो होतों सहज ! "

" सहज, आणि तुम्हीं ? "

" . . "

" बोला, बोला कस येण केल ते ? "

" बोलूच म्हणता ? "

" वा ! का नाहीं ? अवश्य ! निःसकोचपणे बोला ! "

" मला तुमच्याशी एक काम होत ! "

" कसल बुवा ? "

" "

" बोला ना ? "

" मला काहीं पैसे हवे होते ? "

" तुम्हाला की, आप्पासाहेबाना ? "

" अ मलाच "

" कशाला हो ? तुम्हाला एवढ काय काम पडल पैशाच ? "

" हवे होते, युनिफॉर्मसाठीं "

" म्हणजे, तुमच्यावर देखील ही आपत्ति आलेली दिसते ? "

" हो ना हो—"

" म्हणजे, सगळीकडेच ही स्थानिक साथ पसरलेली दिसते काल की परवा अण्णासाहेब सागत होते की आमच्या लीलानहि युनिफॉर्मच्या नावान पैसे नेले म्हणून ! "

" हो. नेलें असतील. सरकारन ठरवल आहे म्हणतात की, शाळेतल्या प्रत्येक विद्यार्थ्याला सारखा पोषाख असायला हवा म्हणून ! "

" सरकार आता काय ठरवील, याचा काहीं एक नेम राहिला नाहीं–गजाभाऊ ! "

राजकारणातलं आपल ज्ञान आणि मत पाजळायला गजूखेरीज दुसर ठिकाण नाहीं अस नेहमीं मानणारा केशव आता म्हणत होता,

" साल सरकार स्वतः वाटेल तो षौक फर्मावतें अन्, तो पुरवायला पैसा मात्र जनतेचा वापरते.

" अहो, षोक नाहींतर मग काय गजाननराव ?

" ए सी सी. साठीं कपडे शिवा, त्याना इस्तरी, स्टॅार्च करायला पैसा लावा, विद्यार्थ्योना दिल्या जाणाऱ्या अंड्याचे पैसे द्या, शिवाय डिफेन्स–फड वेगळा, माजी सैनिकाना मदत वेगळी. शिक्षक–दिनाला मदत वेगळी. स्मॉल पॉक्स की काय म्हणतात–त्याला मदत करावी आम्हीच. टी बी. निर्मूलनासाठीं मदत आमची. अल्पबचतीची तिकिट विकत घ्या आम्हींच हज्जार भानगडी आहेत साल्या ह्या सरकारच्या आणि त्याच्या शिक्षणाच्या

" अहो, चिडू नको तर काय करू ?

" आता तुम्हीच सागा बर, एखाद्या आपल्यासारख्या गरीबाचीं चार-पाच मुल एकदम शाळेत शिकत असली तर त्या बिचाऱ्यान एवढ्या साऱ्याना पैसा आणायचा कुठला ?

" हे झाल मुलाच्या बाबतींत. मुलीची तर गोष्ट याहिपेक्षा बिकट आहे गजाननराव ! त्याना म्हणे आता शाळेत गृहशास्त्र शिकवताहेत ! त्याना काय काय लागत माहीत आहे ? नबरच रेशीम लागत. मॅटिग की काय म्हणतात तो क्लॉथ लागतो. सुया लागतात. लोंकर लागते. रेशीम लागत. विणकाम करायच ते–ते– त्याला काय म्हणतात–ते नाही हो धनगड ? हो–हो, रीग–ती लागते. जाळीं, सिल्क, उलन काय, मला वाटते सार स्टेशनरी दुकान लागत त्याना

" शिवाय सरकार म्हणत, स्त्रियानीं शिकल पाहिजे. सागा बर असा कोणता बाप आहे की जो साधा कारकून असल्यावर आपल्या चार मुलीना मॅट्रिक करी-पर्येत जगू शकेल ? "

एरव्हीं गजून हें ऐकलहि नसत. कोणत तरी काम काढून मध्येंच निघून गेला असता. पण आता बिचाऱ्याला सार ऐकाव लागल. तरीहि वेळेच्या जाणिवेन शेवटी चुळबुळू लागला. म्हणून केशव थाबला तसा घाई करीत गजू म्हणाला,

" बर, माझ काम होऊ शकेल काय ? "

" किती पैसे हवे होते तुम्हाला ? "

" हवे होते सोळा–सतरा रुपये ! "

शिक्षणाच्या कामीं गजूला लागलेली बहुतेक मदत करावी, अस त्या घरान ठरवून टाकल होत, तरीहि अशा वेळीं प्रत्येक माणूस पडतो तस विचारात पडत केशव म्हणाला,

" पण हे पैसे तुम्ही देणार कसे ? "

" दर महिन्याला पाच–पाच रुपये देत जाईन मी. "

" ते झाल. पण कुठन ? "

" आप्पासाहेबापासून "

केशव परत विचारात पडला, तो कदाचित् पाण्याची खेप घेऊन लीला ओसरीतून पसार होत असल्याच पाहून असेल किंवा कदाचित् तिला पाहिल्या-नतर गजूकडे पाहाताच त्याच्यातल्या कोणत्या तरी सैल विचाराना गाठ पडायला लागत असलेल्या अवधीमुळ असेल. पण ती पडताच मात्र त्यान बसल्या जागेहून आपल्या टागत्या कोटात हात घातला. दुकानासाठी वापराव-याच्या चागल्या नोटातून गजूच्या गरजेपुरते पैसे काढले. त्याच्या स्वाधीन करताना म्हणाला,

" राग मानणार नसाल, तर एक सागतो, गजाभाऊ ! "

" सागा ना ? "

पूर्वीपेक्षा उत्साही आवाजात गजू म्हणाला,

" तुम्ही सागाल ते वाईट थोडच असेल तर मला राग येईल "

" ते झाल म्हणा–"

केशव म्हणाला,

" हे सार तुमच्या समजण्यावर अवलबून आहे. तसे तुम्ही वयाच्या मानान समजदार आहात म्हणूनच केवळ तुम्हाला मी सागतो आहे

" माझ्या म्हणण्याचा अर्थ, तुम्हाला शिकायचच असेल–अर्थात् यात संशय नाही म्हणा ! तेव्हा तुम्ही एखादी पार्ट–टाईम सर्व्हिस का नाही बघत ?

" माझ्याजवळ तुम्ही पैसे मागायला आले म्हणून नाहीं म्हणत बर हे ! नाहीतर उगाच घ्याल आपला गैरसमज करून—"

" मुळीच नाहीं—"

गजू एकदम उत्साहान म्हणाला,

“ सागितल तर तुम्हाला खोट वाटेल, पण मी खरोखर काल एका प्रेसमध्यें काम मिळावायला गेलो होतो ”

“ मग ? ”

“ नाही म्हणतात ! ”

“ अस्स ”

“ म्हणून मलाहि वाटत, एखादी नोकरी बघावी. शाळेचा सारा वरखर्च निभेल. थोडीफार आप्पाना मदत होईल. आहे तुमच्या लक्षात मला करता येण्यासारखी एखादी—नोकरी ? ”

“ पण तुम्हाला कसली नोकरी हवी आहे ? ”

“ मिळेल ती—”

“ तरीहि तुम्हाला मिळत नाही ? ”

“ हो ना शाळा सुरू झाल्यापासून आप्पाच्या नकळत मी पुष्कळ ठिकाणी जाऊन पाहिल. पण माझ्यासारख्याचा एक तर लोकाना विश्वास येत नाही. पुष्कळसे लोक नोकरी नाहीच म्हणून सागतात—”

“ बर, तर आधी मला हे सागा की, तुम्ही कोणती नोकरी करू इच्छिता ?”

“ सागितल ना, की मिळेल ती नोकरी करायची माझी तयारी आहे म्हणून, या शिक्षणासाठी ”

“ तर मग मी सागेन ती नोकरी करण्यात तुम्हाला कमीपणा तर वाटायचा नाही ना ? ”

“ नाही—नाही. मुळीच नाही. शिकण्यासाठी मी काय वाटेल ते करायला तयार आहे बोला, कोणती नोकरी आहे ? ”

“ आपल्या इथला क्लब माहीत आहे ना तुम्हाला ? ”

“ तो—तो, पेन्शनर—”

“ तोच, तो रावळेच्या बिल्डिगमध्ये आहे तो. तिथ जाऊन माझ नाव सागा, की तुम्हाला नोकरी मिळालीच म्हणून समजा .”

“ खरच. ? ”

“ शभर टक्के खात्री ! ”

“ पण नोकरी कोणती आहे ? ”

“ त्याच तुम्हाला काय करायच ? ”

भाव खात केशव म्हणाला,

"तुम्ही कोणतीहि नोकरी करायला तयार आहात ना? तर मग–"

मिळणाऱ्या नोकरीत कोणते काम करावें लागणार याविषयी गजूची कितीहि उत्सुकता असली तरी केशवच्या या वेळच्या ताठ्यामुळ आणि गजूवरील त्याच्या ताज्या उपकाराच्या ओझ्यामुळ गजूला आपली उत्सुकता दुमडून ठेवावी लागली.

## नऊ

पोतनीसाच्या टेबलाशी जो बाक होता त्यावर आप्पा देशकर एकटेच बसले होते. आतापर्यंत त्याच्या शेजारी बसलेले राजाभाऊ पाध्ये आता पोतनीसाच्या पुढ्यात उभे होते. त्याच्या हातीं पगाराची रक्कम होती तिकीट लावलेल्या पगार-पटावर ते सही करीत होते. पगारासाठीं आपला क्रम लावलेले आप्पा सहजपणान आजूबाजूला बघत होते.

त्या कार्यालयाच सारच वातावरण बदलल्यासारख दिसत होत. आपल्या कामातून कुणीच मान वर करण्याच धाडस करताना दिसत नव्हत. एखाद्याला कामानिमित्तानहि बोलायच झाल तर, एक तर तो दुसऱ्याच्या कानाशी लागून बोलत होता – किंवा आपण कामानिमित्तान बोलतो आहों हें भासविण्या-साठी फार मोठ्यान तरी बोलत होता. हीं दोन्ही प्रकारचीं बोलणीं करताना आणि ती संपेपर्यंत बोलणारा व ऐकणाराहि आपापला एकेक कान आणि डोळा बाजूच्या कंपार्टमेंटवर ठेवत होता.

पूर्वी भाऊसाहेब बसत असत त्या टेबलभोवती आता प्लायवुडच पार्टिशन

बसविण्यात येत होत. त्याच्या कमरेइतक्या उचीवर अन् चारीकडे हल्ली धुरकट काचा बसविण्याच काम जोरात सुरू होत. पार्टिशनच्या दाराला पुरुषभऱ्याच्या उचीवर बेल्जियमची अडाकृति काच बसवून झाली होती. दाराला स्प्रिग होता आणि त्यामुळ ते आतल्यासारखच बाहेरदेखील उलवल – काढल जाऊ शकत होत. पार्टिशनच्या सजावटीच काम अपूर्ण असल तरी दाराशीच्या लाकडी स्टूलवर नवा 'युनिफॉर्म' घातलेला देवराव बसला होता. त्याच्या दडावरील पट्ट्यावर शाम छापखान्याच नव नाव 'शाम प्रिटिग ब्यूरो' अस इग्रजीत छापल होत.

कित्येक दिवसानीं आप्पा या मजल्यावर येत असल्यान त्यांना सार नव वाटत होत. कारखान्यात कोणतहि काहींहि नव होत असल्यास इतर ठिकाणी जशी त्यातली झाडून सारी माणस हें नवेपण पाहण्यासाठी कधी स्वतःच काम सुरू करण्यापूर्वी तर कधी ड्यूटि सपल्यावर ( कुठ कुठ अन् काही काहीं माणस तर हातातल काम टाकूनहि ) येत, जमत, पाहात व कधी कधी सल्ल्याची देवाण-घेवाण करीत, तस इथ कधीं झाल नव्हत उलट या खात्यातला माणूस त्या खात्यात गेला आणि राउडच्या वेळीं ते बाबासाहेबाच्या लक्षात आल तर त्याला योग्य तीं 'एक्स्प्लेनेशन्स' द्यावी लागत हे आणि सर्व प्रेसच नूतनीकरण बाबासाहेबानी चार्ज घेतल्यापासून सर्व कामगाराना माहीत असल्यान ही नवी व्यवस्था आप्पानाहि अगदीच नवी होती.

आप्पाचा क्रमाक आल्याच पाध्येंनी सागताच ते उभे झाले. मोठ्याच उत्सुकतेन पगार-पटाशीं गेले. पण आकड्यान त्याना कोकडच केल. ते एकदम म्हणाले,

"फक्त सतरा रुपये बावन्न पैसे ?"

"हो. तेवढेच."

तरी आप्पा पोतनीसच्या तोंडाकडे बघत राहिले. जराभरात म्हणाले,

"हिशोब माझ्या लक्षात नाहीं आला "

"सागतो —"

म्हणत पोतनीसन रजिस्टर्सच्या एका शेल्फमधून दुसर एक रजिस्टर ओरबाडल, नेमक पान काढल्यावर तो म्हणाला,

"तुम्हाला पे किती आहे ?"

" एकशे दहा — "

" हो ना ! "

पोतनीस म्हणाला,

" त्यातले ब्याण्णव रुपये अठ्ठावीस नवे पैसे रद्द केलेल्या ' बाई विना बुवा ' या पुस्तकाच्या फॉर्मबद्दल आपल्या नावें टाकण्यात आले "

पुढला हिशोब आप्पाना ऐकू येत नव्हता शारीरिक दृष्टयाहि ते तोल न सावरू शकण्याइतके गळून गेले होते. बाकाचा आधार घेतला होता हिशोब सागून सपवल्यावर पोतनीस त्याच्याकडे समाधानान पाहू लागला. मग हिशोब बरोबर असल्याबद्दल समति मागू लागला नजरेनच. त्यामुळं आप्पाना पुटपुटाव लागल,

" तर अस्स आहे म्हणता "

" हो "

" पण भाऊसाहेबानी तर हे पैसे न कापण्याबद्दल बाबासाहेबाना सागितलं होत ? "

' असेल. पण माझ्याकडे तस लेखी काही आलेल नाही. त्यामुळ मला हिशोब हा असाच करावा लागला "

चीड न धरवून आप्पानी आकाडताडव सुरू केल,

" अहो, पण माझे पैसे कापावेत अस तरी कुठ तुम्हाला लेखी आल होत ? "

शात पण छद्मी सुरात पोतनीस म्हणाला,

" दाखवतों — "

मग त्याच थडपणान त्यान आपल्या कुलूपबद कपाटातून एक चिकट फाईल काढली तींतल नेमक पान काढून फाईलसह ते आप्पापुढ धरल. आप्पा देशकर हवा तो कागद वाचू लागले,

> " आपल्या फर्ममधील प्रुफ-रीडर आत्माराम देशकर यानी तपासलेल्या ' बाई विना बुवा ' या कादबरीच्या जितक्या फॉर्म्समध्ये कमीत कमी सोळा चुका सापडतील तितके फॉर्म्स रद्द करण्यात यावेत आणि त्या फॉर्म्सला लागलेला सर्व खर्च त्याच्या नावें घालावा रद्द होणाऱ्या फॉर्म्सच्या छपाईचा खर्च आप्पा देशकराच्या पगारापेक्षा अधिक होत असल्यास

निम्मा खर्च फर्मच्या नावें ' वेस्टेज ' खात्यात घालावा. "

सदर मजकूर शुभ्र कोऱ्या कागदावर स्वच्छ अक्षरात टाईप केला होता. खाली ओळखू न येणारी हिरव्या शाईतली नाजुक स्वाक्षरी होती. तिच्या खाली कसात बाबासाहेबाच नाव स्पष्ट टाईप केल होत. हे सार पाहून थक्क झालेल्या आप्पाकडे खोलवर – बारकाईन बघत पोतनीस विचारीत होता,

" आता पटल की नाही ? "

" अहो, बाबासाहेबानी ऑर्डर्सच अशा काढल्या आहेत की, फर्ममधला कोणताहि व्यवहार तोंडी असता कामा नये. अर्थात् तुमच्यापर्यंत अद्याप त्याचा कारभार पोंचला नसल्यान तुम्हाला हे माहीत असण शक्य नाही म्हणा — "

थाबून तो म्हणाला,

" शिवाय तुम्हीं पडलीं सरळ माणस ! "

त्थ मात्र नकळत आप्पाकडन त्याच्याकडे रोखून पाहिल गेल. तशी त्यान त्याच्यावरली नजरच काढली फाईल कुलुपात ठेवू लागला. मग पगारपट आप्पापुढ सरकवत म्हणाला,

" ह, आटोपा लवकर ! "

" अहो, पण एवढ्या पैशात माझ कस — ? "

" तो प्रश्न माझ्या स्वाधीन नाही — "

त्यान बोलायला सुरुवात केली.

" जे काय सागायच ते एक तर लेखी द्या किंवा कपार्टमेंटमध्ये सागा — "

आप्पा आणखी चिडले पण जबाबदारीच्या जाणिवेन त्याच्याच्यान कागद – पेनला शिववल नाही. पण राहवलहि नाही – तेव्हा तरारा चालत कपार्टमेंटकडे आले. अशाहि स्थितींत त्याना ओल्या लाकडाचा आणि स्प्रिरिटचा वास जाणवला. लाकडाचा कुरळा कीस अन् काचाची अनेक कोनी कात्रण तुडवत ते कपार्टमेंटला भिडले. नेमका त्याच वेळीं दाराशीचा स्टूल रिकामा असल्यान ते धसमुसळेपणान एकदम घुसू शकले बाबासाहेबाच्या टेबलला ते टेकीपर्यंत कपार्टमेंटच दार त्याच्या अवस्थेसारख आत – बाहेर करीत होत.

आप्पा थाबतात न थाबतात तों बाबासाहेबानी भुवया चढवत त्याच्याकडे पाहिल खर नर ओरडायच तेवढ्यान ओरडायला आपला आवाज धोका

देईल की काय याचा ते अदाज घेत होते. तो येईपर्यंत आप्पानी स्वतःला बोलण्याइतक काबूत आणल होत. पण त्याच्या तोडून काहीं निघण्यापूर्वी बाबासाहेबच ओरडले,

"गेट आऊट!"

"म म मला तुमच्याशी!"

"आय से, यू गेट आऊट!"

"पण "

"सागतो ते करा पहिल्यादा—"

खुर्चीतून उठत नि एक हात बाहेर उडवत बाबासाहेब म्हणाले,

"पहिल्यादा तुम्ही बाहेर व्हा!"

यावर आप्पासाहेब बोलले नसले—तरी हललेहि नाहींत. इकडे एका हातान कॉलबेलच बटन पुश करीत अन् परत दुसरा हात बाहेर उडवत आप्पाना बाबासाहेब म्हणत होते,

"आता तुम्ही होताहात बाहेर, की धक्के मारून काढायला लावू?"

आता मात्र रेगाळत–रेगाळत का होईना, आप्पा बाहेर होऊ लागले. त्याच्याच गतीन बाबासाहेबहि त्याच्यावर चालत होते. आप्पा पूर्णतया रूमच्या बाहेर होताच बाबासाहेबाचा चेहरा बदलू लागला. भुवया कपाळावरून डोळ्यावर आल्या. आवाजहि स्वाभाविक करून ते म्हणाले,

"थाबा तिथ!"

आप्पा थाबले.

या वेळीं सार कार्यालय त्याच्याकडे बघत होत. एकटा पोतनीस हनुवटीला डॉट-पेनच टोक लावून गालातल्या गालात हसत असला तरी बाकीची सारी फासावर अडकवल्या जाणाऱ्याकडे बघाव, त्या हळहळीन आप्पाकडे बघत होती.

इकडे तालीम घेताना दिग्दर्शक शिकवतो त्या सुराविर्भावात बाबासाहेब आप्पाना म्हणत होते,

"आता म्हणा, मे आय कम इन् सर?"

"मे आय कमिंग, सर?"

"थाबा—"

आत जाताना बाबासाहेब म्हणाले,

" थाबा, इथच."

मग घाईन बाबासाहेब आत आले. खुर्चीवर बसले. दारातल्या आप्पाकडे बघत म्हणाले,

" ह, म्हणा आता—"

" मे आय कमिंग, सर ?"

कसेबसे आप्पा आत आले. तेव्हा अगदी काहींच झाल नाहीं, अशा चेहऱ्यान बाबासाहेब आपल्या कामात व्यग्र दिसत होते. आप्पाकडे न पाहता म्हणालेहि,

" यू कॅन सीट!"

पण आता आप्पाची खुर्चीत बसायची हिमत होण शक्य नव्हत. ते उभेच राहिले. तरी बाबासाहेब म्हणत होते,

" यावर, जर तुम्हाला खुर्चीत बसायच नसल तर काय म्हणायच असत, माहीत आहे ?"

आप्पाना मान हलवावी लागली,

बाबासाहेबाना तेंच हव होत ते म्हणाले,

" थॅक्स्! एक्स्क्यूज सर—"

तेच म्हणाले,

" म्हणा! पाहता काय ?"

आप्पाना हेंहि म्हणाव लागल.

बाबासाहेब म्हणाले,

" या सर्वांना काय म्हणतात, माहीत आहे ?"

"          "

" याला म्हणतात, मॅनर्स! समजल."

आप्पानी मान हलवली.

" ह, आता बोला, तुम्हीं कशासाठीं आला होतात, माझ्याकडे ?"

अशा प्रसगानतर आपली तक्रार माडण किती अवघड आहे हें कधींहि अनुभवास न आलेल्या बाबासाहेबानीं आग्रहच असा धरला कीं, त्यामुळ आप्पाना तोंड उघडण हें आत्मसरक्षणासाठीं धडपडण्याइतक महत्त्वाच वाटल. त्यामुळ जेमतेम तोंडातून आवाज काढत आप्पानी आपली तक्रार सागण्याचा

प्रयत्न केला. ती पुरती ऐकण्यापूर्वीच बाबासाहेब म्हणाले,

" बर मग ? तुमच म्हणण काय आहे ? "

" म्हणण काही नाहीं. माझ्या पगारातली एवढी रक्कम कापली गेली तर माझ—"

" हा विचार तुम्ही प्रुफ तपासताना करावयास हवा होता—"

" पण होऊ नये ते आता झाल आहे. त्याचा मला पश्चात्ताप वाटतो, बाबासाहेब ! "

" वाटत असेल—"

बाबासाहेब म्हणाले,

" नुसत्या पश्चात्तापान कुठ झालेल नुकसान भरून निघत असत काय ? यू. नो. च्या चिटणिसाच्या विमान-अपघातातून वैमानिक वाचला असता आणि त्यान जगापुढ नुसता पश्चात्ताप व्यक्त केला असता तर चिटणिसाची प्राणहानि भरून निघाली असती, अस वाटत का तुम्हाला ? "

" तस नाही म्हणा. पण मी सर्वस्वी याच पगारावर अवलबून आहे. नुसत बावीस रुपये घरभाड द्याव लागत मला ! "

बाबासाहेब गप्प पाहून आप्पा धाडसावत म्हणाले,

" याविषयी मी भाऊसाहेबाशी बोल्लो असताना त्यानी याग्वेळी तरी पैसे कापले जाणार नाहीत, अस आपल्यासमोर—"

" हो, आठवत. तुम्हाला हे आठवत, त्याअर्थी त्याच दिवशी मीहि भाऊसाहेबाना माझ्या व्यवहारात ढवळाढवळ करायची नाही–अस सागित-ल्याचहि तुम्हाला आठवत असावच ? "

आप्पा गप्प झाले.

बाबासाहेब म्हणत होते,

" तेव्हा ठरल्याप्रमाण आणि माझ्या शिस्तीप्रमाण तुम्हाला हा दड सोसलाच पाहिजे

" आणखी काहीं ? "

आप्पा मोठ्या धाडसान म्हणाले,

" पण बाबासाहेब; माझ्या प्रपचाच कस—

" माझ्या म्हणण्याचा अर्थ, मला महिनाभर खर्चायला पैसा राहणार नाही !

तेव्हा आपल्याला कापायचीच असली रक्कम तर निदान दरमहा थोडी–थोडी तरी कापावी–एवढी माझी विनति दुसर काहीं नाहीं ."

" हे प्रकरण अगदीं वेगळ आहे याचा नि त्याचा काही एक सबंध नाहीं ही सर्व रक्कम तुम्ही याच पेमधून कापून घ्यायला हवी.

" आता राहिला तुमच्या खर्चाचा प्रश्न त्यासाठी तुम्ही डिपार्टमेंटच्या थ्रू फर्मकडे ॲडव्हान्सची वेगळीं डिमाड करा. फर्म तिचा सहानुभूतिपूर्वक विचार करील "

यातून दिलासा मिळवून आप्पा म्हणाले,

" फर्म मला नक्की ॲडव्हान्स देऊ शकेल काय ? "

" ते मला आत्ताच नाहीं सागता यायच ! या क्षणीं तुम्हाला मिळेल तेवढ पेमेन्ट घेतल पाहिजे तुम्ही जाऊ शकता "

तरीहि आप्पानी तोड हलविण्याचा प्रयत्न केला. निदान तसं वाटून बाबासाहेब म्हणाले,

" डोन्ट बॉदर मी. यू मस्ट गो नाऊ ! "

कपार्टमेंटबाहेर पडलेल्या आप्पानी परत पोतनीसाचा टेबल गाठला. सतरा रुपये बावन्न नया पैशाची रक्कम खिशात घातली. एकशे दहा रुपयावर सही केली. बाकीच्या पैशाची प्रेसकडून तिकीट लावलेली पावती घेतली. तीहि त्याना मिळाल्याची पोतनीसन स्थानिक टपाल-बुकात नोद करून त्याची सही घेतली.

आप्पा देशकर घरीं जाण्यासाठीं चौकावर बसची वाट पाहू लागले. नेहमीं-पेक्षा त्याना ऑफिसमधून बाहेर पडायला वेळ झाल्यान बसहि लवकर मिळत नव्हती. त्या भागात येणाऱ्या बसेसच प्रमाण आता कमी झाल असून वाट पाहणाऱ्याची राग मोठी होती. आप्पा देशकर सर्वांत शेवटीं उभे होते.

# दहा

युनिफॉर्म मिळाल्याबद्दल गजून रजिस्टरवर सही केली. मग पेठ्याना नमस्कार करून तो त्याच्या रूमबाहेर पडला. व्हराड्यात आला. बाळसाठीं आवारभर नजर घुमवत पाहू लागला. बाळच्या सुपूर्द युनिफॉर्म करून गजूला आपल्या कामाकडे जायच होत बराच वेळ वाट पाहून शेवटीं त्यान बाळबद्दल चौकशी केली. युनिफॉर्म मिळाल्याच्या आनदात तो गजूला विसरून सोबत्यासोबतच घराच्या वाटेन लागला होता. त्याच्या घराकडे जाणारा दुसरा कुणी सोबती दिसतो की काय हे पहात गजून विचार पक्का केला. विचारानिशी त्यान कपडयाची घडी काखोटीत मारली. एका काखोटींत त्यान पुस्तकाचा गठ्ठा आवळून धरला होता. ह्या साऱ्या लवाजम्यानिशीं त्यान आपली ठराविक वाट धरली.

पाहता–पाहता गजू क्लबच्या आवारात आला. तें भल मोठ आवार तारेच्या कुपणान वेढल होत. कुपणा–कुपणान हिरवीकच मेंदी होती. ती कातीव, कोरीव अन् गजूच्या उचीइतक्या उचीची होती. आवारात, शोभेशा ठिकाणी इग्रजी झाड होतीं. त्यापैकी ज्याची वाढ पूर्ण व्हायची होती त्याच्या बुडाशी चार–पाच इच

उचीची अन् मातीची आळीं होतीं. काहींभोवतीं नारेची तर काहींभोंवतीं वास्याची कुपण होतीं. त्या आतली बहुतेक सारी झाड बॉब-कट केलेल्या आणि फ्रॉक घातलेल्या बालिकासारखी दिसत होतीं.

आवाराच्या मधोमध जुनाट बाधणीची इमारत होती. दोन्ही बाजूना वर्तुळाकार खोल्या असलेली. त्या खोल्याचें एकेक दार आणि तीन–तीन पायऱ्या समोरच्या भागात उतरत होत्या. आतल्या बगलेंतलीं दार दोन्ही खोल्याना जोडणाऱ्या लाकडी जाळीच्या व्हराड्यात उतरली होतीं. हा व्हराडा साधारणतः चाळीस तरी फूट लाब असावा. लाकडी, जुनाट रिपाच्या जाळीवर द्राक्ष, जास्वद वगैरेचे वेल रेललेले होते.

हॉलमध्ये जुनाट घडणीच ऐषारामी फर्निचर पडल होत. हॉलच्या एका कोपऱ्यात. मधल्या टेबलवर नवीं–जुनी, इग्रजी–मराठी नियतकालिक इतस्ततः पसरली होतीं एकीकडे पिग-पॉगचा टेबल होता. एका कोपऱ्यातल्या दोन भागापैकीं एकात कॅरम आणि दुसऱ्यात बुद्धिबळ खेळण्याची व्यवस्था होती. हॉलच्या आणखी एका कोपऱ्यात बैठी बिछायत होती. गाद्यावर भितीला टेकून लोड टाकले होते. यापैकीं बहुतेक सर्व ठिकाणी तारुण्य ओलाडलेली माणस पसरली होती.

या सर्वातून नेमके क्लबचे सेक्रेटरी गजून हुडकून काढले. त्यासाठीं त्याला दोघा-तिघाजवळ चौकशी करावी लागली होती.

सेक्रेटरी लोडाशीं पसरले होते. त्याच्या एका गुडघ्यावरल्या दुसऱ्या पायाचा तळवा रेडिओंतल्या शास्त्रीय सगीताच्या तालावर हलवला जात होता. मधून मधून गुडघ्याखालचाहि पाय ठेका धरीत होता. गजूचा तिथ टेकण्याचा हेतू ऐकून त्यानी फार मोठ्या अधिकाऱ्याचा आव आणला. त्याच सुरात विचारू लागले, “ तुझ नाव काय ? ”

गजून सागितल.

“ तुला इथ कुणी पाठविल ? ”

हेहि गजून सागितल. यावर मात्र ते म्हणाले,

“ मला तर केशवला सागून बरेच दिवस झालेत ”

“ हो त्यानी मला सागितल त्याच दिवशीं मी इथ आलों होतों पण तेव्हा आपण कुठ परगावीं गेला होतात तरी मी इथ रोज येऊन बघत असतो ”

" बर पण इथ तुला कोणकोणतीं काम करावीं लागतील, त्याची कल्पना आहे काय ?"

" नाहीं. पण तुम्ही सागाल तीं सारी काम करायची तयारी आहे माझी——"

" म्हणायला सोप आहे "

ते सोबत्याची समति घेऊ लागले, " काहो क्षीरसागर ?"

मग गजकडे बघत म्हणाले,

" पण लवकरच पळ काढतात इथून नोकर. तेव्हा आधीं पूर्ण विचार कर आणि मग भेट वाटल्यास मला "

सधि लाबतेस पाहून गजू हिरमुसला न राहवून म्हणाला,

" मी माझ्या परीन विचार करूनच आलो आहे. केशवरावानी मला इथल्या कामाची सपूर्ण कल्पना दिली आहे!"

" मला नाहीं वाटत!"

सेक्रेटरी म्हणाले, " त्या केशवन काहींतरीच सागितल असेल तुला तेव्हा परत "

पण गजू पुटपुटत होता,

" मी कोणतहि काम करण्याच्या हेतून इथ आलो होतो. मी एक गरीब विद्यार्थि आहे. तेव्हा आपल्याकडे नोकरी मिळाली तर माझ्या शिक्षणाला थोडा-फार आधार होईल "

" ठीक आहे. तर मग इथ सकाळीं चार वाजता याव लागेल "

" रोज ?"

लक्षात येताच गजू म्हणाला,

" येईन-येईन. मी रोजच यावेळीं उठत असतों "

" नतर विहिरीच पाणी ओढून सर्व झाडाना टाकाव लागेल!"

" हो, टाकेन."

" मग स्टेशनवरून पेपर्स आणावे लागतील "

" हो, आणेन——"

" पण सायकल आहे तुझ्याकडे ?"

सायकलच काम आपण पायानी निभावू शकू असा, निदान या क्षणी तरी गजूला विश्वास वाटला. पण हे सेक्रेटरीना पटणार नाहीं-म्हणून तो म्हणाला,

"हो, आहे."

"मग काहीं हरकत नाहीं

"नतर–नतर, हो–ही सर्व इमारत झाडून काढावी लागेल "

तेच त्याला न्याहाळत म्हणाले,

"रोज–दोनदा!"

"दोनदा?"

"म्हणजे? तू जेवण नसतो करीत काय रोज दोनदा?"

"काढीन––"

"सायकाळी साडे-पाचच्या आत माझ्याकडून किल्ल्या आणून क्लब उघडून द्याना लागेल मेंबर्सना मग मेंबर्स आल्यावर त्यानी सागितलेली सारी कामं करावी लागतील "

"कोणती?"

"हीच, कुणाला बुद्धिबळ काढून दे, कुणाला कॅरम मांडून दे, कुणाला पाणी आणून दे तर कुणाला बाहेरून चहा, कॉफी किंवा पान, सिगारेट आणून दे– वगैरेसारखी—'

"हो हे सारं करीन मी "

"रात्री दहा-साडे दहापर्यंत तुला इथ राहाव लागेल मी आलो नाहीं किंवा मधूनच गेलो तर क्लबच्या चाव्या माझ्या घरी पोचत्या कराव्या लागतील. एवढ्या साऱ्यातून तू टिकलास आमच्याकडे आणि सेक्रेटरी बदलले तर तुला त्याच्या म्हणण्याप्रमाण काम कराव लागेल

"आहे कबूल?"

"हो "

"तर बोल, पगार काय घेशील?"

"द्या तुमच्या नियमाप्रमाण –– "

"आमचा काहीं नियम नाहीं आम्हाला तर वाटत की कुणी फुकटात मिळाला तर बर आहे करशील तू हे काम फुकटात?"

आपल्या विनोदावर जवळ जवळ तेच हसले. म्हणून हसलेल्या गजून मान हलवली. तसं ते म्हणाले, "मग बोल, काय पगार हवा तो?"

जीवनातल पैशाच मोल अजून गजूला माहीत नव्हत. निदान कोणत्या कामाला

किती मोबदला मिळतो हें तरी त्याला माहीत नव्हत. सवड असती तर तो याबाबतींत कुणाचा तरी सल्ला घेऊन आला असता. पण अशी शकासुद्धा तोंडातून निघताच हातातल्या पक्षासारखी सधि उडून जाईल अस त्याला वाटल.

या दरम्यान त्यान आपल्या गरजाचा हिशोब केला. साधारणतः मॅट्रिक होईपर्यंत आपल्या दरमहा किती खर्च येईल याचा त्यान स्वतःच्या ऐपतीनुसार अदाज काढला व तो जसाच्या तसा तोडाबाहेर काढल्यास त्यात व्यवहार या नात्यान परत काहीं कमी होऊ नये म्हणून त्यान आपली अधिकात अधिक अपेक्षा व्यक्त केली तो मोठ्याच धाडसान म्हणाला,

"तीसेक रुपये मिळाले तर बर होईल!"

सेक्रेटरींनी आजूबाजूला पाहिल. त्यासरशीं दृष्टादृष्ट झालेल्या क्षीरसागराना ते म्हणाले, "ही लुक्स टू नीडी —"

मग गजूला म्हणाले,

"काहीं हरकत नाहीं. तू मागतोस तेवढा पगार आम्ही तुला देऊ शकू. तू उद्यापासून कामावर येऊ शकतो पण त्यापूर्वी आम्हाला अर्ज दे एक लिहून. त्यावर आठ दिवसापूर्वीची तारीख टाक तो आम्हीं या रविवारीं सभेपुढे माडू आणि तुला नेमणुकीची ऑर्डर देऊ"

यामुळ गजूला यात आणखी काहीं गोंधळ असल्याची, होण्याची शक्यता वाटली. तो भीत भीत म्हणाला,

"कामाला तर उद्यापासन यायच ना?"

"हो – हो. पण फॉर्मरली अर्ज असाच करायचा"

आणि परत सेक्रेटरींनी गजूला आपली प्रथा समजावून सागितली त्याच्या बोलण्यावर गजूचा विश्वास बसेना. पण अविश्वास दाखविण्याच धाडस त्याच्यात नसल्यान सधि सापडेल तेव्हा वारवार विचारीत होता,

"पण कामावर तर उद्यापासनच —"

शेवटी हे न सोसवून सेक्रेटरी एकदा म्हणाले,

"अरे? छप्पन्नदा तेच ते काय विचारतोस सारखा? माझ्या बोलण्यावर तुझा विश्वास दिसत नाहीं —"

तेव्हा गजू खराखुरा आनदित झाला

# अकरा

आनंदाच्या उकळ्या दाबत – दाबत गजू वाड्यात शिरला. त्यावेळी आप्पा घरीं आले असतील असं त्याला वाटलं होतं तो घाईनं आपल्या पायऱ्या चढला तेव्हा आप्पाच्या टेबलवर बाळ आपल्या युनिफॉर्मला इस्तरी करण्यात गुतला होता. खरं तर तो तो पोषाख लाडवत होता जाणता झाल्यापासून इतक्या भारी कापडाचा पोषाख त्याला आज प्रथमतः मिळाला होता. घरी आल्यापासून बाळनं तो पोषाख वाड्याभरातल्या मुलांना दाखवला होता आता आप्पासाठीं म्हणून त्यानं त्याच्या इस्तरीचं काम रेंगाळत ठेवलं होतं. तोहि आप्पाची वाट बघत होता.

गजूनं आप्पाबद्दल अर्धवट चौकशी केली कपड्यात गुतलेल्या बाळनंहि अर्धवटच उत्तर दिली. त्यावरून आप्पा घरी आले नाहींत हे गजूला जाणवलं. पण ते अद्याप का आले नाहींत, याबद्दल त्याच्याच्यानं पूर्ण विचार करवला गेला नाहीं कारण त्याच्यात शिगोशीग भरलेल्या उत्साह या विचारांना थाराच दिला नाहीं स्वतःच्या युनिफॉर्मची घडी तशीच बगलेंत ठेवून तो आपल्या

घरात शिरावा तसा दमासरशी जोशीबुवाच्या घरात शिराला. कारण सध्या तरी आपल्या कोणत्याहि पराक्रमाच कौतुक करवून घ्यायला त्याला हेंच एक हक्काच ठिकाण वाटत होत.

यावेळी मधल्या घरात जोशीबुवा आणि केशव बसले होते केशव वडिलाना कुण्यातरी मुलीशीं ततोतत जुळेल अशी आपली स्वतःची कुडली तयार करायला सागत होता कारण इतराचीं लग्न जमवता जमवता तो स्वतःसाठींहि स्थळ बघत होता. हल्ली त्याच्या सल्ल्याप्रमाण जोशीबुवानी कारवाई सुरू केली होती त्याच्या थोड्या अतरावर पाय मुडपून लीला बसली होती. कुत्र टेकवत तसे दोन्ही हात तिन समोर टेकवले होते हात अन् पायामध्यें बरचस अतर होत. त्यावर तिन आपल शरीर सारख्या प्रमाणात तोलून धरल होत. उभारीस असलेले छातीवरील उचवटे झपरच्या चौकोनी गळ्यातून बाहेर डोकावत होते. झपर खालच्या भागाकडे लोमकळल्यासारख दिसत होत. घरात गजू येईपर्यंत केशवन तिच्या अशा बसण्याकडे कानाडोळा केला होता पण आता त्यान तिला एकदम घरात व्हायला सागितल पहिल्यादा तिला ते मानवल नाही त्यान डोळे काढले तेव्हा मात्र पाय आदळत ती आत गेली. चालतानाहि काहीं तरी पुटपुटली

लीलाच्या रिकाम्या जागी टेकताना गजू म्हणाला,

"नानासाहेब आपल काम जमल हो !"

शेकडो उचापती करणाऱ्या केशवला गजू नेमका कशाबद्द बोलतो ते लगेच आटवल नाही. गजून क्लबातल्या नोकरीबद्दल सागताच केशवचा चेहरा उजळला. हातातली, कुण्यातरी मुलीची कुडली घडी घालून खिशात ठेवत म्हणाला,

"अहो, जमल म्हणून काय सागता ? जमणारच ! नानासाहेबानी शिफारस केल्यावर नोकरी मिळत नाहीं, म्हणजे काय गम्मतची गाष्ट आहे ?"

"आणा, काढा – पेढे काढा लवकर !"

"बर, पगार काय ठरला ?"

"तीस रुपये ."

"फक्त ?"

लगेच तोच सावरून म्हणाला,

"काहीं हरकत नाही. एवढेहि काय कमी झाले ? मग कधी देता आम्हाला

पेढे ?"

सदर्भ न लागून गोधळलेल्या जोशीबुवाच्यान राहावल नाही. त्यानी म्हटल तर गजूला आणि म्हटल तर केशवला विचारल्यावर काही गजून आणि काही केशवन मिळून सार त्याना सागितल तसे न राहवून ते आत, मोठ्यान म्हणाले,

"अग, लीलाची आई, ऐकल काय ? आपल्या गजाभाऊना नोकरी लागली म्हणतात ? आपले भावी जामात आतापासून मिळवायला लागले "

वाक्य पूर्ण व्हायच्या आतच केशवकडून गप्पवले गेलेले जोशीबुवा खुणेन त्याच्या तोडाकडे बारकाईन बघू लागले. यातल काही एक गजूच्या लक्षात येऊ नये म्हणून केशव धूर्तपणे त्याला म्हणत होता,

"ह तुम्ही पेढे कधी द्याल, ते नाही सागितल अजून ?"

गजू घटकाभर वरमल्यासारखा झाला. मग त्याच्यातल्या उत्साहान उचल खाताच म्हणाला,

"बस नानासाहेब, आता माझ्या शिक्षणात कोणताहि अडथळा येणार नाही. काय वाटेल ते झाल तरी मी ही नोकरी सोडणार नाही. माझ शिक्षण पूर्ण केल्याखेरीज राहणार नाही

"यापुढ मला आप्पासाहेबाच्याहि पैशाची गरज उरणार नाहीं उलट माझ्या मिळकतीन त्याच ओझ हलक होईल त्याच्या इच्छेप्रमाण बाळच्या शिक्षणाकडे त्याना अधिक लक्ष पुरवता येईल ही अडीच-तीन वर्षं त्यानी एवढ केल की आम्ही सार काही मिळवलच म्हणून समजा. पुढ आम्ही दोघे भाऊ मिळवायला लागल्यावर आप्पासाहेबाना विश्रान्ती देऊ हा-हा म्हणता सुधाच लग्न उरकवून टाकू .

या दरम्यान केशवचा चेहरा बदलत चालला होता तो गजूच भावी जीवन त्याच्या डोळ्यासमोर उभ राहिल्यान असेल किंवा आपल्या कर्तृत्वाबद्दल गजूच्या तोडून एक शब्दहि निघत नसल्याच पाहून असेल अथवा आणखी कोणत्या विचारान असेल, कसातरीच दिसू लागला हे जाणवताच गजूहि आपल्या स्वप्नातून जागा झाला. म्हणाला,

"आणि खर म्हटल तर, हे सार तुमच्याचमुळ होत आहे बर नाना-साहेब ! तुम्ही मला मार्ग दाखवला नसता तर आमच काय झाल असत कुणास

माहीत—"

"कसच, कसच–"

सकोच दाखवत केशव म्हणाला,

"ह्या, ज्याच्या-त्याच्या भाग्याच्या गोष्टी असतात गजाभाऊ! तुमच दैव बलवत्तर म्हणा, म्हणून तुम्ही माझ्याकडे यायची आणि माझ्या डोक्यात कल्पना असायची एकच गाठ पडली त्यामुळ जमल झाल हें सार–

" पण खर सागू गजाभाऊ? ही नोकरी तुम्हाला सुचवायला मला फार धैर्य लागल!"

"कारण काय?"

"नाही तर काय!"

"अहो, ही पाणी भरण – झाडझुडीची नोकरी करणं तुम्हाला कितपत आवडेल, याबद्दल मला शका होती. तुम्ही वारवार सागत कीं, शिक्षणासाठी मीं काय वाटेल ते करायला तयार आहे—तरी माझ्याच्यान क्लबात काय काम करावीं लागतात ते सागवत नव्हत

"मला तर हेहि वाटत होत की, तुम्हीं नोकरीबाबत भेटून आल्यावर माझी चागली खरडपट्टीच काढाल—आता कुठ खर सागतों तुम्हाला!"

"नाहीं हो नानासाहेब! तुम्ही सुचवल हेच तर फार मोठ ओझ झाल माझ्यावर तेव्हा खरडपट्टीचा प्रश्नच नाहीं—"

"हा, हे बाकी जाणून घेण्यावर अवलबून आहे. नाहीं तर अलीकडली पोर हायस्कुलात पाय ठेवीत नाहीत, तर स्वतःला बाबूसाहेब समजू लागतात

"दूर कशाला"

तो थाबला, गजूच्या घराचा कानोसा घेत त्यालाच म्हणाला,

"बाळ आहे काय घरात?"

"हो. का?"

"जाऊ द्या, हो, तर काय म्हणत होतों? आल लक्षात

"अहो गजाभाऊ मी म्हणतो, माणसाला शिकायच आहे ना–तर मग त्या काळात कोणतींहि काम करण्यात कोणती लाज आहे? माणसाच्या अंगीं कोणतहि का होईना कसब असल म्हणजे तो जगात कधींच माग राहात नाहीं कसब मात्र हव ते बुद्धीचच हव. असहि नाही शारीरिक कष्ट

करायची का होईना तयारी ही हवीच. तुमच्यात ती असेल, असं मला वाटत नव्हत. तुम्ही असेच वागले तर बघा, आयुष्यात कसे यशस्वी होता तर–"

बोलता बोलता केशवन ज्यासाठीं हा सर्व आटापिटा केला होता–त्यावर येत म्हणाला,

" आता माझच बघाना, मी कुठ शिकलेलो आहे ! म्हणून काय उपाशी मरतो ? ते तर नाहीच, पण कोणत्याहि मॅट्रिकवाल्यापेक्षा चौपटीन निश्चित मिळवतो की नाहीं ? "

तो थावला. गजूकडे रोखून पाहिल. गरज म्हणून गजू त्याच ऐकत होता. केशव बोलायला म्हणून आणखी चेकाळला. तो असा चेकाळला म्हणजे ऐकणारा उठून जाईपर्यंत बोलत असे. आता तो आवेशात येऊन बोलत होता. आपल्या दारावर कान ठेवून गजू ऐकत होता. खर तर केशवन दिलेल्या रकमेच्या व्याजाच्या फेडीदाखल गजूला त्याच ऐकाव लागत होत सुटकेला निमित्त म्हणून तो घरातल्याच्या हाकेची वाट बघत होता. निदान आप्पानी तरी बाहेरून यायला हव होत.

—✶—

# धारा

आप्पाची चाहूल जाणवून गजू केशवकडून उठला घरी आला खरोखरच आप्पा घरी आले होते. बाळला अथरुण टाकायला सागून स्वतः हात-तोड धुवायच्या निमित्तान न्हाणींत गेले होते. परतताना त्याच्या लक्षात आल. सुधा चुलीपुढ कलडली होती. तिचा एखादा अवयव चुलीवरल्या शिजत्या भाड्यावर आदळून ते अन्नासह तिच्या अगावर पालथ होऊ नये म्हणून त्यानी तिला हलवून जाग केल. भितीशी उठवून बसवल. परतु भान आल्यावर तिन आप्पाना जेवण वाढून देऊ काय म्हणून विचारल. पण भूक नसल्याच सागून आप्पा सरळ खाटेवर आले.

तशात दिसलेल्या गजूला त्यानी जेवण झाल की काय ते विचारल. पण आप्पाची ही तयारी पाहून त्याला बोलायला वेळ लागला. हे लक्षात येण्या-पूर्वींच आप्पानी त्याला पिशवीतून औषधाची बाटली काढायला सागितली. काहीएक न बोलता गजू ती काढू लागला. सवयीप्रमाण बाळन आप्पाच्या खाटेशी कदील धरला. मग औषधाकडे बघून असेल किंवा आप्पाना अदमास-

ण्यासाठी असेल बाटलीत ड्रॉपर घालताना, तोंवर उताण्याचित्त झालेल्या आप्पाना म्हणाला,

" औषध परत नव दिसत आप्पासाहेब, नाही ? "

" अ हो. "

" हे औषध वापरायला कुणी सांगितल. ? "

" कोण सांगणार आहे –"

वैतागाच्या सुरात आप्पा म्हणाले,

" पोट दुखल म्हणजे ओवा खावाच लागतो –– "

" तस नाही म्हणत मी –– "

ा समजून गजू म्हणाला,

" कुण्या डॉक्टरानी सल्ला दिलाय् काय म्हणून विचारतो हे औषध वापरण्याबद्दल "

" डॉक्टराकडे सल्ल्यासाठी जायला पैसे आहेत कुठ ? "

आप्पाच हे तिरपागड बोलण गजूला अज्ञात अगदीं नव होत. त्यामुळ तो गप्पच झाला आता आप्पाच्यान गप्प राहावेना धुमसणाऱ्या भावनेला वाट मिळावी म्हणून ते गजूला जवळ आणण्याचा प्रयत्नात म्हणाले,

" आज प्रेसमध्ये एका कादबरीच प्रुफ वाचत असताना ह्या औषधाच नाव दिसल. कादबरीनायकाचे डोळे माझ्यासारखेच झाले होते. त्यान हेंच औषध वापरल म्हणून लेखकान लिहिल आहे. यानच नायकाचे डोळे बरे झाल्याच कादबरीत लिहिल आहे नायकाच्या दृष्टिदोषाचहि लेखकान माझ्या डोळ्याना लागू पडेल अस ततोतत वर्णन केल आहे. तेव्हा प्रेस सुटल्यावर डोक्यात विचार आला किं लेखकान वर्णन केलेल औषध खरोखर अस्तित्वात आहे कीं काय ते बघाव. आणि ते सापडल देखील. किमतसुद्धा बेताची होती. तेव्हा म्हटल, जाव घेऊन. पाहावा काय अनुभव येतो तो शिवाय आज पगाराचे पैसे पण खिशात होते––"

पगाराच्या आठवणीन त्याचा सूर एकदम गोटलाच. म्हणून गजू म्हणाला,

" अशी तारतम्यान औषध वापरण बर नाहीं म्हणतात या बाटलीवरसुद्धा लिहिल आहे की डॉक्टराच्या सल्ल्याशिवाय –– "

" कुठ जाऊ आता डॉक्टराचा सल्ला घ्यायला ? "

एकदम चिडून आप्पा म्हणाले,

" काय व्हायच असेल, तें होऊन जाऊ दे एकदाच आहे काय आतां माझ्या जीवनात राहिलेल. नजर अजिबात नसती ते एका परीन बर झालं असत. पण असून नसल्यासारख्या या ह्या डोळ्यानी आता मला मानान जगण अशक्य केल आहे "

आप्पाचा उद्वेग सपेपर्यंत गजू बोलला नाहीं. त्याच्या डोळ्यात औषध टाकून होईपर्यंत ते गप्प असल्यान त्याचा उद्वेग सपला असावासा गजून समज करून घेतला. मग तो म्हणाला,

" आप्पासाहेब, आज तुम्हाला काही झालं आहे काय ? "

" झाल असत तर अधिक बर झाल असत "

" मग जेवले का नाहीं ? "

" भूकच नाही "

" मला वाटते, आज तुम्हाला घरी यायला बराच उशीरहि झाला, नाही ? "

" हो, झाला खरा "

" पण का ? "

गजू म्हणाला,

" काही ओव्हर – टाईमच काम वगैरे ? "

" आता कोण देतय् ह्या फुटक्या डोळ्याना रात्रींच काम ! जिथ दिवसाचे काम टिकवण्याची मारामार चालू आहे — "

अशासारख्याखेरीज आप्पा काहीएक बोलायला तयार नाहीं, याची खात्री झाल्यावर गजून त्याचा नाद मोडला. आपल्या नादात शिरत म्हणाला,

" आप्पासाहेब, मी तुम्हाला एक आनदाची गोष्ट सागू ? "

" आनदाची, आपल्या आयुष्यात ! ती कोणती बुवा ? "

गजूलासुद्धा विचार पडला. आपण सागणार ती वार्ता आप्पाना आनदाची वाटेल कशावरून ? तथापि ती त्याला स्वतःला आनद देणारी असल्यान स्वस्थता लाभू देईना शिवाय एवढया अवधींत आप्पादेखील उत्सुक झाले होतेच. त्याला सागाव लागल,

" मी नोकरी धरली ! "

" कोणती रे ? "

आप्पाच्या आवाजात आता आनदाची तकाकी होती ते घाईघाईन विचारू लागले,

“ कुठ ? कशाची ? काय पगार आहे ? ”

ही सर्व माहिती जसजशी मिळत होती तसतसा त्याचा आवाज कोरडा रखरखीत होत होता. शेवटीं शेवटीं ते म्हणाले,

“ तुला कुणी सागितल होत ? ”

“ असली नोकरी आपल्यासारख्याना शोभते काय ? ”

“ पण तू मला आधीं विचारायला तर हव होत की नाही ? म्हणजे, आजच तू मला मारून टाकलेल दिसत ”

गजू हिरमुसत गेला. आपल्या कर्तबगारीच अस स्वागत होईल, याची त्याला कल्पना नव्हती. तो सुन्न – उदास झाला.

काहीं क्षणानी आप्पानी कोणत्या तरी निमित्तान त्याला बोलक केल – तेव्हा समर्थनाची सधि हातीं लागते की काय या आशेन तो बोलका झाला,

“ मला वाटल, तुमची फार ओढाताण होते आहे तेव्हा काहीं मदत म्हणून मिळविता आल तर पहाव – ह्या हेतून मी तुम्हाला न विचारता भेटून आलों क्लबात ”

“ त्यापेक्षा अस का नाहीं म्हणत की मी स्वतःच्या मॅट्रिकपर्यंतच्या शिक्षणाची वेगळीं तरतूद करतो म्हणून ? ”

या शब्दातली तीक्ष्णता जाणवण्याइतका गजू सूज्ञ होता. त्यान मानच खाली घातली. आप्पानी हेच परत आळवल्यावर तो पुटपुटला,

“ माझे दोनहि हेतू आहेत आप्पासाहेब ! ”

“ मला कळत रे सार डोळे जायच्या पथाला असले तरी बुद्धि शाबूत आहे ”

आता आप्पा डोळे उघडून म्हणाले,

“ कुणाचे काय हेतू आहेत हें जाणण्याइतकी बुद्धि ताळ्यावर आहे माझी अजून ”

आप्पा आजच असे का हातघाईवर यावेत याचा गजूला उलगडा होत नव्हता. त्याना चुकवून तो त्याच्याकडे संशयान बघत होता.

गजूला हव तेवढ बोलून झाल्यान त्याच्या दुःखाची शीग कमी झाली ते

थोडे ताळ्यावर आले निदान आपणास नक्की काय म्हणायच याच त्याना भान आल. शक्य तितका कोवळा – हळवा सूर करून ते म्हणाले,

"अरे गजा, मी जर तुझ्यासारखा आप्पलपोटा विचार केला असता – तर ह्या घराच काय झाल असत, याची कल्पना आहे तुला?"

अशावर बाळ गजूएवढा असता तर कदाचित् म्हणाला असता,

"हे घर माझ नाही; तुमच म्हणा!"

पण गजू त्या जातींतला नव्हता. आता तो गप्प होता. आप्पा मात्र म्हणत होते,

"माझ्या कशाएकाची तुला कल्पना नाहीं. अरे गजा, माझ्या डोळ्यानी दिसत नाही रे! शरीरान मी थकलो आहे रे! त्यामुळ दररोज अधिकाऱ्याकडून मनान मारला जात आहे रे!

"म्हणून मला सारख वाटत रे की, माझ हे ओझ कुणी तरी धावत येऊन हलक कराव. नाहींतर त्याखाली चेपून मी गिधाडानी टोचलेल्या प्रेतासारखा छिन्नविच्छिन्न होईन.

"जाऊ दे. यात तुझा तरी काय दोष म्हणावा! माझच दैव फुटक आहे, त्याला तू तरी कुठकुठ ठिगळ जोडणार! तस तुझ वय पण नाही मी उगाळत बसत नाही जास्त—"

कोणत्या जखमेतून आप्पाचे हे शब्द पाझरत आहेत, याची अजून गजूला कल्पना नव्हती.

आप्पाना मात्र त्याच्या अर्धवट पडलेल्या ससाराच भयानक चित्र गप्प राहू द्यायला तयार नव्हत. ते त्याना उमाळ्यावर उमाळे गिळायला लावत होत. आणखी एक आवढा गिळल्यावर ते म्हणाले,

"समज, उद्या माझी नोकरी सुटली तर तुम्हा सर्वाचं काय होईलं?

"तस पाहिल्याला आता तुझी फारशी काळजी नाहीं म्हणा तू मिळवता झाला आहेस"

यावेळीं गजून आप्पाकडे पाहण्याच धाडस केल. तो डोळे उचलतो न उचलतो तर अप्पाचे डोळे त्याला टकरावले. त्यान मान खाली घातली. आप्पा म्हणत होते,

"आता प्रश्न आहे, बाळ, सुधाचा. बाळ मुलाची जात म्हणून एखाद्या

हॉटेलात खाण्या–पिण्यासहीत मिळणाऱ्या पगारावर नोकरी करू शकेल. कसबस त्याच पण निभावल जाईल आणि आता राहिली सुधा ''

आप्पा थाबले. आवढा गिळल्यावर म्हणाले,

'' परकरात मावेपर्यंत तीहि कुठ तरी मुल खेळवायच काम करेल. झाडझुड-भाडी सुद्धा घाशील वेळ पडली तर पण उद्या ताब्या उपडा पडण्याची वेळ आली म्हणजे ?

'' नको– नको, ती कल्पनाच नको ! व्हायचे ते होऊन जाऊ दे माझ्या काळजीन त टळणारहि नाही ''

आप्पाइतकी नसली तरी त्यानी कल्पायला घेतलेल्या त्याच्या ससाराच्या चिंधड्याची गजूला बरीचशी कल्पना आली. तो हळवा–दुबळा नि कोवळा जीव ढवळून निघाला. खूप खोल सुरात म्हणाला,

'' नाही, नाही ! आप्पासाहेब, आपल्या घराच अस काही मी होऊं देणार नाही ! त्यासाठी मी वाटेल ते करावयास तयार आहे सागा, मी काय करू ? तुम्हीं म्हणाल तर उद्याच शाळा सोडतो–''

'' माझ्या हो–ना वर तुझ्या शिक्षणाच अवलबून नाहीं. आपल्या जीवनाच एकूण एक सूत्र नियतीन हातीं घ्यायला सुरूवात केली आहे, अस दिसत दूर कशाला, आजचीच गोष्ट सागतों–''

बोलता बोलता आप्पानी आज प्रेसमध्ये काय घडल व एकशे दहा रुपयातलें केवळ सतरा रुपये बावन्न नवे पैसे हातात देऊन आपल्याला कस वाटेन लावण्यात आल, ते घडल तस गजूला सागितल. नतर म्हणाले,

'' आणि मला वाटते, आता त्या प्रेसमध्ये मला फार काळ टिकाव धरता येईल अस वाटत नाही. कितीहि लाचारीन वागलों तरी ती नोकरी आज ना उद्या सुटणार हे निश्चित. शहरातल्या बाकीच्याहि छापखान्यातून मी कुठ एकदा तर कुठ दोन–दोनदा नोकऱ्या करून सुटलो आहे. यामुळ मला आता एकच चिंता लागलेली आहे. उद्या म्हण, की महिना–दोन महिन्यानीं म्हण–मला बाबासाहेबानी नोटीस दिली तर माझ्यावर उपाशी मरण्याची पाळी येईल.

'' दुर्दैवान तोंवर काहीं उपाय निघाला नाहीं तर एक तर मला स्वतःला विष खाव लागेल, नाहींतर–बाळ. सुधाला तरी विहिरींत लोटाव लागेल–''

आप्पाच्यान बोलवल नाहीं. औषध टाकल्यावर डोळ्यातून लागत त्याहिपेक्षा

मोठ्या धारा त्याच्या डोळ्यातून वाहू लागल्या. शिवाय औषध टाकल्यावर नसे तसं त्याच शरीर थरथरू लागल.

आपल्या परीन त्यान गप्प करण्याचा प्रयत्न करीत गजू म्हणाला,

" यावर काहींच का उपाय नाहीं, आप्पासाहेब ? "

बराच खड घेऊन आप्पा म्हणाले,

" आहे–"

" कोणता ? "

" पण तुला तो मानवायचा नाहीं–"

" तरी पण ? "

" सागूच म्हणतोस ? "

काहींशा निष्ठूर आणि बऱ्याचशा कोरड्या आवाजात आप्पा म्हणाले,

" या सकटाला तोंड देण्यासाठीं कुण्यातरी एकाला आपल्या अपेक्षाचा बळी द्यावा लागेल–"

आप्पा एकदम थाबले. गजू काहींच समजला नव्हता. थोड फार समजला असला तरी अंगावरून येईल म्हणून दाखवत नव्हता. पण आप्पाकडून थाबवत नव्हत,

" म्हणून माझ म्हणण असं कीं हें दिव्य तू स्वत करावस––"

" मला तुम्हात पक्षपात करायचा नाहीं. सारीं मुल सारखी आहेत

" तुलाच म्हणण्याच कारण तू मोठा आहेस. समजस आहे आणि सर्वात महत्त्वाच म्हणजे मला हवा तसा आहेस ..म्हणून मला काय वाटत, माझ्या डोक्यात काय–काय येत ते सार मी केवळ तुझ्यापाशीं बोलतो. ते त्याचा उपयोग व्हावा ह्या हेतून नाहीं–तर मला कुणी बोलायला नाही, दुःख हलक करायला जागा नाहीं–म्हणूनहि असेल आता या जगात––"

हुदका गिळायला ते थाबले, पण आता त्याच ऐकल्याशिवाय गजूच्यान रहावेना,

" सागा––सागा आप्पासाहेब, तुम्हाला काय सागायच तें अगदीं मोकळे-पणान सागा..."

" सागावच लागेल म्हणा–"

आप्पा म्हणाले,

" खर तर हें मी तुला माझे डोळे जायला लागल्यापासून प्रत्यक्ष अप्रत्यक्ष-पणान सागत आलों आहे. पण तें तू आजवर कानावर घेतल नाहींस. "

आता गजूला आप्पाचा हेतू अगावर घेण्याची पाळी आली. आपण ग्राम-सेवकाच शिक्षण घ्याव, आय्. टी आय्. चा कोर्स पूर्ण करावा पी. टी. सी. लाजाव, कपौंडरच शिक्षण घ्याव किंवा आणखी कशाच घ्याव याचा तो विचार करीत होता. पण बोलता–बोलता आप्पानीं त्याला यापुढ वरीलपैकीं कोणतहि शिक्षण घेणं कस अशक्य आहे– ते अनेक अडचणींच्या यादीसह समजावून सागितल. हे सागताना त्यानी आपल्याशीं अनेक विचार केले होते. पैकी एक त्याची नोकरी सुटण्यापूर्वी त्याच कोणत तरी काम शिकून पूर्ण व्हावयास हव होत. दुसर, ते शिकताना तो त्याच्या दृष्टीआड नसायला हवा होता तिसर, त्यान लवकरात लवकर मिळवायला हव होत. हें सार ऐकून गजूला वाटल ( ते खर तर मॅट्रिकपर्यंतच्या शिक्षणासाठीं त्याची सुटका होईल या आशेमुळ ) कीं आता आपल्याला शिकण्यासारखा उद्योगच उरला नाहीं. त्यामुळ सुरातला आनद झाकत तो म्हणाला,

" मग, आता मीं काय करावं–अस तुम्हाला वाटत ? "

" माझ्या दृष्टीन तुझ्यासाठीं आता एकच धदा शिकण्यासारखा आहे–"

ठरवून ठेवल्यासारखे आप्पा म्हणाले,

" तो म्हणजे कपोझिंगच काम शिकण ! "

गजू हादरलाच. आप्पासाठीं म्हणून त्यान लहानपणापासून आतापर्यंत अनेक मुद्रणालयात ये–जा केली होती. तेव्हा तेव्हा तिथल्या जळकट– काळ-पट वातावरणाची त्याला शिसारी येत होती. निस्तेज चेहऱ्याचीं व तेलकट कपड्याचीं माणस पाहून आपण हा धदा कधींच करणार नाहीं, शिकणार नाहीं, अशी त्याला नकळतच त्याच्या कोवळ्या मनान प्रतिज्ञा केली होती. त्यामुळ गजू आता तोड माठल्यासारखा अगदीच गप्प राहिला.

त्याच्या अवस्थेची थोडीफार कल्पना करीत आप्पा म्हणाले,

" का, नाहीं पसत ? "

" पसत — "

तो म्हणाला, " पण टेलरिंग शिकलों तर ? "

" हरकत काहीं नाहीं. पणे त्याला किती दिवस लागतील ? "

" किरकोळ काम यायला लागतील सहा-सात महिने "

" हा समज आहे. एवढयात काजदेखील शिकवीत नाही कुणी . "

आप्पासाहेब म्हणाले, " काम शिकायला आरभ करण्यापूर्वी आपल्याला मुख्यतः काल आणि परिस्थितीचा पहिल्यादा विचार करावयास हवा — "

तरी गजू म्हणाला,

" पण हाच धदा का —"

" सागतो — एक तर, बाबासाहेबानी शक्य तितकी तरुण माणस ट्रेड करायच ठरविल आहे. दुसर, तिथ तुला मला लवकर प्रवेश मिळवून देता येईल. तिसर, त्या विभागाचा फोरमन माझ्या ओळखीचा असल्यान तो तुला इतर शिकावू मुलासारखा आवबे लड्डू आणि जावबे लड्डू करीत राहणार नाहीं. चवथ, चार महिन्यात तू डिस्ट्रिब्यूटर्सच्या मिनिमम वेजेस ॲक्टप्रमाणे साठ रुपये आणि सहा महिन्यानी कपॉझिटर म्हणून पचाऐशी रुपये मिळवायला लागशील — "

आपण घालीत असलेल्या मोहाचा गजूवर काय परिणाम होत आहे, हें पाहण्यासाठीं आप्पा थाबले. पण त्याचा अपेक्षाभग झाला तरीहि ते म्हणाले,

" आणि आपली बाजू तर तूं जाणतोंसच मला कोणत्या क्षणीं घरी बसाव लागेल, याचा आता काहीं नेम राहिला नाहीं – "

त्यानीं तुम्हाला अस काहीं म्हटल आहे काय ? "

" म्हटल – "

आप्पा विचारात पडले. बाबासाहेबानीं आज ऑफिसात त्याचा जो छळ केला होता – त्याबद्दल ते गजूपाशीं अद्याप काही बोलले नव्हते तं आता गजूजवळ सागाव असं त्याना क्षणकाल वाटल. पण हिंमत झाली नाही – जगात कुणाजवळ नसली तरी घरातल्या धाकट्याजवळ तरी आपली पत असावीस त्याना वाटल असाव. ते म्हणाले,

" म्हटल नाहीं – पण मी सागतो यावर भरवसा ठेव. यापुढं तो साहेब कोणत्याक्षणी माझ्या हातीं एकशे दहा रुपये आणि एक महिन्याची नोटीस ठेवेल तें सागता येत नाहीं, एवढ बाकी निश्चित. "

आप्पाच म्हणाले, " तुला पटत नाहीं, अस दिसत ! "

" तसं नाहीं — " गजू म्हणाला,

" मला वाटत, तुमची नोकरी सुरू आहे तोंवर तरी मी क्लबातली नोकरी आणि शाळा सुरूं ठेवावी म्हणतोय् — "

" म्हणजे, आतापर्यंतच्या माझ्या वटवटीला कांहींच अर्थ नव्हता म्हणायचा "

आप्पा चिडून म्हणाले,

" अरे शहाण्या, उद्या माझी नोकरी सुटली म्हणजे परवा लगेच काम शिकून पैसे मिळवता येईल काय तुला ? "

" "

" बोलना "

" "

" म्हणून म्हणतो, आपल्या सर्वांसाठीं तुला खरोखर काहीं करावस वाटत असेल तर माझ्या म्हणण्याचा शक्य तितक्या लवकर विचार कर. नसेल वाटत तर तू आहेस आणि तुझ दैव आहे तुझ काय होणार म्हणा! दैवाबद्दल आमच्याच विचार करावा लागेल, दुसर काय ! "

हे गजूला परकेपणाच वाटल. तरी तो तडजोडीचीच भाषा वापरू लागला,

" आप्पासाहेब, अस तरी करण शक्य आहे काय ? "

" आणखी कस म्हणतोस ? "

" मी कंपोझिंग शिकायला सुरुवात करतों. पण तुमची नोकरी चालू आहे तोपर्यंत शाळाहि सुरू राहू देतों — "

" कर, तुला काय वाटेल ते कर – जा ! "

" तस नाहीं. म्हणाल तर मी उद्यापासून शाळ बंद करतो. पण मला आपल वाटत, जेवढे निभतील तेवढे दिवस निभू द्यावेत — "

आप्पा गप्प राहिले त्याला काहीं कारणहि होतीं एक तर त्याच्या प्रेसमध्यें केवळ सकाळींच शिकू शकणारे विद्यार्थी ठेवतील की नाहीं हे त्याना माहीत नव्हत. दुसर, थोडाथोडका का होईना गजू तयार होत आला होता. शेवटल नि सर्वांत महत्त्वाच म्हणजे गजूच्या शिक्षणाविषयीच्या तळमळीन त्याना पिळवटून काढल होत म्हणून ते आता तरी काहीं बोलले नाहींत.

# एक

शाम प्रिटिंग ब्यूरोच्या मागल्या आवारात एक ट्रक उभा होता त्याच्या पाठीला एक लाबलचक ट्रॉली साखळदडान जोडली होती. ह्या ऐसपैस ट्रॉलीला सहा जागीं चाक होतीं. तींहि दुहेरी. ट्रॉलीत मोठमोठे लाकडी खोके होते काही फक्त चौकोनी तर काहीं लाबट चौकोनी आकाराचे ते चारीकडून बद असलेले अवजड खोके ट्रॉलीतल्या वाळलेल्या गवतावर ठेवले होते. बाजूला क्रेन होती अन् तिच्या आकोड्यातला साखळदड ट्रॉलीत लोमकळत होता.

या सर्वाभोवतीं पाच-पन्नास हमालाचा घोळका वलवलत होता. काही ट्रॉलीतल्या खोक्याना साखळदंड लपेटत होते. काही खोक्याना हातभार लावत होते. काही आपापसात सल्लामसलत करीत होते. आपला निर्णय दुसऱ्याना कळवत होते.

एक जर्मन माणूस त्या सर्वाचा मुख्य होता. वयान कोवळ्या पण शरीरान धष्टपुष्ट असलेल्या या माणसाच्या अगावर चॉकलेट कलरचे कपडे होते. ते जागजाजागीं डागाळले होते. कुठले कुठले डाग तेलकट होते. त्यान पॅन्ट पोटऱ्या

व मनिला दडापर्यंत मुडपला होता. अधूनमधून तो हमालाना सल्ला देत होता त्याच्याजवळ एक दुभाष्या उभा होता. कुठ कधीं त्याच्या सल्ल्याप्रमाण काम होत नसे तिथ, तो स्वतः ते करायला घेत असे. करून दाखवत असे. बाकी सारा वेळ तो कमरेवर हात जमवून होत असलेल्या कामाकडे काळजीच्या नजरेन बघत असे

बाबासाहेब या सर्व करामतीवर देखरेख ठेवत होते. ते ट्रॉलीच्या बऱ्याच अतरावर उभे होते. ऑफिसातले काहीं हुजरे त्याच्याभोवती उभे होते. पाहता पाहता त्याना काहीं सुचल-आठवल, तर ते एखाद्या हुजऱ्याकरवीं जर्मन माणसाला कळवत होते. जर्मन माणसाला कधीं त्याचा सल्ला मानवत असे-तो तो राबवत असे तर कधीं सकारण परतून लावत असे. काहीदा बाबासाहेबानी तो परत घेतला होता तर काहींदा तस करण्यात त्याना अपमान वाटला होता. आपल्या, ट्रॉलीपासून खूप अतरावर माडलेल्या खुर्चीतून ते उठले होते. जर्मन माणसाला म्हटल तर समजावून नि म्हटल तर दरडावून आपला सल्ला सागितला होता यापैकी एक-दोनदा त्यानहि तो मानला होता. अमलात आणला-राबवला होता.

हें सार करता करविताना ते सतत घड्याळाकडे बघत होते

अशात त्याची सेक्रेटरी त्याच्या जवळपास करीत असल्याच त्याच्या एका-एकी लक्षात आल. तरीहि तिच्यावरल लक्ष जाणीवपूर्वक ओरबाडत त्यानी पोतनीसशी बोलण सुरू केल. तें सपता सपेना. तेव्हा सेक्रेटरी शहा त्याच्यापुढ उभी झाली वय, जात आणि शरीर या सर्वांना साजेशा नाजुक आवाजात म्हणाली,

"एक्स्क्यूज मी फॉर द डिस्टर्ब, सर मला आपल्याशीं काहीं बोलायच आहे "

बाबासाहेबानी तिच्याकडे आपल्या नेहमींच्या करड्या-ऋणखर नजरेन पाहिल. विचारल,

"इज इट् अर्जन्ट ?"

"सो आय थिक—"

"इफ सो, यू कॅन टॉक "

डायरींतल्या एका पानावरून नजर काढीत ती म्हणाली,

"आता आपणाला इटरव्ह्यू घ्यायचा आहे. कपोझिंग शिकण्यासाठी येणाऱ्या कॉन्डिडेटसचा."

"हो. पण किती वाजता?"

आपल काहीं चुकत की काय या काळजीन शहा परत डायरीची पान चाळू लागली. हव्या त्या पानावर थाबत ती म्हणाली,

"मला वाटते, साडेअकरा ते दीडपर्यंतच्या वेळा दिलेल्या आहेत आपण "

"आय नो इट—"

बाबासाहेबानी मनगटावर बघत म्हटलं,

"पण अजून सात मिनिट कमी आहेत एलेव्हन थर्टीला .."

सात मिनिट हा वेळ असू शकतो हें शहालाहि आजच कळल तरी आपला हिरमोड सावरण्यासाठी आणि दक्षता दाखविण्यासाठी ती म्हणाली,

"मी आपणाला स्मरण द्यायला आले होते शिवाय उमेदवारदेखील बरेचसे आलेले आहेत "

"आल लक्षात. तुम्ही जा. मी ऐन वेळी येईन .."

थाबून ते म्हणाले,

"तुम्ही पण आपली सर्व व्यवस्था नीट ठेवा!"

"यस्, सर!"

म्हणत शहा आपल्या जपानी नॉयलॉनच्या साडीचा लफ्फा सावरीत जिन्यात घुसली.

ठीक साडेअकराला दोन-अडीच मिनिट कमी असताना बाबासाहेब त्याच जिन्याच्या पायऱ्या चढू लागले. ते आपल्या मुख्य ऑफिसात आले त्यावेळी सर्व टबलाभोंवतींच्या खुर्च्या उभ्या झाल्या. 'जगली'मध्यें फॉरीनमधून आलेला शम्मीकपूर आपल्या फर्ममध्यें चालतो त्या ऐटींत बाबासाहेब आपल्या कार्यालयातल्या कोनाकोपऱ्याच्या वाटातून चालू लागले. इतराच्या नजरेत बाबासाहेबाच लक्ष कुणावरच नाहीं, अस दिसत होत. पण बाबासाहेब सार काहीं बघत होते पोतनीस बसत असे त्या टेबलाशीच्या बाकावरले आपा नुकतेच उभे झाले होते. मुलाखतीला येणाऱ्या उमेदवारासाठीं टाकले होते त्या बाकावरील उमेदवाराच्या रागा बाबासाहेबाना उशिरा ओळखल्यान मागाहून उभ्या

होत होत्या

चपराशान धरून ठेवलेल्या दारातून बाबासाहेब कपार्टमेंटमध्यें गेले. खुर्चीत बसले. सेक्रेटरीच्या टेबलाशी वाजणाऱ्या बेलच बटन दाबल. परवानगी मागून शहा कपार्टमेंटमध्यें शिरली. हातातली फाईल टेबलवर ठेवली. टेबलच्या पोटातल पॅड हातान ओढल. त्यावरची आपली फाईल भराभरा चाळूं लागली. एक चिठ्ठी काढून तिन बाबासाहेबाच्या पुढ्यात सरकवली. ती पाहात ते म्हणाले,

"कॉल हिम्—"

शहान बेल दाबली. देवरावला काहीतरी सांगितल तो आप्पाच्या बाकाकडे आला. त्यान त्याना काहीतरी सांगितलं ऐकताना आप्पाचा चेहरा फुलला. ते कपार्टमेंटशीं आले आठवणीसरशीं म्हणाले,

"मे आय कम इन्, सर?"

"यस्"

आत जाऊन आप्पा म्हणाले,

"मी अशासाठी आलो आहे की आपण आज ज्या उमेदवाराच्या मुलाखती घेणार आहात त्यात माझा थोरला मुलगा पण आहे. गजानन आत्माराम देशकर हे त्याच पूर्ण नाव. त्याचीहि आपल्यापुढ .."

"आल लक्षात पण तुमचा इथ येण्याचा हेतू?"

"हेतू हेतू तसा काहीं नाहीं. त्याच्यावर आपल लक्ष असल,तर बर होईल, ही विनंति करायला"

"म्हणजे, शिफारस?"

आप्पा बोललेच नाहीं. आपल्या अपमानाचा ते शहाच्या चेहऱ्यावर परिणाम धुडाळू लागले. इकडे नजरेतली धार वाढवत बाबासाहेब विचारीत होते,

"असच ना?"

आप्पाची, पुटपुटण्यासाठी–त्यानाहि न जाणवण्याइतकी सूक्ष्म हालचाल झाली. तोंच परत बाबासाहेबच म्हणाले,

"इथ शिफारस कुणाचीसुद्धा चालणार नाहीं. योग्यता असलेल्या सर्व उमेदवाराना चान्स दिला जाईल. अपात्र आणि आमच्या पॉलीसीत न बसणारा

कोणताहि उमेदवार घेतला जाणार नाहीं मग तो माझा स्वतःचा मुलगा असला तरीहि ..

" आणखी काहीं ? "

आप्पानी मान हलवली समाधानान. कारण ते एवढ्यावरच निभावल्यान स्वतःला दैववान् समजत होते. बाबासाहेब म्हणाले,

" तुम्हाला जायला हरकत नाही . '

आप्पा बाहेर पडले. विचार करताच त्याची पावलं मुलाखतीसाठी जमलेल्या घोळक्याकडे वळली. तिथ गजू होताच आप्पानी त्याला एकीकडे बोलावल. पण फार लांब नाहीं कारण त्याचा कधी क्रमाक लागेल याचा त्याना भरवसा नव्हता. त्यानी गजूला जेमतेम घोळक्याबाहेर काढल. इतराना ऐकायला जाणार नाही अशा हलक्या आवाजात म्हणाले,

" मला वाटल, तू येतोस की नाहीं वेळेवर "

हे ते गजूला खूष करण्यासाठीं बोलत होते,

" पण आला, हे फार छान केलस "

यावर गजू मात्र म्हणाला,

" न येऊन चालेल कस ? "

आप्पा गप्पच झाले पण जीवनातल्या बहुतेक गोष्टी त्याना ज्या इच्छेविरुद्ध कराव्या लागत होत्या त्याच इच्छेविरुद्ध आता बोलले,

" बर, आता तुला बाबासाहेबाच बोलावण येईल मुलाखतीसाठी . त्यावेळीं तू काय बोलशील ? "

" काय बोलू ? "

" ते नक्की काय विचारतील याची मला कल्पना नाहीं. पण एक सागून ठेवतो. त्याच्याशी अत्यत जुजबी बोलायच. शक्य, त्या बाबतींत हो ला हो करायच. म्हणजे तुझ काम जमलच म्हणून समज "

" पण त्यानी मला न पेलण्यासारख काही लादल तरीहि हो ला हो लावणं कस शक्य आहे ? "

" त्यालाहि काहीं पैसे पडतात रे ? "

" पैसे नाही पडत. पण जें करवणार नाहीं, ते कस काय कबूल करायच बुवा ! "

" तू कर म्हणजे झालं. बाकी सार आपण करून घेऊ वेळ आल्यावर ! तशी तुझी बाजू मी थोडीथोडकी मांडून आलों आहेच बाबासाहेबापुढं काय, आलं की नाहीं लक्षात ? "

गजूची मानहि हलली नाहीं. पण आप्पानी समाधान मानलं. त्याच्या पाठीवर हात ठेवला. हलकेच त्याला उमेदवाराच्या घोळक्याकडे लोटू लागले स्वतः आपल्या वाटेनं लागले. मध्येंच आठवण होऊन ते थांबले. म्हणाले,

" तुझं आटोपल्यावर मला भेट, ह ! "

मान हलवून गजू परत बाकावर जाऊन टेकला. यावेळी देवराव कुण्यातरी उमेदवाराला त्याचं नाव घेऊन त्याला बाबासाहेबानी बोलावल्याचं सांगत होता.

क्रमांक येताच गजू बाबासाहेबापुढं उभा राहिला. नाव-गावानंतर बाबा-साहेबानी त्याला विचारलं,

" कंपोझिंगचं काम शिकावं असं तुला का वाटतं ? "

" कांहीं तरी उद्योग हवा म्हणून मला कंपोझिंग शिकायचं आहे "

" म्हणजे त्यात तुझा कांहीं इंटरेस्ट नाहीं म्हणायचा, असंच ना ? "

गजू बोलला नाही बाबासाहेबानीं शहाकडे पाहिलं. ती काहीतरी भराभर लिहीत होती. बाबासाहेब परत गजूला विचारत होते,

" हल्ली तू काय करतोस ? "

गजूनं सांगितलं.

" शाळा का सोडतोस ? "

" शाळा सोडत नाही "

" ऑं ? मग काम कधीं शिकशील ? "

" सकाळी किंवा रात्री "

" म्हणजे शाळेव्यतिरिक्तच्या वेळात म्हणायचं आहे तुला "

" हो. "

" मग तुझा आम्हाला काय उपयोग ? "

गजू काय बोलणार ?

" बोल ना ? अरे, आमच्या फर्मनं स्वतः स्टायपेंड देऊन विद्यार्थ्यांना ट्रेन्ड करायची जी ही स्कीम काढली आहे-ती आम्हाला काही फायद्याची व्हावी म्हणूनच ना ? "

गजून मान हलवली.

" मग तुझ्याप्रीत्यर्थ स्टायपेंड खर्च करून तुझा आम्हाला काय उपयोग ? "

" मी रात्रपाळीला आपल्या उपयोगी पडू शकेन. "

" आणि परिक्षेच्या वेळीं तेव्हा पण नाहीं–असच ना ? "

" नाहीं. तुम्हाला–आपणाला मी खात्री देतो की मी रात्रपाळीच्या बाबतींत कधींहि गैरहजर राहणार नाहीं.

" जाग्रण आणि अभ्यास याचा ताण न सोसवून आजारी पडला तर ? "

गजू बोलला नाहीं.

तेवढ्यात त्याच्या मुलाखतीची वेळा संपत आल्याच बाबासाहेबाना शहान सुचवल. त्यामुळ मुलाखत आटोपती घेत बाबासाहेब घाईन म्हणाले,

" तुझ्याविषयीं फर्मला आस्था आहे. ती तुझे वडील फर्ममध्यें नोकरीवर आहेत म्हणून नाहीं तू सालस आणि सरळ दिसतोस म्हणून. आम्हाला तुला ॲडजेस्ट करणं शक्य आहे. कारण आम्हाला यग स्टॉफ तयार करावयाचा आहे हळूहळू ओल्ड काढून टाकायचा आहे तेव्हा आम्हीं तुला कपोझिंग शिकवल तर आमच्या गरजेप्रमाण तुझा उपयोग व्हायला हवा.

" शिवाय पाळ्याची माणस नेहमीं बदलत असतात. त्याप्रमाण तुलाहि याव लागेल. हें तुला जमत असल्यास तू विचार करून कळव. फर्म तुझ्याबद्दल सहानुभूतीन विचार करील "

आणि ते प्रतीक्षेन गजूकडे पाहू लागले पण गजू काहीं बोलेना तेव्हा त्यानीं त्याला जायला सागितल. गजू बाहेर पडला.

गजू आनदाच्या भरात भराभर जिने उतरला. आप्पाकडे गेला. मुलाखतीचा विस्तृत वृत्तात त्याना निर्विकारपणान कथन केला. ऐकताना आप्पासाहेब सुन्न–खिन्न होत गेले. शेवटीं तर त्यानी टाक स्टॅडवर ठेवला. टेबलवर कोपर टेकवले. हाताच्या तळव्यात मस्तक दाबून धरलें. गजून जाऊ काय म्हणून विचारल, तेव्हा त्यानी तळव्यातल्या तळव्यात डोक हलवल.

एवढच प्रमाण मानून गजू आपल्या वाटेन लागला. इग्रजीच्या पिरियडल हजर होण्याच्या घाईन चालू लागला.

## दोन

गजू निघून गेल्यापासून आप्पाना स्वस्थता म्हणून कशी ती मिळालीच नव्हती. तरी मधल्या सुटीपर्यंत त्यानी कसाबसा वेळ काढला होता. सुटीची वेळ होताच त्याच्या डोक्यात कल्पना आली. सुटी सपायच्या आत परत प्रेसमध्ये दाखल होण्याच्या हेतून ते तडकाफडकी जागचे उठले.

पाच मिनिटाच्या चालीवर 'सुहास' नामक छापखाना होता. त्याच खर नाव तर 'सुहास प्रिंटर्स हाउस' होत. पण त्याला सुहास छापखाना या नावानच ह्या धद्यातली माणस ओळखत. सुहास छापखाना अगदी रस्त्यावरच माडल्यासारखा दिसत होता. न्हाव्याच दुकान असत, तशासारखा. फरक एवढाच की ह्या दुकानाच्या मागल्या आणखी तीनेक खोल्यात तो पसरला होता. पहिलीतल्या एक चतुर्थांश भागात त्या छापखान्याच कार्यालय होत. तिथ एक टेबल, काहीं खुर्च्या आणि एक बाक असल्यामुळ त्या भागाला कार्यालय म्हणायच. नाहीं म्हणायला मुख्य खुर्चीच्या पाठीशी जी भित होती तिला काहीं कॅलेंडर्स, कामगाराच्या नावाचा तक्ता त्याच्या कामाच्या वेळा, सुटीचा दिवस

आणि रगीत छापील कार्डे – पत्रिका विकणाऱ्या कपन्याकडून नमुन्यादाखल झालेली कार्डे – पत्रिका लावून ठेवलेली एक चौकोनी शो केस वगैरे अडकवल होत. या कार्यालयाच्या डाव्या बाजूला वाहता रस्ता होता. उजवीकडे, खोलीच्या उरलेल्या भागात एक " १० × १५ " च जुनाट ट्रेडल होत समोरच्या भिंतीशीं केसेस ठेवावयाच्या रॅक्सची राग होती. मागल्या खोल्यात जागा सापडेल तिथ तिथ कुठ कपोझिंग तर कुठ बाईडिग, नबरिंग. परफोरेटिग वगैरे काम करावयाची सोय नामक विस्कळीतपणा भरला होता. सर्वांत मागल्या दाराच्या एकीकडे रोलर्स धुण्यासाठी टाक होत. टाक्यासह त्याचा सर्व परिसर भट्टीवरून उतरवलेल्या मातीच्या भाड्यासारखा काळा – करडा दिसत होता. तो ओला नसे त्यावेळी त्याच्यावर वाळलेल्या सोड्याची पाढुरकी बुरशी दिसत असे एरव्हीं शाई, रॉकेल व रोलर – कॉम्पोझिशनचा मिश्र वास येत असे. दाराच्या दुसरीकडे रोलर कॉम्पोझिशन शिजवावयाची मोठी थोरली चूल होती. तिच्यापुढ नेहमीं राख व विझलेल्या कोळशाचा ढिगारा पडलेला असे

याहि छापखान्यात आप्पानी काहीं काल काम केलें असावें. त्यामुळ त्याना पायऱ्या चढताना पाहताच छापखान्याचे मालक आणि चालकहि असलेले श्री. बाबूराव गुप्ते यानीं आप्पाच ऐसपैस स्वागत केल, तें कदाचित् आप्पा नोकरीच्या शोधार्थ आपल्या पायऱ्या चढत असावेत अशीसुद्धा त्याची समजूत झाल्यान असेल

कारण गुप्त्याचा प्रेस शहरातल्या छोट्या प्रेसेसपैकी एक होता. आजकाल अशा प्रेसेसची असावी तशी जिकिरीची अवस्था त्याच्याहि प्रेसची होती. ती कदाचित् गुप्त्याच्या स्वभावामुळेहि असू शकेल. कारण तिथ काम करणाऱ्या बहुतेक कामगारात, कुणी नुसता वेळ घालविण्यासाठी, कुणी दृष्टि कमजोर झाल्यामुळ, कुणी अनियमित वागत असल्याच्या करणामुळ, कुणी जोडधदा म्हणून नोकरीकडे पाहात असल्याच्या कारणामुळ, कुणी या धद्यात मन नसल्याच्या कारणामुळ तर कुणी आणखी कशामुळ गावातल्या मोठमोठ्या प्रेसेसमध्यें बदनाम होऊन हाकलले गेले किवा स्वतः नोकऱ्या सोडून आले – असेच कामगार या प्रेसमध्यें येत असत काहीं कामगार दुसरी गाडी मिळण्यापूर्वीं प्रवाशान वेटिंग-रूममध्ये वेळ काढावा तसे इथ येऊन वेळ काढत असत.

बाबूराव गुप्तेदेखील अशा माणसाची गरजेपुरती दखल घेत असत. त्यामुळ

त्याच्या प्रेसला कोणताहि सरकारी ॲक्ट मान्य नसे. म्हणून त्याच्याकडे कुणी कॉन्ट्रॅक्ट पद्धतीन, कुणी रोजदारीन तर कुणी ॲक्टन ठरविलेल्या पगारावर सही करून कमी पगार घेण्याच्या अटीवर काम करीत असत. अशा माणसामुळ असेल वा बाबूरावाच्या अवगुणामुळ असेल, सदर 'सुहास प्रिंटर्स हाऊस' चा नुसता 'सुहास छापखाना' शिल्लक राहिला होता. त्यामुळ इच्छा असून बाबूरावाना प्रेसमध्यें साध्या लग्नपत्रिकाचा स्टॉक ठेवता येत नसे एखाद्याची ऑर्डर घेतली कीं ते ऐनवेळीं सायकल घेऊन कुण्यातरी कामगाराला जवळपासच्या पेपरमार्टमध्यें पाठवत. कधी कधीं स्वतः दौडत गिऱ्हाइकाला हव्या असलेल्या शे-दोनशे पत्रिका घेत. छापखान्यात परतत. कधीं कधीं गिऱ्हाईकान निवडलेली पत्रिका त्याना कधीं उधारीच्या कारणामुळ तर कधी स्टॉकमध्यें नसल्याच्या कारणामुळ पेपरमार्टमध्यें मिळत नसे. त्यावेळीं बाबूराव खुश्शाल स्वतःची निवड राबवत. कार्ड, पत्रिका किंवा कागद निवडत गिऱ्हाईकाच्या समतिखेरीज छापून काढत. हेंच त्याचं शाईबाबतसुद्धा होत असे. डब्याच्या तळाशी सापडेल ती शाई ते वापरत असत. यामुळ कित्येक गिऱ्हाईकाशी त्याची हुज्जत होत असे. काहीं चोखदळ आणि तापट गिऱ्हाईक छापलेल काम बाबूरावाच्या टेबलवर फेकून निघून जात असत. ॲडव्हान्सच्या रकमेवर पाणी सोडत असत. तर एखादा कायद्याची भाषा वापरून ॲडव्हान्स वसूलहि करीत असे. खरा तर तो त्याच्या शरीरयष्टीचा परिणाम असे. यामुळ बाबूरावाकडे एकदा आलेल गिऱ्हाईक सहसा पुन्हा येत नसे.

तरीहि जीं गिऱ्हाइक येत, त्याच्यांत नगरपालिका, जिल्हापरिषद किंवा अशा सारख्या सरकारी–निमसरकारी सस्था असत. त्यातले अधिकारी बाबूरावाकडून पैसा खाऊन प्रेसला काम देववत असत. कित्येक लोक उधारीसाठी येत असत. यामुळ त्या प्रेसची आर्थिक दशा युद्धात पडलेल्या दुबळ्या राष्ट्रासारखी नेहमींच राहात असे. आठवडी पेमेन्ट देखील बाबूरावाकडून जवळ जवळ सहा दिवसाच्या हत्प्यानीं कामगाराना मिळत असे. त्यावेळीं कामगारात नि त्याच्यात वारवार वादावादी चालत असे. परिस्थितीन म्हणा वा स्वभावान म्हणा, एखादा कामगार हमरीतुमरीवर देखील येत असे. सडकेवर गर्दी खोळंबत असे. साधारणतः बाबूरावाचा सीझन नसे त्या काळात अस महिन्यातून दोन–दोनदा तरी चालत असे.

म्हणून बाबूरावाकडे माणस टिकत नसत. त्याच्या प्रेसमध्यें बहुधा नेहमी राहणाऱ्या माणसाबद्दल त्याचें मत नेहमींच नाराज असे. म्हणून ते नेहमींच नवनवी पोर शिकवून तयार करीत असत. पण शिकून झालेली हींहि मुलं पख फुटलेल्या पाखराप्रमाण संधि येताच निघून जात असत तरी चिकाटीन बहाद्दर म्हणा वा गरजेन लाचार म्हणा – असलेले बाबूराव आपली उमेद कधींहि सोडत नसत. धंद्यासोबत तो शिकवण्याची ते शाळाहि चालवत असत. तसच त्याच्याकडून कितीहि भाडून सुटलेला कामगार परत काही दिवसानी त्याच्या दाराशी आला तर ते मागल सार विसरून त्याला कामावर घेत असत.

'अशा' प्रेसच्या 'अशा' मालकान आता आप्पा देशकराना शक्य तितक्या सन्मानान् बाजूच्या खुर्चीत बसवलं होत. आपल्या नेहमींच्या पद्धती-प्रमाण अघळपघळ हसताना ते म्हणत होते.

"बाला आप्पासाहेब, मी आपली काय सेवा करू शकतों ?"

यातल्या कृत्रिमतेची आप्पाना ओळख होती. पण कृत्रिम का होईना—माणसाला मान हा हवाच असतो. आप्पा त्याला अपवाद नव्हते. ते तितक्यान फुलले. ह्याच मानान परत जाता आल तर फार बर होईल—अशा विचाराना त्यानी क्षणभर आपला विचार बाजूला ठेवण्याचा प्रयत्न केला. पण ते नुसत्या मानासाठी इथ आले नव्हते तरी दुहेरी अर्थान बोलायला लागले,

"अहो, सेवा तुम्हीं करायची की आम्हीं ?"

"वा : ! अस म्हणून कुठ झालय् काय आप्पासाहेब ? अहो, सेवा ही आम्हा तरुणानी करायची असते ..तुमच्यासारख्या वृद्धानी नव्हे !

"जाऊ द्या. बोला काय घेणार ?"

आप्पा बोलण्यापूर्वींच बाबूरावानीं पुढ्यातल्या केसवर काम करणाऱ्या कपॉझिटरला बोलावल हें करीत असताना प्रथम टेबलचा ड्रॉव्हर आणि नतर खिसा चाचपला. शेवटीं म्हणाले,

"जारे मारुती, बच्चुकडून दोन पान ये बर घेऊन उधार !"

"त्याचे मागचे पैसे देल्ले काय ?"

बाबूरावानी त्याच्याकडे रोखून पाहिल. त्यावर दबण्याऐवजी मारुती आपली बाजू अधिक स्वच्छ करू लागला,

"नाहीं. मग्रा बच्चू मले मनत होता, मनून मंतो–"

" त्याला म्हणा – तुझ्या रुपाया–दोन रुपयासाठी मी पळून चाललोय् की काय ? "

बच्चूचा राग मारुतीवर ओकल्यावर बाबूराव म्हणाले,

" नाहींतर अस कर, हमीदकडून आण. त्याला माझ नाव साग म्हणजे तो नाही म्हणणार नाहीं जा–"

त्याच ओघात ते आप्पाना म्हणाले,

" ह बोला आप्पासाहेब. कस काय येण केल ? "

आप्पानी थोडा विचार केला. मग आपली अन् गजूची सर्व बाजू बाबूरावाना समजावून सागितली. शेवटीं म्हणाले,

" तेव्हा माझा असा विचार आहे की आपण गजूला आपल्या प्रेसमध्यें काम शिकवाल तर बर होईल "

" अरेऽवा ! हे काय विचारण झाल काय देशकरसाहेब ? "

खुषी लपविण्याच्या प्रयत्नात अयशस्वी होत बाबूराव म्हणाले,

" अहो, प्रेस तुमचा आहे. मला न विचारतासुद्धा तुम्हीं त्याला पाठविल असत तरी चालल असत. अहो, नुसतं काम शिकवायला काय जात माझ ? त्याबद्दल काय मला काहीं खर्च येतो की टॅक्स भरावा लागतों सरकारात, ऑ ? "

आणि वाकडी मान करून ते खळखळा हसत सुटले. आप्पा मात्र उपकारान भारावले होते. कदाचित् त्याच्या आयुष्यात आलेल व त्याना फार मोठ वाटणार हे पहिल–वहिल यश असाव. कदाचित् तें इतक विनासायास येईल याची त्याना पराभवाच्या पूर्वानुभवावरून कल्पना नसावी. त्यामुळ क्षणकाल त्याना काय बोलाव तेच सुचेना. तेव्हा अशा प्रसगीं कुणीहि बोलाव तेच आप्पा बोलले,

" पण म्हटल, आधीं विचारून घेतलेल बर.. "

लगोलग वेळेची जाणीव होताच ते सावरते होत म्हणाले,

" बर, चलतों–"

" अहो–हें काय ? पान येताहेतना तुमच्यासाठी, आणि तुम्हीं जायला निघालात ? "

" हो. गेल पाहिजे. वेळा होत आली असेल–"

अस पुटपुटत आप्पानी घड्याळासाठीं चारीकडे पाहिल. पण ते फक्त बाबूरावाच्या मनगटालाच असलेल त्याना दिसल. बाबूरावानी वेळ सागितला.

आप्पाना आणखी पाच–सात मिनिट तिथ थाबावयास हरकत नव्हती.

आप्पा खुर्चीत स्थिर झाले. बोलता बोलता वेळेवरून आप्पानी बाबा-साहेबाच्या ' स्ट्रिक्टपणा 'चा विषय काढला. मग बाबासाहेबाच अन् त्याच्या प्रेसच सार काहीं येऊ लागल. त्यात आलेल्या आणि येऊ घातलेल्या नवीन मशीन्स होत्या, नवीन मॅनेजमेन्ट होती, बाबासाहेब सुरू करणार असलेल दैनिक होत, प्रकाशनाचा व्यवसाय वगैरे योजना होत्या. हे सार ऐकताना आणि त्याबद्दल अधून–मधून बोलताना बाबूरावाचा सूर, आणि चेहरा सतत बदलत होता काहींदा त्यात हेटाळणी होती. काहींदा हेवा होता. काहींदा कुतूहल तर बरेचदा बाबासाहेबानी एवढा पैसा एकाएकी कुठून आणला या-बद्दल सशय होता. एक–दोनदा त्यानी बाबासाहेबाच्या सेक्रेटरीची चौकशी केली होती. ती त्याच्या सोबत किती वेळ राहते, तिला पगार काय वगैरे इतराच्या दृष्टीन अनावश्यक पण बाबूरावाच्या स्वभावाला आवश्यक अशा बाबींवर त्यानी बोलून पाहिल होत

पण या सर्व बाबतींत, जवळ जवळ सारख्याच प्रमाणात आप्पासाहेब उदास दिसत होते. अगदीं कायमचे

वेळा सपत आल्यावर आप्पा पुन्हा उठू लागले. तेव्हा बाबूरावानी त्याना परत पानाच्या आठवणीन अडवून धरल. एकदा स्वतः जागचे उठून मारुती-च्या वाटेकडे पाहिल. दुसऱ्यादा गोकूल नावाच्या दुसऱ्या एका कपॉझिटरला सडकेवर उभ करून मारुतीची वाट बघायला लावली तिसऱ्यादा आप्पा घाई करू लागले तेव्हा गोकूललाहि हमीदच्या पान–ठेल्यावर रवाना केल. तोहि परतेना तेव्हा आप्पानी बाबूरावाना वेळ विचारला. ऐकताच ते ताडकन् जागचे उसळले. बाबूरावाच्या आग्रहाला चुपकारत म्हणाले,

" अहो, पान नाही आलीत तरी काही हरकत नाहीं. तीं आणायला तुम्हीं माणस पाठविलीत ना ? हेच फार झाल. यातच मी माझ पान मिळाल अस समजतो बर, तर मग उद्यापासून "

" अगदीं निश्चित. "

आप्पासोबत जागचे उठत बाबूराव म्हणाले,

" मी माझी ड्यूटी म्हणून आपल्या चिरजीवाला ॲड्जेस्ट करून घेईन. तुम्ही आता निश्चित राहा "

# तीन

आप्पा वाड्यातून चालत होते. पण अत्यंत सावकाशींत आणि सावधपणान. पूर्वी जसे ते सरावामुळ भराभर चालूनहि वाड्यातल्या आडव्या-उभ्या नाल्या-मोऱ्या ओलाडत असत आणि स्मरणपूर्वक कुणाच्या दारात काय पसारा असतो तो लक्षात ठेवून चुकवत असत तस आता त्याच्याकडून फार कमी होत असे. हें कदाचित् ते आता पूर्वीपेक्षा अधिक विचार करीत असल्यान किंवा डोळ्यातल्या अधूपणासोबत मेंदूत विस्मृति वाढत असल्यान त्याच्याकडून होत असाव. कशान का असेना-पण आप्पानीं आता इतक्या सावधपणे चालूनदेखील वॉचमेकरच्या दारातल्या पादत्राणाना ते ठोकरावले होते. बकारामच्या दारातला पाट त्यानीं तुडवला होता. अबकारी अधिकाऱ्याच्या घरातून आडव्या आलेल्या मोरींत ते गचकता गचकता वाचले होते. जोशीबुवाच्या दारातली पालथी बादली ठोकरीन सरळ केली होती. स्वतःच्या दारातली सरळ बादली पालथी केली होती. खर तर हें सार टाळण्यासठींच ते अलीकडे सरळ आपल्या हद्दींतून न चालता सोयीप्रमाण चालण्याचा प्रयत्न करीत असत. म्हणजे नागमोडी

चालत असत. तरी त्याच्याच्यान हें घडतच असे

आप्पा घरात गेले तेव्हा गजू टेबलवर अभ्यासाचा पसारा मांडून बसला होता. वाहाणा काढताना आप्पानीं त्याच्याकडे तिरकस–संतप्त नजरेन पाहिल. काम न देणाऱ्या यंत्राकडे पहाव–तशा नजरेन पाहून घेतल. त्याच्याकडे लक्ष नसलेला गजू गेल्या कित्येक दिवसात नव्हता, तितका आज खूष दिसत होता.

सुधा नेहमींसारखी चुलीवर काहींतरी शिजायला मांडून चूल आणि दिव्याच्या उजेडात अभ्यासाच पुस्तक घोकत होती. तिच्या मोठ्यान वाचण्या-वर गजून एकदा आक्षेप घेतला होता. त्याच्या अभ्यासात व्यत्यय येतो, अस त्याच म्हणण होत. पण मोठ्यान वाचल्याशिवाय पाठातर होत नाहीं, शब्दो-च्चार स्पष्ट होत नाही अस तिन तिच्या कुण्यातरी मास्तराच म्हणण त्याला सागितल होत गजू गप्प राहिला होता सुधा मोठ्यान वाचत होती.

उद्या परेड असल्यान बाळ आपल्या एन्.सी.सी. च्या कपड्यावर तादळाची निवळ मारीत होता. इस्तरी नामक त्याचा ताब्या ग्राजूला धुपत होता. खर तर इस्तरीसाठी टेबल न मिळाल्यान तोहि तिच्यासारखाच आतून धुपत होता

आप्पावर लक्ष जाताच गजू ताडकन् खुर्चींतून उठला. कपडे घेण्यासाठी पुढ आला. वस्तुतः मघाच्या घटनेन आप्पाना वाईट वाटल असेल या कल्पनेन त्यालाच दिवसभर वाईट वाटत राहिल होत आता खरोखर आप्पाना वाईट वाटल काय हे पाहण्यासाठी तो आप्पाभोंवतीं घुटमळू लागला. पण त्यान कपड्याना हात पुढ केला तेव्हा आप्पा म्हटल तर रागान अन् म्हटन तर शातपणान म्हणाले,

“ असू दे – ठेवतो मी. तू कर तुझ काम ”

तरीहि गजून त्याना मदत केली. कोट त्याच्या जागेवर अडकवला. पुन्हा आप्पाना म्हणाला,

“ वाढून घ्यायला सागू काय ? ”

“ थाब, थोडा वेळ ”

आप्पानी सुस्कारा टाकला. खुर्चींत बसले. आढ्याकडे पाहू लागले. मग टेबलवरल्या पसाऱ्याकडे अशात गजू खोळंबला असल्याच त्यानी लक्षात घेतल. पण म्हणाले,

“ काय, अभ्यास चालला आहे वाटते ? ”

पुन्हा पुन्हा हेंच काम विचारतात? पण तो म्हणाला,

" हो, आठ दिवसावर परीक्षा आली आहे. तेव्हा म्हटल करावी काहीं तरी तयारी . "

" परीक्षा ? "

" हो सहामाही परीक्षा नाही काय आता ? "

" अस्सं –– "

आणखी सुस्कारा टाकल्यावर आप्पा म्हणाले,

" पण कारे, तू तर म्हणतोस की तुला अभ्यासाची तेवढीशी गरज नाहीं म्हणून केवळ शाळेतल्या अभ्यासान पास होऊ शकतों मग हा अभ्यास कसला ? "

" खोट नाहीं सागत आप्पासाहेब. क्लबातली नोकरी धरली असती तर मी तेच करणार होतों, मला विश्वास होता. आता एक वेळ आहे म्हणून बसलोय् मन रमवायला "

" आणि प्रेसमध्यें काम शिकायला लागला असता तर नसत जमल, असच ना ? "

आप्पाच्या बोलण्याचा अर्धवटसा रोख गजूला कळून चुकला. तो चाचपडत म्हणाला,

" तसं नाही आप्पासाहेब बाबासाहेबानी मला निवडलच असत तर मीं हें सार करू शकलो अस.तो पण त्यानी मला निवडलच नाहीं – त्याला मी तरी काय करणार ? "

आप्पा उदासपणे म्हणाले,

" तू वागलासच तसा त्याच्याशीं मग त्याला ते तरी काय करणार ? तुझं नशीब समज, वा तेच म्हणून म्हण – अजूनहि तुझ्याबद्दल चागल मत ठेवू शकले . दुसरा कुणी असता तुझ्या ठिकाणी तर त्याची तू दिलीस तशी उत्तर त्यानी ऐकली नसती लगेच गेट-आऊट म्हणून बाहेर काढल असत..."

गजूला अचबा वाटला. न राहवून तो म्हणाला,

" अशी कोणती उत्तर दिलीत आप्पासाहेब, मीं बाबासाहेबाना ? "

" त्यातला उर्मटपणा नसेल जाणवला तुला तू लहान आहेस. पण मी जाणतों इतराच्या दृष्टीन हीं उत्तर तितकीशीं उर्मट नसतीलहि. पण बाबासाहेब

इतर प्रेसमालकासारखे नाहींत "

"पण आप्पासाहेब —"

सात्त्विक संतापान गजू म्हणाला,

"मीं अस काय बोललो त्याना की ज्याला त्यानी उर्मट म्हणाव ?"

"त्यानी नाहीं म्हटल. माग बोलण्याइतके ते दुबळे नाहींत. निदान आपल्या-सारख्याच्या बाबतीत तर मुळीच नाहीं रागावले असते तर तेव्हाच त्यानी तुला सुनावल असत . पण तू माझा मुलगा म्हणून असेल "

इथ आपण उगाच भाव खात आहोंत असं वाटून आप्पासाहेब म्हणाले,

"किंवा तुझ दैव म्हणून असेल —"

आता न राहवून गजू म्हणाला,

"आप्पासाहेब, तुमचा कुणी तरी माझ्याबद्दल गैरसमज करून दिला आहे. बाबासाहेब रागावतील अस मीं काहीहि बोललो नाहीं सागा बर तुम्हाला कुणी काय सागितल ते ?"

"कुणी कशाला सागायला हव —"

आप्पाचाहि सूर आता तीव्र झाला.

"तूच नव्हत सागितल मघा काय - काय बोलला ते ?"

"पण यात उर्मट काय आहे ?"

"तुला नसेल —"

आप्पा म्हणाले,

"पण मी तुला मुलाखतीस जाण्यापूर्वी सागितल होत ना कीं केवळ हो ला हो आणि नाहींला नाहीं करायच म्हणून ?"

"म्हणजे मला शक्य नव्हत, त्याबद्दल मी हो म्हणायच होत ?"

"तुला काय शक्य नव्हतं ?"

पण गजू यावर स्पष्ट पवित्रा घेऊन ज्यासाठीं आपण हे सार करीत आहो ते बिघडून जाईल अस आप्पाना वाटल. ते लगेच म्हणाले,

"काय बिघडल असत रे ?"

"कामावर रुजू झाल्यावर त्यानी नसत म्हटल की तू कबूल केल्याप्रमाणं वागायला हव म्हणून ?"

"कुणी नसत म्हणत, आणि कुणी नसत वागत. सरकारी नोकर नोकरीला

लागताना शपथा घेतात. मी सरकारशी एकनिष्ठ राहीन. सरकारवर येणाऱ्या कोणत्याहि आपत्तीला तोंड देईन. सरकारन दिलेल्या वेतनात समाधान मानीन. लाचलुचपत करणार नाहीं. जनतेला फसविणार नाहीं ”

ते थाबून म्हणाले,

“ पण साग बर, हें सार पाळणारा कोणता माणूस आहे सरकारी नोकरींत ? साध्या कारकुनामध्यें नाहीं म्हणत मीं बड्याबडया मन्त्र्यात तरी दाखव बर आपापल्या शपथेप्रमाण वागणारा माणूस, आहे काय तर ? ”

“ अरे, ह्या साऱ्या कबूल करावयाच्या गोष्टी असतात. एकदा तू सार कबूल करून प्रवेश मिळवला असता म्हणजे पुढ काय करायच ते आपण पाहून घेतल असत. तुझा एवढा मोठा बाप तिथ होता. काय तो तसाच स्वस्थ बसला असता ?

“ अस झाल असतं, तर लगेच स्टायपेड सुरू झाली असती. मलाहि थोडा आधार झाला असता. तुला चागल्या प्रेसमध्ये – गरजच पडली असती तर नोकरीसुद्धा करता आली असती. दैव बलवत्तर असत –'तर हा-हा म्हणता तू मॅट्रिक होऊन गेला असता . ”

तरीहि गजू म्हणाला,

“ पण आपल्याकडून खोट नाहीं कबूल करवल बुवा, बाबासाहेबापुढ– तुम्ही काहींहि म्हणा––”

यामुळ आप्पाना त्याचा खूपच राग आला. कारण आपल्या शिक्षणासाठीं तो कुणावरहि विश्वास टाकायला तयार दिसत नव्हता. उलट त्याना अप्रामाणिक ठरवून स्वतः प्रामाणिकपणाचा आव आणत होता. त्यामुळ त्याला जाणवेल न जाणवेलशा नजरेन त्यानी त्याच्याकडे रोखून पाहिल पण हेतुमुळ त्याना शात राहाव लागल. ह्या सर्वांची प्रतिक्रिया ही उमटलीच,

“ खर म्हणजे, तुला शाळेखेरीज इतर काहीच शिकायच नाहीं, हा त्याचा अर्थ.. ”

“ तस नाहीं आप्पासाहेब ! ”

आपल्या कुटुबासबधींच्या जिव्हाळ्यावर घाव बसलास पाहून गजू परत चिडला,

“ बाबासाहेबानी नाकारल, त्याला मी तरी काय करू ? ”

" बाबासाहेबाची ऐशीतैशी -- "

आप्पानी लगोलग संधि साधली,

" त्यानी नाकारल म्हणून तुला कुठच काम शिकायला मिळणार नाही अस थोडच आहे. म्हणण आहे ना की आवड असली की सवड आणि संधि मिळतेंच म्हणून ! पण आवड मात्र असायला हवी --"

आप्पाच्या चेहऱ्यावरून गजूला त्याच्या हेतूचा सुगावा लागला असावा. तो गप्पच राहिला. आप्पाना आणखी अंदाजू लागला. हें पाहून आता आप्पा एकदम त्याला विचारू लागले,

" चल बोल, आहे काय तयारी ? "

" कुठ ? "

" कुठहि. तयारी आहे काय ते बोल ? "

" . .. "

" साग ना ? "

" स्टायपेंड मिळेल काय ? "

" स्टायपेंडची ऐशीतैशी ! " तुला काम शिकायच आहे की स्टायपेंड मिळवायची आहे ? "

" स्टायपेंड मिळाली असती तर वह्या-पुस्तकाचा खर्च निघाला असता . "

यावर आप्पाच्या तोंडात म्हणजे तू शाळा शिकण्यासाठी प्रेसच काम शिकायला तयार होत आहे म्हणायचा- अस आल होत पण यान सारच बिघडेल म्हणून ते शातपणे म्हणाले,

" सारेच प्रेसवाले स्टायपेंड देऊन शिकवत नाहीं हा व्यवसाय. बाबासाहेबा सारखा एखादाच असतो तसा. म्हणून मी तुला त्याच्याकडे शिकण्याचा आग्रह चालवला होता. आताहि विचार कर . कारण स्टायपेंड देऊन शिकवणारे प्रामाणिकपणे शिकवतात. पैसा व्यर्थ जाऊ नये याची त्याना तो घेणाऱ्यापेक्षा जास्त काळजी असते. शिवाय बाबासाहेबानीं अगदीं पद्धतशीरपणान शिक्षणक्रम आखला आहे तुझ्यासारखा हुशार मुलगा तो पाहता-पाहता हस्तगत करील "

ओघात आल म्हणून परत बाबासाहेबाबद्दल आप्पानी बोलायला सुरुवात केली होती. पण गजूच्या चेहऱ्यावर अपेक्षित प्रतिक्रिया नसल्यान त्याना

आपल्या मुद्दयावर याव लागल,

"मुख्य म्हणजे, तुला शिकायच आहे काय–तेवढ आता साग... जाऊ दे स्टायपेडच "

"हो. शिकेन वाटल्यास..."

"तर मग जा उद्यापासून सुहास छापखान्यात "

नको तें एवढ्या समीप येऊन ठेपल असेल, अशी गजूला कल्पना नव्हती. तो रफ वहींतल्या एका गणितावर वर्तुळ काढू लागला. त्यावर रेघा ओढू लागला. वारवार. या दरम्यान आप्पा बोलत होते. सुहास छापखान्याचा आणि बाबूराव गुप्त्याचा भलेपणा आळवत होते. यावर गजू नुसता हो ला हो आणि नाहीं ला नाहीं करीत होता बराच वेळ यापेक्षा अधिक काहीं निष्पन्न होण्याची लक्षणं दिसेनात तेव्हा तुटण्याची पर्वा न करता आप्पानीं ताणून विचारल,

"बोल, मग जातोस उद्यापासून ?"

"उद्याच्चपासून ?"

"मग कधी, मी मेल्यानतर जाणार आहेस काय ?"

सवालासरशी आप्पा ताडकन् खुर्चीतून उठले. पण काहींएक न सुचून उत्तरासाठीं त्याच्या तोडाकडे न्याहाळू लागले. तसा तो म्हणाला,

"किती वेळ जायच शिकायला तिथ ?"

"सकाळीं दहा वाजेपर्यंत जायची तयारी आहे ना तुझी ?"

"हो "

"मग झाल तर!"

"पण त्यानी तस कबूल केल काय ?"

"आता लेखी देऊ काय तुला लिहून ?"

गजून मान खाली घातली. सतापाच्या भरात आपल्याकडून भलतच काहीं बोलल जाऊन जुळण्याच्या मार्गावर असलेल तुटू नये म्हणून ते तावातावान चालत घरात आले. आपल्या इस्तरीच्या कार्यात मग्न असलेल्या बाळकडे त्यानी चिडून पाहिले. पण त्यान त्याना दाद दिली नाहीं. त्यामुळ सुधाल: त्यानी वाढायला सागितल अन् ते बाहेरल्या न्हाणीकडे निघून गेले.

टेबलवरला गजू अजूनहि मघाच्या वर्तुळावर पेन्सिल फिरवत होता. आता त्याचा घेर पूर्वीपेक्षा खूप जाड आणि बळकट झाला होता. काळ्या रगाचा. —

# एक

दिवस रविवारचा होता. वेळा सकाळची होती. आप्पा कुठतरी बाहेर गेले होते. बाळ परेडला गेला असावा. त्याच्या वास्याच अगण सुधा पाण्यान धुवून काढत होती फड्याच्या थोटफान ती अगणातली खडबडीत फरशी खरडून काढत होती व्हराडयातला गजू आप्पाचे खिसे रिकामे करीत होता. खिसे हुडकलेला एकेक कपडा पारोशा कपडयाच्या ढिगाऱ्यावर फेकत होता. त्यात त्याचेहि काहीं कपडे होते. हे सारे कपडे तो चुलीवर उकळणाऱ्या सोडयाच्या पाण्यात टाकणार होता. आता खिशातून निघालेल्या वस्तू टेबलवर जमा होत होत्या. आप्पाच्या खिशातून काहीं नव्या-जुन्या पैशाची नाणीं निघाली होतीं. काहीं घडया पडून चुरचुरीत झालेले कागदाचे तुकडे निघाले होते. स्वतःच्या खिशातून पेन्सिल, रबराचा तुकडा आणि सहामाही परिक्षेचें प्रोग्रेस कार्ड काढताना गजूला दोन खिळे पण सापडले होते. पैकीं एक तो केस पाठ करीत असता बाबूरावानी हाक मारली असताना उचललेल्या खिळ्याचा खण विसरल्यान गडबडींत तो कुठ टाकावा हें न सुचून गजून खिशात टाकला होता.

दुसरा गोकूलन थट्टेखातर त्याला फेकून मारला होता नि तो त्याच्या छाती-वरल्या खिशात जाऊन बसला होता. आता तो ते खिळे तोंडावर धरून पाहूं लागला. पैकी एक 'द' आणि दुसरा 'ब' होता. प्रेसमध्यें गेल्यावर हे खिळे त्याच्या खणात ठेवून द्यावेत, या विचारान गजून ते प्रोग्रेस-कार्डाइतके जपून ठेवले.

अशात त्याच्या दाराशी केशव थाबला. तोवर त्याच्या तोंडात विडी होती अन् हातात बादल्या होत्या कमरेला वीतभर चड्डी अन छाताडावर मळकट बनियन-असा त्याचा अवतार होता. आता त्यान बादल्या गजूच्या दारापुढ ठेवल्या. विडी चिमटीत धरली. नाकातून धूर आणि तोडातून केशवन शब्द काढलेत,

"कोण, गजूभाऊच काय ?"

"हो. याना नानासाहेब .."

"आम्हीं म्हटल्यावर-"

तो पायऱ्या चढत म्हणाला,

"आजकाल तर तुमचा काहीं पत्ता लागत नाहीं ? काय गावात असता की नाहीं हल्लीं ?"

"वा ! गावात नसायला काय झाल ?"

"मग दिसले कसे नाही एवढयात ?"

"कोण, मी की तुम्ही ?"

"तेहि खरच !"

आपल्या गावात नसण्याबद्दल केशवला भूषण वाटत असे. तो म्हणाला,

"मी घरीं असेल तेव्हा तुम्ही बाहेर असणार आणि तुम्हीं घरी असणार तेव्हा मी बाहेर असणार. नाहीं— त्यामुळ होत राहिली असेल इतके दिवस आपली चुकामूक—

"हो मी तुम्हाला काय म्हणत होतों बुवा ?

"आली आठवण. मला परवाला काळे साहेब भेटले होते... ते तुमच्याबद्दल चौकशी करीत होते "

"काळेसाहेब कोणते हो ?"

"वा ! एवढ्यात विसरलात सुद्धा ? छान. अहो. ते नाहीं काय-क्लबचे सेक्रेटरी ?"

" ह–ह, ते म्हणताय्–त्याच नाव काळे आहे, काय–मला माहीत नव्हत–"
गजाननचा सूर खालावत गेला,
" काय म्हणाले ? "
" त्याची तुम्हाला कल्पना असेलच म्हणा आता सागून तरी काय उपयोग. अहो, त्यानी माझी चागलीच हजामपट्टी केली ! त्याच्या बोलण्यान मला असं फील झाल, तुम्हाला काय सागू ! मींच म्हणून सार निभावून घेतल जाऊद्या. "
तोच परत म्हणाला,
" पण तुम्हीं त्याना होकार देऊन कामावर का रुजू झाले नाहीं, याच कारण नाही कळल मला––"
गजू क्षणभर गप्पच झाला त्याचा चेहराहि पडला. तो दोन कारणानी. एक तर त्यान दिलेले केशव आणि काळे या दोघाचे शब्द तो पाळू शकला नव्हता. याहि वयात ( अन् याच वयात म्हणून असेल ) शब्द पाळण तो महत्त्वाच समजत होता. दुसर नि महत्त्वाच तो सध्या ज्या मार्गावर चालत होता त्या मार्गावर अगतिकपणे ढकलला गेला होता. पण क्षणार्धात ज्या समजसपणान तो ह्या गर्तेत ओढला जात होता–त्याच समजसपणान त्याला आताहि काबूत आणल केशवला आप्पाचा दुबळेपणा कळून त्याच्यात त्याच्याबद्दल अनादर निर्माण होणार नाहीं, अशा भाषेत त्यान सार काहीं सागून टाकल. या दरम्यान कधीं कळत नि कधी नकळत त्यान आपल्याकडे काही दोष घेतले.
गजूच सपण्यापूर्वींच केशव सार काहीं समजला असावा त्याच्यात हालचाल सुरूं झाली. त्यान नकोशा नजरेन सुधाकडे पाहिल. बोलण्याच्या ओघात आप्पा आणि बाळची चौकशी करून घेतली त्याची गैरहजेरी त्याच्या चेहऱ्यावर समाधान चमकवून गेली. शेवटी पाणी वाहात असल्याच निमित्त सागून त्यान बादल्या उचलल्या. चालण्यापूर्वीं, गजूची उत्सुकता चाळवेल अशा आवाजात म्हणाला,
" तुम्हाला वेळ असला तर या आमच्याकडे . "
हवा तो परिणाम गजूवर झाला,
" का, काहीं काम होत काय ? "
" काम फारस नाहीं. पण होत थोड बोलायच तुमच्याशीं असला वेळ

तर बघा थोडा—"

आणि तो तोंडात विडी घालून चालू लागला.

गजूच्यान राहावल नाहीं. फ्रीशीप-प्रकरणीं पेठ्यानी बोलावल असता तो गेला होता त्या उमेदीन हातातल काम टाकून आता केशवच्या घरात शिरला. यावेळीं केशव आपल्या पद्धतीन भिंतीशीं टेकून बसला होता पण गजूच स्वागत मात्र त्यान नेहमींच्या पद्धतीन सतरंजीच्या कोपऱ्यावर हात मारून केल नाहीं. नुसताच 'बसा' म्हणाला, पत्रिका बघायला आलेल्या माणसा-सारखा गजू बसला. बुद्धि अन् तर्क पणास लावून केशवला अदाजू लागला. केशवसुद्धा गजूबाबत हेच करीत असावा. अखेर केशवच यशस्वी ठरला. मोठ्याच मुत्सद्दीपणे म्हणाला,

"गजाभाऊ, मीं तुम्हाला चार गोष्टी सागितल्या तर तुम्हाला राग तर येणार नाहीं ना ?"

"नाही बुवा. कोणत्या ?"

"माझ म्हणण अस की, तुम्ही ह्या उखळात डोक घालायला नको होत दुसर काहीं नाही "

"म्हणजे, मीं नाहीं समजलों—"

"म्हणजे असं, तुम्ही सध्या ज्या वयात आहात ते म्हणजे विशीच्या आतल. शास्त्रकारान म्हटल आहे, माणसान विद्या कमवावी विशींत आणि वित्त कमवाव तिशींत. तेव्हा तुमच हे विद्या कमविण्याच वय तुम्हीं छापखा-न्याच्या धद्यात फुकट घालवायला नको होत "

गजू घाबरलाच. शिक्षणाच वय फुकट जात असल्याची कल्पनाहि असह्य होऊन तो म्हणाला,

"पण नानासाहेब, मी शाळा सोडली असं कोण म्हणत ? माझी शाळा पूर्ववत् सुरू आहे मॅट्रिक होण्याचा माझा निश्चय कायम आहे "

"ईश्वर करो आणि तस घडो—"

केशव सथशा आवाजात पुढ म्हणालाच,

"पण मला वाटते, या बाबतींत देव तुमच्यावर तितकासा प्रसन्न नसावा तुम्ही छापखान्यात जाऊ लागल्याच कळताच अण्णासाहेबहि म्हणाले होते की माणसाच दैव ही काही और गोष्ट असते म्हणून .मला वाटते–ते खर-

सुद्धा असाव   नाहीतर तुमची मध्यें गेली तीं वर्षे वाया गेली नसतीं—"

"पण त्या गोष्टी माझ्या हातीं नव्हत्या नानासाहेब   मी आजारी—"

"आताहि तुमच्या हातीं काय राहिलं आहे?"

आपल्या शब्दाची तीव्रता त्याच्या लक्षात येताच तो बदलला,

"मला तुमचा हिरमोड करायचा नाही. तुमच्या उत्साहावर विरजणहि टाकायच नाहीं पण आमच्या तुमच्याबद्दल ज्या काहीं आशा आहेत, जें काय वाटत—त्यामुळ हें बोलतों त्याचा राग मानू नका तें तुमच्याहि भल्याचं आहे"

गजू नुसता ऐकत होतास पाहून केशवच वक्तृत्व म्हणा—अगर स्वार्थ म्हणा, उफाळून आला,

"आपल्या समाजात शिक्षणाइतक कशाला महत्त्व नाहीं. माझ्या डायरीत काही अशा माणसाची नाव आहेत की जी व्यापारात किंवा जुव्या—फिचर-सारख्या व्यवसायात हजारोनीं रुपये मिळवतात. पण त्याचीं लग्न होत नाहीत. तीं सतत माझ्या माग फिरतात. मुलगी धुडाळून देण्याबद्दल दोन—दोन हजार रुपये द्यायला तयार आहेत. शिवाय त्याना मुलगी कशीहि चालते. हुडा तर राहोच—पण ते स्वतः दोन्हीकडला खर्च करायला तयार आहेत. पण त्याच जमवून देण मला अद्याप जमल नाही   लगडया—पागळया मुलीसुद्धा अविवाहित राहण पत्करतात—पण त्याना असे नवरे नको असतात

"इकडे शिकलेल्या माणसाच बघा साधा मॅट्रिक मुलगा मिळवून द्यायला मुलीचे बाप माझ्याकडें चकरा मारतात. पैसा देऊ करतात. अलीकडे मॅट्रिक मुलाचा भाव दोन—दोन हजारावर गेला आहे. शिवाय दोन्हीकडला खर्चे वधूपक्षान करायचा असतो—"

तो थाबला. सागाव की न सागावचा निर्णय होण्यापूर्वीच म्हणाला,

"लाबच कशाला, तुम्हाला म्हणून सागतो! माझ उत्पन्न वर्षाकाठीं चार ते पाच हजारापर्यंत सहज जात. शिवाय लगडा नाहीं, पागळा नाहीं. घराण्यात कुठ बट्टा नाहीं. साऱ्या हयातींत चार लोकासमोर कुणब्याच्या हातच पाणी प्यायलो नाहीं. पण झाल माझ लग्न? आजवर मीं लोकाची एकशे बत्तीस लग्नं जमविली आहेत . पण मला मात्र अगदी सडाफटिंग राहण्याची पाळी येत आहे.

" अलीकडे लोकाकडून तुम्हाला कळत असेल की मीं लग्न न करण्याचं ठरवल आहे . यातल खर अस की धद्यातली पत टिकवायला म्हणून मीं हा आव आणला आहे. करता काय, लोक तर ठरले. बायको नाहीं तर नाहीच– पण पैसा सुद्धा मिळू द्यायचे नाहीत. म्हणून मी आपल हे सताच सोंग आणल आहे .

" सागायच तात्पर्य काय, वाटेल तें झाल असत तरी तुम्हीं शाळेच्या आड येईल, अशा कोणत्याहि बाबतींत डोक खुपसायला नको होत–"

आतावर गजू गप्प होता तो केशवच्या बोलण्याचा सदर्भ न लागून. आता मात्र म्हणाला,

" अहो, पण मी शाळा सोडतोय् अस सागिलतच कुणी तुम्हाला ? "

" चिडू नका असे गजाभाऊ. काही गोष्टी न सागताहि कळण्यासारख्या असतात–

" मनुष्य एकदा एखाद काम शिकून तयार झाला की, त्याला थोडाफार पैसा मिळायला लागतों पैसा हातीं आल्यावर तो आपल्या मुख्य मार्गापासून वेगळा फेकला जातो. शिवाय तुम्ही शिकता त्या व्यवसायातली माणस मी चागल्या तऱ्हेन जाणतों. पान–तबाखूपासून बाई–बाटलीपर्यंतचीं सारी व्यसन अशा माणसाना असतात. नाहीं म्हटल तरी माणसाला सगतीची बाधा झाल्या-वाचून राहात नाहीं—"

हें गजूला फार जवळ येऊन भिडल. यापूर्वीच केशवच बहुतेक सार बोलण तो त्याला बावळट ठरवून नुसता ऐकत होता. पण ह्या बावळटाला आपण काम करतों त्या माणसाच्या स्वभाव–व्यसनाची ततोतत माहिति असल्याच पाहून, तो बावळट नाहीं हे गजून निश्चित करून टाकल. याचीच दुसरी बाजू म्हणजे आपण वावरू नये त्या माणसात वावरत असल्याची त्याला एकाएकीं जाणीव झाली. त्यामुळ तो कोरड्या विहिरींत पडलेल्या माणसासारखा आवाज काढून म्हणाला,

" माझी इच्छा नाहीं हो नानासाहेब हें काम शिकायची, अशा माणसात राहायची. पण आप्पाची प्रकृति पाहून मला त्याना नाहीं म्हणवल नाहीं पण अजून मी—"

" का ऽ ऽ हीं सागू नका. तुमचा हाच भिडस्तपणा तुम्हाला आज ना उद्या

भोवल्यावाचून राहणार नाही, एवढ मात्र मी सागू शकतों–"

" नाहीं–नाही, नानासाहेब मुळींच नाहीं."

का कुणास माहीत, गजूचा सूर पुढ अखडत गेला,

" शक्यतोंपर्यंत मी शाळा सोडणार नाहीं—"

" हेच. हेच. हेच. जिथ पर, परतु, शक्य, अशक्य, असे शब्द येतात तिथ कुठ तरी पाणी मुरत असत "

या बोलण्यात आपल्या शिक्षणाबद्दलच्या साऱ्या उमेदी गुडाळून ठेवल्या जात आहेत अस गजूला वाटल. ते सहन न होऊन तो चिडला,

" म्हणजे, यावर मीं काय करायला हव होत अस तुमच म्हणण आहे ? "

" तुम्हीं काय करायला हव होतं ते मी सागू शकत नाही. ते सागण बर पण नाही, माझ्यासारख्या त्रयस्थाला—"

केशवन आजूबाजूचा आहाट घेतला. तो घेता घेता गजूलाहि अदाजल. मग म्हणाला,

" पण तुमच्या जागीं मी असतों तर काय केल असत ते मात्र, तुम्हालाच म्हणून सागतों

" तीस रुपयाची नोकरी मिळाली होती. आपल्या परिस्थितींतल्या विद्यार्थ्याला एवढी रक्कम महिनाभर सहज पुरली असती. उन्हाळ्याच्या सुटींत एखाद्या बुक-डेपोंत काम करून बारा महिन्याच्या कपड्यालत्त्याची सोय झाली असती. म्हणजे वडिलाच्या दिडकीवाचून मी स्वतःच शिक्षण पूर्ण करू शकलों असतो–पण अशा व्यवसायात—"

" पण मी जर अस वागलों, तर माझ्या भावडाच, अप्पाच कस होईल ? "

" याची सुद्धा काळजी तुम्हीं करावी काय ? "

केशव निबरपणान म्हणाला.

" इथच तुम्ही बुडताहात गजूभाऊ, इथच तुम्ही बुडताहात !

" अहो, ह्या ज्याच्या–त्याच्या दैवाच्या गोष्टी असतात "

" अस म्हणून कसं चालेल नानासाहेब. भावड लहान आहेत. आप्पाना दिसेनास झाल आहे. त्याची नोकरी कधीं सुटेल तें सागता येत नाहीं. शिवाय मी घरात सर्वांत मोठा पडतों मीं जर त्याच्याकडे अशा नजरेन पाहिल तर... "

ही मात्र केशवला चपराक ठरली. सारं शहाणपण वाया गेल्यासारखं वाटलं. शिवाय त्याच्यातला गजूसंबंधीचा नाजुक स्वार्थ पण दुखावला. या साऱ्या घावानी बेकाबू होऊन तो म्हणाला,

" असंच आहे, तर करीत बसा मग जन्मभर कंपोझिंग की, काय म्हणतात तें "

" नाही हो नानासाहेब, हें तर अशक्यच आहे "

गजू पण म्हटलं तर चिडीन अन् म्हटलं तर तळातून म्हणाला,

" तशीच वेळा आली तर मी तुम्ही म्हणता त्याप्रमाणं क्लबातली नोकरी पकडीन. वेळ पडल्यास घराला रामराम ठोकीन–पण शाळा सोडणार नाहीं काय वाटेल ते झालं तरी शाळा सोडणार नाही "

गजू हेंच हें बोलू लागला तेव्हा केशव म्हणाला,

" बघूया काय होतं ते—"

यावर गजू किती संतापला ते त्यालाच माहीत.



## दोन

शाम प्रिंटिंग ब्यूरोच्या नियमान पाहता आप्पाना त्याच्या क्रमाप्रमाण प्रसच्या तीनहि पाळ्याना अधून मधून हजर राहण आवश्यक होत. पण बाबासाहेबाच्या पहिल्याच दर्शनान हबकलेल्या आप्पानी विनती – अर्ज लिहून आपल्याला रात्रीच्या पाळींला काम जमणार नसल्याच कळविल होत नेहमींकरता दिवसाची पाळी मागितली होती अनुभवी प्रूफ रीडरची चणचण, योग्य कारण दाखविल्याखेरीज काम करून कुणालाहि दूर करता येत नसल्याचा सरकारी कायदा, सबल – लेखी कारण जमविण्यासाठी प्रेसला लागत असलेला अवधि आणि तीं आपल्याकडून मिळू न देण्याचा आप्पानी चालविलेला आटापिटा या सर्व कारणपरपरेन आप्पाना आतावर इथ टिकवून धरल होत. शाम प्रिंटिंग ब्यूरो मध्यें केवळ दिवसपाळी करणारे ते एकटेच होते

पण आज दुपारपासून त्याच्याभोंवतींच वातावरण बदलल होत. कधी नव्हे त्या मशीनमनन त्याना कॅंटीनमध्यें नेऊन चहा पाजला होता. प्रूफ-रीडर पाध्ये दोन तीनदा त्याच्या टेबलाशीं येऊन गेला होता. कपोझिंग विभागाचा फोरमन

त्याच्या वयाचा असावा. कदाचित् त्याच्याच परिस्थितींतही तो असावा. त्यामुळ आज दुपारपासून तो या ना त्या कारणान सतत आप्पाच्या टेबलाशी ये-जा करीत राहिला होता. याखेरीजहि बरीचशीं माणस त्याच्या टेबलाशीं रेंगाळून गेली होती. अजूनहि जात होतीं. यातली काहीं आप्पाची निर्भेळ थट्टा–मस्करी करणारी होती तर काही त्यान्यावर जळणारी, त्याच्या जागेवर टपलेली होती. पण ही सारीची सारीच आज कुणीतरी जिवलग माणूस मेल्यावर दुःखात फसलेल्या माणसाशी बोलावींत तशीं आप्पाशी बोलत होतीं. त्याच्या मुलाच्या शिक्षणाची, जवळपासच्या नातेवाईकाची चौकशी करीत होतीं आप्पाच्या नातलगाचा अभाव त्याना हळहळवून गेला होता. थोरल्या मुलाच वय आणि शिक्षण त्याना चुकचुकवून गेल होत.

पण बहुतेकाच्या बोलण्याचा प्रमुख विषय आप्पाचे डोळे हाच होता. आप्पानी ते का बिघडवून घेतले, त्याच्या वयाचीं इतर-त्याचच काम करणारीं माणस आपलीहि बाजू कशी शाबूत राखू शकलीत, डोळ्याकडे आप्पानी इतक दुर्लक्ष का केल, त्यानी या बाबतींत अडतूस – फडतूस माणसाच्या माग न लागता डॉ. चोप्रासारख्याच औषध घेऊन डोळ्याची आधींच काळजी घ्यायला हवीहोती – वगैरेसारख त्याच बोलण होत.

सहानुभूतीच्या ह्या लोटाच कारण आप्पाना ऑफिस सुटण्याच्या सुमारास कळल. तोवर आप्पाना सार माहीत असेल अशी समजूत असलेला पाध्ये त्याच्या टेबलाशी आला. टेबलवर टेकवलेल्या हाताच्या तळव्यात गाल जमवत विचारू लागला, " मग, काय ठरवल आहे आप्पासाहेब तुम्हीं ? "

" कशाबद्दल ? "

" अहो, तुमच्या डोळ्याबद्दल आणखी कशाबद्दल असणार . "

" पण आजच माझ्या डोळ्याची तुम्हा सर्वांना इतकी काळजी का वाटावी, काहीं कळत नाहीं मला ? "

पाध्येला वाटल, दुःख गिळण्यासाठीं म्हातारा अभावितपणाच प्रदर्शन चालवत असावा. तो म्हणाला,

" नाहीं, आता तुम्ही कुणाची ट्रीटमेंट सुरू करणार तें विचारतोय — "

" म्हणजे काय ? अहो, होती तीच आणखी कोणती ? "

" अजूनहि ? "

आता मात्र आप्पाना संशय भिनूं लागला,

" तुमच्या म्हणण्याचा अर्थ मी नाहीं समजलों ."

" तस काहीं नाहीं — "

खरी तळमळ व्यक्त करताना – आप्पाच्या चेहऱ्याकडे पाहून असेल – पाध्ये डळमळत म्हणाला,

" गोष्ट एवढ्या थरावर गेली असताना माणसान पैशासाठीं मागपुढ बघायला नको नोकरी चालली तर पैसा मिळवता येईल — इथ नाहीं, आणखी कुठहि पण त्यासाठीं डोळे तर चागले असायला — "

आता आप्पाचा चेहरा एकदम उतरला. नकळत ते प्रेसमधील आणखी काहीं लोकाच्या बोलण्याचा विचार करू लागले. दुवे जुळवू लागले. पण काहींएक न सुचून भाबावत सुटले,

" तुम्हाला काय म्हणायच ते अज्जून नाहीं आल माझ्या लक्षात. कृपा करून काय ते फार वेळ न घेता स्पष्ट सागा — "

पाध्ये बोललाच नाहीं. आप्पाच्या बोलण्यात कितपत प्रामाणिकपणा आहे, हें तो त्याच्या चेहऱ्यावरून अदमासू लागला. जराशात त्याच्या लक्षात आल. त्या म्हाताऱ्याचा चेहरा सुराप्रमाणच भाबडा होता. पाध्येच आता बोलायला धाडस होत नव्हत. आप्पाना कटु वार्ता आपल्यालाच सागावी लागणार या विचारात तो पुटपुटला, " मला वाटत, तुम्हाला माहीत नसाव — "

" खरच मला काही एक माहीत नाहीं. काय झालय् तरी काय ? "

" तुमच्या नावें नोटीस-बोर्डावर वॉर्निंग - नोटीस लागली आहे.. "

" वॉर्निंग – कसली ? "

आप्पा झटक्यान टेबलशी उभे होत म्हणाले. खर तर त्याना किंचित्सं समाधान झाल होत. कारण त्याच्या मनान, पाध्येचा संशय यायला लागल्यापासून त्याना कामावरून दूर केल्याची नोटीस घेण्याची तयारी करीत आणली होती. खुर्ची – टेबलाच्या फटींतून बाहेर पडताना ते म्हणत होते,

" कोणत्या बोर्डावर – दारातल्या ? "

" हो. टाईम-कीपरच्या रूमजवळ "

हे ऐकायला आप्पा तिथ नव्हते. भराभर चालत ते प्रवेश-दाराशी आले. हे त्या इमारतींत शिरावयाच मुख्य दार होत. निदान कामगारासाठीं तरी

बाहेरून येताना त्या दारात एक लांबोळका चौकोन होता. त्याच्या उजव्या बगलेत टाईम – कीपरची खोली होती. खोलीच्या समोर जें दार होत ते आप्पांच्या खात्यात जात असे. या दोन्ही दाराच्या जेमतेम वाटा सोडून ठेवलेल्या स्टुलावर गुरखा बसलेला असे. मध्यें काहीं मोकळी जागा सोडल्यावर त्या जागेच्या निम्या भागात जिना होता. उरलेलीत आत जायला बोळ होती.

टाईम-कीपरच्या खोलीवर नोटीसबोर्ड होता. कामगाराना द्यावयाच्या सर्व सूचनाचे कागद याच बोर्डावर चिकटवल्या जात असत. अशा कागदावर कामगाराचे मासिक हिशोब, पगाराची तारीख, वेळ अथवा सणानिमित्तान मिळणारा ॲडव्हान्स, कुणाच्या टेबलावर, कधी नि कुणाला किती मिळेल ते लिहिल जात असे. अधून – मधून कुणाला वॉर्निंग किवा कुणाला कामावरून कमी होण्याच्या नोटीसाहि याच काळ्या बोर्डावर चिटकवल्या जात असत.

याच बोर्डावर एक कोरा करकरीत कागद आप्पाना दिसला. त्याची डोक्याकडली बाजू बोर्डाला चिटकवली होती चिटकलेली बाजू तीन–रगी छपायची होती. ‘ शाम प्रिंटिग ब्यूरोचा ’ नवा, कलात्मक ब्लॉक तीवर छापला होता. खाली खालील मजकूर टाईप केला होता,

“ ब्यूरोमधील एक कर्मचारी श्री. आत्माराम देशकर याना या नोटिसीने कळविण्यात येते की, त्याचे मुद्रण–शोधनाचे काम ब्यूरोला समाधानकारक वाटत नाही. या बाबतींत त्याना ब्यूरोच्या जबाबदार व्यक्तीकडून बारवार तोडीं सूचना मिळाल्या असून त्याचा त्याच्या कामावर काहींएक परिणाम आढळून आल्याचें ब्यूरोच्या निदर्शनास आले नाहीं. या कारणाने ह्या वॉर्निंग–नोटीसद्वारे त्याना आपले काम सुधारण्याची सधि म्हणून एक महिन्याची ब्यूरो मुदत देत आहे. या काळात त्यानीं आपल्या डोळ्यावर आवश्यक तो उपचार करावा त्यासाठी आवश्यक त्या रजेसाठीं त्यानी ब्यूरोकडे अर्ज करावा. ब्यूरो त्याचा सहानुभूतिपूर्वक विचार करील आणि आवश्यकता पटल्यास काहीं रजा पगारीहि देऊ शकेल.

“ याच नोटीसद्वारे त्याना असेहि सुचवण्यात येते की त्यानीं ठराविक मुदतींत (किवा ही मुदत त्याना आपल्या उपचारासाठी अपुरी वाटल्यास त्याना किती मुदत हवी आहे यासबधी ब्यूरोला डॉक्टराच्या दाखल्यासह

लेखी कळवावे ) आपल्या कामात ब्यूरोचे समाधान होईल अशा सुधारणा घडवून न आणल्यास ब्यूरोला त्याच्यावर दुसरी कारवाई करावी लागेल. तिची जबाबदारी सर्वस्वी श्री. देशकर याचेवर राहील..."

पाध्येच्या बोलण्याच्या आरभी आप्पामध्ये नोटीसच जे भय घुसू लागल होत नि ते हादरले होते, ते पाध्येन वॉर्निंग-नोटीसच नाव घेताच आप्पामधून कमी झाल होत. पण प्रत्यक्ष नोटीस वाचल्यावर मात्र आप्पा पहिल्याच भयान भरून निघाले. पहिल्या दोनदा त्यानीं नोटीस वाचली नि नतर ते एकटक तिच्याकडे पाहात राहिले. हे लक्षात आल्यावर त्याना पाध्येन भानावर आणल, "तुम्हाला याची कल्पनाच नव्हती म्हणायची "

"अ .नाही नाहीं !"

"ही तर दुपारपासून लागली आहे बोर्डावर . "

"असेल--"

म्हणत टेबल आवरण्याच्या हेतून माग फिरलेले आप्पा पुन्हां म्हणाले,

"मला याची अजिबात कल्पना नव्हती--"

आणि ते टेबल आवरू लागले. तोच त्याच्या शोधात असलेल्या नागोन त्याना हसत म्हटल,

"मी तुमाले तिकडेच पाहून रायलों होतो--"

"आणखी ते कशाला रे ?"

तस नागोन आपल्या पिशवीतून टपाल-बुक बाहेर काढल. त्यात काहीं पाकिट होती. पैकी एकावर आप्पाच नाव लिहिल होत. ते आप्पाच्या स्वाधीन केल्यावर नागोन त्याची सही आणि तारीख लिहवून घेतली,

पाकीट फोडताना आप्पाना त्यात त्याना नोकरीवरून कमी केल्याची नोटीसच असावी अस वाटल तर हेहि की, बोर्डावर लागलेल्या नोटीसची मुदत सपली असावी. ते त्या नोटीसची तारीख आठवू लागले. आठवेना तेव्हा प्रत्यक्ष बोर्डावर जाऊन पाहण्याचा विचार त्याच्यात जागा झाला. मग लक्षात आल की नोटीसबोर्डापेक्षा हातातल पाकीट अधिक जवळ आहे. त्याच्या या गोंधळाला मुख्य कारण म्हणजे हा आधुनिक कारभार ते पहिल्यादाच बघत होते.

पाकीट फोडल्यावर त्याच्या लक्षात आल कीं क्षणापूर्वी बोर्डावर वाचलेल्या नोटीसचीच ही True copy आहे. तिन त्याना तात्पुरत समाधान दिल.

# तीन

नोटीस खिशात घालून आप्पा ऑफिसबाहेर पडले, तेव्हा त्याच्या डोक्यात दोन मार्ग होते. पैकी कशा एकावर डोकं स्थिरावण्यापूर्वी त्याची पावलं सुहास छापखान्याच्या दिशेनं पडूं लागली.

आप्पा देशकर छापखान्याशीं पोंचले त्यावेळी बाबूराव गुप्ते टेबलाशी नेहमीप्रमाणं बसून होते. पुढ्यात एक खेडवळशा चेहऱ्याचा गिऱ्हाईक बसला होता. गुप्त्यात आणि त्याच्यात जोरजोरानं वाद चालला होता. विषय ठरल्या-प्रमाणं बाबूरावानी त्याचं काम वेळेवर न दिल्यामुळं गिऱ्हाइकाची मोटार चुकली होती. वाया गेलेलं मोटारभाडं बाबूरावानी भरून द्यावं, असं त्याचं म्हणणं होतं. नाहींतर ज्या संस्थेचं काम त्यानं बाबूरावाकडे छापयाला टाकलं होतं, त्या संस्थेला स्वतःच्या खिशातून त्याला पैसे भरून द्यावे लागणार होते. बाबूरावाचं म्हणणं असं की, गिऱ्हाईकानं त्याना न कळवता मोटारचं तिकीट का काढून ठेवावं ?

तासभर आकांत-तांडव करूनहि जेव्हा तो गृहस्थ ऐकेना तेव्हा बाबूरावानीं

त्याच अर्ध नुकसान सोसण्याच्या तयारीन वाटाघाटी सुरू केल्या. त्याहि अर्धा तास चालवल्यावर बाबूराव ऐकायला तयार होईनात तेव्हा त्या गिऱ्हाईकाला उरलेल नुकसान सोसण्याची तयारी करावी लागली. पण तो तिथन हलला तेव्हा भिक्षा न मिळालेल्या भिकाऱ्यासारखा चळफळत – कुरबुरतच. त्यातल जितक बाबूरावाना ऐकायला आल तितक्याना त्यानीहि उत्तर दिलीच. शेवटी शेवटीं तर ते खुर्चीतून पायऱ्यापर्यंत गेले. गिऱ्हाईकाच्या दिशेन मोठमोठ्यान बोलू लागले. माग बघत, मोठमोठ्यान बोलत गिऱ्हाईक नजरेआड झाल्यावर बाबूराव त्याच्या शिव्या आप्पाना मोजू लागले. ऐकून घेतल्याखेरीज बाबूरावाचा हवा तो उपयोग आपल्याला होणार नाही या विचारान आप्पा त्या शातपणे ऐकू लागले.

सर्वात शेवटीं बाबूरावाना आप्पाच्या आगमनाची जाणीव झाली. पूर्वी कार्हीं एक घडल नाही असा निर्विकार चेहरा करून ते म्हणाले,

"ह, आपण कस काय येण केल आप्पासाहेब, बोला ?"

तेच म्हणाले,

"जारे गोकूल, साहेबासाठीं पान आण बर दोन .ह, बोला आप्पासाहेब.."

"आलो होतो असाच—"

बोलाव की न बोलवशा विचारात आप्पासाहेब म्हणाले,

"आमच्या गजचा प्रोग्रेस कसा काय आहे ते बघायला—"

"प्रोग्रेस म्हणता - "

बाबूराव म्हणाले,

"तसा तुमचा गजू हुशार आहे बर काय आप्पासाहेब — निर्विवाद तो हुशार आहे. पण त्याच कामात लक्षच दिसत नाही "

"का, अधून – मधून चाटा वगैरे मारतो की काय ?"

"नाही – नाहीं. चाटा वगैरे मारीत नाही. पण कामावर यायला उशीर करतो थोडासा "

"घरून तर वेळेवर निघत असतो—"

"पण इथ मात्र उशिरा येतो—"

"तरी किती वाजता ?"

" कधी सव्वासात तर कधी साडेसात करीत असतो--"

आप्पा शांतच झाले.

जराशांत आपल्या हेतूचा अंदाज घेऊन तर बाबूराव असं बोलत नाही ना? अशी त्याना शंका व सोबतच चीडहि आली,

" याला कुठं उशीर म्हणायचा हो बाबूराव? आजकाल दिवसच मुळी उशीरां उगवतो तरी बिचारा गजू भल्या पहाटे उठतो तुम्हाला तर माहीत आहेच. त्याला घरीं पण कामं करावी लागतात . हे सारं आटोपून साडेसहा-पावणे सात होतात त्याला घर सोडायला इथं पोचायला अर्धा तास हा हवाच "

" मग काहीं हरकत नाहीं—"

थांबून बाबूराव म्हणाले,

" तरीपण त्यानं यापूर्वी यायला हवं असं मला वाटतं. कारण माणसं सात-लाच कामावर येतात. त्यापूर्वी कमींत कमी अर्धा तरी तास तो आधीं यायला हवा. म्हणजे झाडलोट करताना माणसाचा उगाच वेळ जायला नको तुम्हाला नाहीं वाटत ? "

" केवळ माणसाचा वेळ जातो म्हणून नाहीं म्हणत मी हे. त्याचाहि वेळ वाया जातो म्हणून म्हणतो कारण त्याला परत अकराच्या आत इथून निघायचं असतं. आता अशा मधल्या वेळात तो शिकून—शिकून काम शिक-णार तरी किती ? "

आता बाबूरावाचा खरा हेतू आप्पाना पुसटसा जाणवला नि त्याचाहि इथं येण्याचा खरा हेतू स्पष्ट होऊ लागला,

" आलं लक्षांत. पण या सर्व अडथळ्यातूनहि त्याचा प्रोग्रेस हा काहीं असेलच ना ? "

" वाः वा ! का नाहीं ! "

ते म्हणाले,

" तुम्हाला म्हणून सांगतो आप्पासाहेब, त्यानं मनावर घेतलं असतं तर तो आतावर पेजिंग – करेक्शन सुद्धा करू शकला असता. पण मला वाटते, ही बाब त्यानं घ्यावी तितकी मनावर घेतलेली दिसत नाहीं—"

" अस्सं —"

या गृहस्थाच्या डोक्यात कस शिराव या विचारात पडत आप्पा म्हणाले,

" पण हल्ली मजल कुठवर आली आहे त्याची ती तर सागाल ? "

" वा ! वा ! का नाहीं--"

शब्दात एकट अडकू किवा फसू नये या विचारान तो धूर्त प्राणी बाजूच्या केसकडे बघत म्हणाला,

" मला वाटते, त्याच्या आता मोनो आणि डीग्री ह्या दोन्ही टाईप्सूच्या केसेस पाठ झालेल्या असाव्यात नाहीं रे लक्ष्मण ? "

पण लक्ष्मणन आरामशीरपणे तळव्यावर तळवा मारला. तबाखूची चिमूट ओठात कोंबली. मग वाऱ्यावर तळवे झटकत म्हणाला,

" हो. मलेई तसच वाटते—"

" अस्स ! "

आप्पा सशयान म्हणाले,

" मला तर तो सागत होता की आता त्याला मोनोचा कपोज चागला जमतो म्हणून ? "

" अहो, जमतो म्हणजे काय आप्पासाहेब "

खजिलपणा सावरत बाबूराव म्हणाले,

" त्याला काम याव म्हणून आम्हीं बळजबरीन करायला लावतो--तोहि तो तुमचा मुलगा म्हणून का रे, लक्ष्मण ? "

" हो. "

" गजू तर म्हणत होता कीं आता तो बावीस एम्सच्या चाळीस ओळी एका तासात करू शकतो म्हणून—"

यावर बाबूरावानी सार लक्ष्मणवर लोटण्याचा प्रयत्न केला,

" हो रे, लक्ष्मण ? "

" आपल्याले काहीं माहीत नाहीं बा. करतहि असन—"

यावर उघडे पडू लागलेले बाबूराव म्हणाले,

" अहो, पण त्या कपोजमध्यें करेक्शन्स किती असतात याची कल्पना आहे काय तुम्हाला ? उद्या तुम्ही या म्हणजे मी दाखवतों तुम्हाला त्यान कपोज केलेल्या गॅलीच प्रुफ. त्यातल्या चुका दुरुस्त करायला लागतो, तितक्या वेळात दुसरी गॅली कपोज होते .नाहीं रे लक्ष्मण ? "

लक्ष्मण आणखी काही घोटाळा करून बसण्याच्या धाकान त्यानीच घाई केली,

" तरी काही हरकत नाही. तो आपलाच मनुष्य आहे येईल आटोक्यात शिवाय आपण त्याला निभावून घ्यायला तर आहोत काय, कस म्हणतो ? "

आता आप्पा सरळ सरळ म्हणाले,

" खर तर मी त्याच्या कामाचा अदाज घेण्यासाठी मुद्दाम आलो आहे--"

" काही हरकत नाही आलात तर—"

आप्पाचाच अदाज लागून ते म्हणाले,

" तुम्ही इथं येण्यापूर्वी मला तसा निरोप देऊन ठेवला असता तर मी त्याचा नक्की अदाजहि घेऊन ठेवला असता

" आताहि काहीं बिघडल नाही. तुम्ही परत कधी येणार ते सागून ठेवा. तोंवर मीं—"

" तो तर तुम्ही घेऊन ठेवालच—"

आप्पा म्हणत होते,

" पण मी म्हणत होतो–तुम्ही त्याला काहीं देऊ शकाल काय—"

" म्हणजे ? "

" म्हणजे काहीं वेतन.. वाटल्यास मदत या नात्यान, म्हणतो--"

" अहो, पण त्यान मिनिमम वेजेस ॲक्टच्या नियमाप्रमाण मिनिमम तरी काम करायला नको काय ? "

" मी कुठ म्हणतों–तो ॲक्टमध्यें बसत असेल म्हणून ? तुम्ही त्याला पगार द्यावा, असहि मी म्हणत नाहीं त्याच्याच्यान जितक काम होईल– तितक्याच त्याला पेमेन्ट करीत जा एवढच माझ म्हणण "

नियम आणि हक्काप्रमाण मागण आप्पाना कठोरतेच वाटत असाव म्हणून ते आता सूराविर्भाव पाल्टून बोलू लागले,

" त्याची मिळविण्याची योग्यता आहे म्हणून मी मागतों अस नाही. मला सध्या पैशाची अत्यत निकड आहे–म्हणून मीं मुद्दाम तुम्हाला भेटायला आलों. . तुम्हाला खोट वाटेल--"

बोलता–बोलता त्यानी खिशातून नोटीस काढली. आपल्या प्रामाणिकपणा-बद्दल आपल्यालाच खात्री नसल्यासारखे बाबूरावाना नोटीस दाखवीत म्हणाले,

" म्हणून म्हणतों, गजूला काहीं पैसे मिळू शकले तर माझ्या औषधोपचाराला उपयोगी पडतील. दुसर काहीं नाही—

" माझ्यावर अशी पाळी आली नसती तर गजू काय करतो व करू शकतों ते विचारायला सुद्धा मी आपल्याकडे आलों नसतो "

बाबूराव विचारात पडले. कामात येऊ लागलेल्या गजूला आणखी काहीं दिवस फुकट धोपाटता येण शक्य आहे काय–ते पाहण्यासाठीं म्हणाले,

" अलीकडील प्रेस कामगार युनियनच्या नियमाप्रमाण कॉन्ट्रॅक्ट सिस्टीम बंद झाली आहे आप्पासाहेब—"

या माणसाच्या नियमपालनाबद्दलची ख्याति आप्पाना माहीत होती तथापि गजू कॉन्ट्रॅक्ट पद्धतीन काम करण्याच्या योग्यतेचा झाला आहे, त्याची नकळत बाबूरावाकडून कबुली मिळाल्यान ते त्याना त्याच्या ख्यातीवर उलटून बोल् धजले नाही. धजले ते अशा शब्दात,

" ह्या घरगुती गोष्टी आहेत बाबूराव! नियमापर्यंत ह्या गोष्टी जातील तेव्हा ना त्याची भीति?"

आता हक्काचा पैसा बुडविण्याच्या इराद्यान बाबूराव बोलले,

" त्यापेक्षा तुम्ही अस का करीत नाही?"

" कस, बोला ना?"

" की तुम्ही आपल्या डोळ्याची ट्रीटमेन्ट सुरू करा आणि लागतील ते पैसे माझ्याकडून आठवड्याच्या आठवड्याला नेत चला—"

आठवडाभर मरमर काम करणाऱ्या कामगाराला पैशासाठीं झिक्झिक् करायला लावणारा हा माणूस आप्पाना अपरिचित नव्हता. त्यामुळ ते लगेच म्हणाले,

" नको—"

" का?"

" तुमचा पैसा फेडण्याची मला शाश्वति नाहीं—"

" मग गजू फेडेल—तो मिळवता झाल्यावर. मग काहीं हरकत?"

" तरी नको—"

आप्पाचा सूर भलतीकडे वळू लागला,

" आता मला स्वतःचा काहीं भरवसा वाटत नाहीं. तेव्हा मरताना पोरावर

काहीं कर्ज तरी राहू नये, असं माझं मत आहे. म्हणून मी म्हणतो त्याप्रमाणं —अर्थात् गजूची काहीं योग्यता असल्यास त्याला काही देत चला ”

हा आप्पाचा हट्ट समजून बाबूरावानी फेरविचार सुरू केला. वार्षिक परीक्षा जवळ आल्या होत्या. खेड्यापाड्यातल्या शाळातील प्रश्नपत्रिकाची छपाई त्याच्याकडे येत असे. त्यामुळ सीझनच्या तोंडावर माणूस गमावणं त्याना शक्य नव्हतं. सारसार विचार होताच ते म्हणाले,

“ बरं, उद्या–परवा मी गजूची ट्रायल घेतो, अन् त्याला काय देणं शक्य आहे, ते तुम्हाला कळवतो ..आता तर झालं ना ? ”

“ नक्की ? ”

“ अगदी नक्की ”

“ असं झालं तर फार बरं होईल—”

आप्पा म्हणाले,

“ आपले उपकार मी जन्मभर विसरणार नाहीं—बरं, आणखी काय नवलविशेष ? ”

## चार

एरव्ही कामगार कामावर येण्याच्या अर्धा तास आधीपासून तो ते काम संपवून बाहेर पडल्यानंतर अर्धा तासपर्यंत खुर्चीत खिळून बसणारे बाबूराव गुप्ते शनिवारी दुपारपासूनच पैसे वसुलीच्या निमित्तान बाहेर पडत असत. दुपारी बारा–साडे–बाराला बाहेर पडलेले बाबूराव रात्री नवा–साडे–नवापर्यंत कधीहि प्रेसमध्ये येऊ शकत नसत. मग पैशाचा बटवडा सुरू करीत असत. तोहि त्याच्या खिशातल्या रकमेवर अवलंबून असे. यामुळ वीस ते तीस रुपये हप्ता पाडणाऱ्या कामगाराला सुद्धा कधी कधी चार–पाच रुपयावर बोळवल जात असे सर्व दिवस भटकल्यानंतर जेव्हा कामगाराना तोंड दाखविण्याइतकी वसुली होत नसे तेव्हा बाबूराव प्रेसकडे फिरकतच नसत. साडेनवाच्या सुमारास सुहास तिथ येऊन प्रेस बंद करवून घेत असे. किल्ल्या खिशात घालून सायकल-वर टांग मारीत असे.

यामुळ बाहेर पडलेले कामगार चिडत असत. कुणी गरजेमुळ, कुणी स्वभावतः, तर कुणी वयतः बाबूरावाना सार्वजनिकपणें शिव्या देत असत;

त्याच्या आई-बहिणींचा उद्धार करीत असत. त्याना ' मादरचोत ' तर कुणीहि आणि कधींहि म्हणत असे. म्हणत बोलत आपापल्या वाटा चालू लागत असत. पण सुहास किल्लयाना येईपर्यंत मात्र ते जागचे हलत नसत.

आता देखील ते तसेच बाबूरावाची वाट बघत बसले होते. रोजदार आणि पगारी माणसापैकी जीं माणस होती—तीं, कुणी रस्त्याकडे तर कुणी बाबूरावाच्या खुर्चीकडे तोंड करून आपापल्या स्टुलावर नुसती बसलेली होती. पाय पोटाशी घेऊन. रॅक्सच्या कठड्याना पाठा भिडवून. तशींच तीं जोडया करून बसली होतीं. बोलत होतीं. त्यातली एक जोडी ' उस्तादोके उस्ताद ' मधल्या हेलन व शकीलाबद्दल बोलत होती. तिची चर्चा, तिन कुठून तरी मिळविलेल्या ह्या नटाच्या खाजगी जीवनाबद्दल सुरू होती. दुसरी एक जोडी काल लावलेल्या आकडयाबद्दल हळहळत होती. उद्या येऊ घातलेल्याबद्दल उमेद बाधत होती. तिसरी साथीत नुकत्याच आलेल्या ' पर्मीला 'च्या भावाबद्दल आपसात घासाघीस करीत होती. कोपऱ्यातली, बाईंडर आणि ट्रेडलमनची जोडी दारु-गाज्यासारख्या व्यसनाच महत्त्व रवथ करीत होती.

काहीजण काम देखील करीत होते. अर्थात् त्यात बहुतेक कॉन्ट्रॅक्ट-पद्धतीन काम करणारे होते. त्यातच गजूपण होता. गजू आपल्या कामात मग्न होता. पण त्याच्या दोन्ही बाजूना मारुती आणि गोकूलचा वेढा होता आता गोकूळ कितव्यादा तरी गजूला विचारीत होता, " काय भटजी, सागन लौकर ? "

गजू त्रासून म्हणाला, " काय बोल म्हणतो रे ! "

" अरे, काय बोल् म्हनून काय विचारत ? "

आता मारुती गोकूलला साथ करू लागला,

" पार्टी कई देसीन; थे साग सरक-सरक ! "

" अरे, पण मीं तुम्हाला सागितल ना—"

कॉपीतला विसरलेला शब्द शोधत गजू म्हणाला,

" कीं मला तें शक्य नाहीं म्हणून—"

" ऐसाकैसा शक्य नाहा. वयूर मात्या, ए कभी हो सकता क्या ? "

गोकूलन मारुतीला डोळा घातला. तसा मारुती म्हणाला,

" हरगिज नही. नामुमकीन. चाहे कुछ भी हो जाय, आज तो भटजीसे पार्टी लेके ही रहेंगे ! "

अन् त्यान परत गोकूलला डोळा घातला. गोकूल बोलला,

' क्या बात कहीना मेरे जिगरदोस्त ! लाखोमे एक. अब चाहे कुछभी क्यो न हो—लेकीन भडजी को खाये बगैर नहीं रहेंगे—"

" बोला भडजी, याच्यावर काय मनन आहे तुमच ? "

" नाही रे गोकूल, मला हे शक्य नाहीं."

" अस्स कस्स शक्य नाहीं—साग बर रे ? "

" माझ्याजवळ जास्तीचे पैसे नाहीं "

" अबे तो जादाके पैसे होते है किसके पास ? आज मिलेंगे उसमेसे खर्चा करना, क्यौ रे मारत्या ? "

" नाही बुवा. माझे वडील रागावतील "

" ॲ ह्यॅ ह्यॅ ! बोले वडील रागावतीन. वडील काय पहायला येतात का रे, की तू पगारी आहे तर म्हनतीन का इतके पैसे कमी का बा आनले मनून ? "

" तस नसल, तरी रोज किती काम झाल–ते मी त्याना सागत असतो—म्हणून मला किती पैसे मिळणार हे त्याना माहीत असत—"

" बायल्या आहे लेका—"

मारुती म्हणाला,

" अबे शायन्या, तुले कोन सागितल का बापाले इमानान काम सागत जाव मून ? रोजच्या कामातून दहापधा लाईनी कमी सागत जाव ! अस केलं तर पधासक किती रे ? हा, नव्वद ना ? समज, शभर. तरी अडीच तीन रुपयाच काम होते हप्तभऱ्यात तेवढ्यात तर मस्त पार्टी होते बे ! का रे, गोकूल ? "

यावेळी गजू स्टीकमधली ओळ घट्ट करायला कोणता स्पेस वापरावा याच्या विचारात होता तो गप्प राहिला. तेवढ्यात मारुतीचं म्हणण गोकूलन परत आपल्या शब्दात माडल गजूला बोलायला भाग पाडल तेव्हा तो म्हणाला,

" असा खोटेपणा आपल्याच्यान नाहीं करवत बुवा वडिलापाशीं ! "

" अरे, पन तू खोटेपणा केला, मून तुझ्या बापापासी कोन सागनार आहे ? "

" सागणार नाहीं म्हणा कुणी. पण त्याना आज ना उद्या समजल्यावाचून राहणार नाही बाबूरावाची आणि त्याची ओळख आहे—"

" सुनबे, सून मार्त्या ! म्हणे, आपल्या भडजीच्या बापाची आन् बाबूरावची

ओयख आहे ! तेव्हा हप्तयाच्या हप्त्या भडजीले किती पैसे मियते थे बाबूराव हप्त्ययाच्या हप्त्या त्याच्या बापाले जाऊन सागणार आहे---ऐकल ? ”

“ जाऊन सागायच नाहीं म्हणत मी--पण माणसाचा खोटेपणा कधी ना कधी उघडकीस हा येतोच. ”

“ ॲ ह्य ह्य ! कुठून आनलं बे हे गिन्यान ? पोथीपुरानातल आहे वाटते, का मास्तरीनन शिकवल बे तुले ? ”

‘ मास्तरीन ? ”

मारुती एकदम जागा होत विचारू लागला,

“ कोनती मास्तरीन रे गोकूल ? ”

“ ओ ऽऽ, ओ ऽ नही बे, सायकीलपे घुमती है ? ”

“ ते-त, डोमडी-”

“ हो. ”

“ माताचे वनवाली ? ”

“ हो. वही ”

“ लाल साडी नेसते थे ? ”

“ अबे, हा--वही ! ”

“ थे याले शिकवत असते काय रे ? ”

“ नही त कोन शिकवते बे ? ”

“ हो बे, भडजी ? ”

गजूला मान हलवावी लागली.

“ काय शिकवते रे थे पोट्टी तुले ? ”

“ अबे, पोट्टी काय की है ? शादी होती थी तो भडजीके उमरका लडका रहता था उसको ! सच है ना भडजी ? ”

यावर बोलण गजूच्या कुवतीबाहरच होत.

मारुती मात्र गोकूलला विचारीत होता,

‘ तो फिर इतने दिन काम कैसा बद रह सकता रे ? ”

“ अबे, काम बद नहीं रह सकता ! ”

गोकूल म्हणाला, “ काम चालू और रास्ता बद होगा ”

“ हा, अस मनसीन त काही तरीबा ! ”

बोलल्यावर कोणत्या तरी विचारान मारुतीचा चेहरा बदलला. गोकूलला डोळा घातल्यावर तो गजूला म्हणाला,

" हो रे भडजी, थे मास्तरीन खरोखर तुले शिकवत असते काय रे ? "

" मघाच सागितल ना रे ! "

" काय शिकवते रे ? "

" मॅथेमॅटिक्स "

" म्हणजे काय रे ? "

" अबे तो गनीत ना ! "

" फक्त ? "

" फिर क्या समझा तो तू ?"

" मले वाटल, पोर कसे होऊ देऊ नये–थेच शिकवते काय ? "

" कैसा बे अडानचोट रह गया मार्त्या, तू ? "

गोकूल म्हणाला, " ह्या गोष्टी शिकवत नसतात. त्याले प्रॉक्टिकल थिअरी मनत असते, आल ध्यानात ? "

" नाहीं बा ! "

अशात एकदम बाबूरावाची सायकल प्रेसपुढ थाबली. दचकल्यासारखी होऊन, सारींची सारीं रिकामटेकडी माणस आपापल्या कामाना गुतण्याची धडपड करू लागली ज्याना पैशाची खूप निकड होती तीं बाबूरावाचा चेहरा पारखू लागली.

कारण खिशात पैसे फारच कमी ( किंवा कधी कधी अजिबात नसत अन् कुण्यातरी कामाच्या निमित्तान त्याना प्रेसला तोड दाखविण आवश्यक असे. ) असत त्यावेळीं सरळ बाबूराव आपल्या खुर्चीकडे न जाता प्रेसच्या आतल्या भागाकडे येत असत. रिकाम्या माणसाकडे मुद्दाम कानाडोळा करीत असत. कामात दिसणाऱ्या पोरासोराच्या पाठावर हात मारून ख्याली-खुशालीची वास्तपूस करीत असत. ज्याच्या त्याच्या आवडीच्या विषयावर आपल्या परीन बोलण्याचा प्रयत्न करीत असत. अस दहा-वीस मिनिट चालवून शेवटीं ते आपल्या अडचणीवर येत असत. बोलता बोलता गिऱ्हाईकाना शिव्या मोजून आपली बाजू माडू लागत असत.

पण खिशात पैसे असत त्या क्षणी त्याचा चेहरा पैशाच्या प्रमाणावर कमी–

अधिक गभीर असे. जोषासरशी पायऱ्या चढून ते एकदम आपल्या खुर्चीकडे जात असत. तोंवर कुणाकडे बघत नसत. खुर्चीवर बसताच सायकाळीहि त्याना टेबलवर धुळेचा थर दिसत असे. कुशनमध्यें टाचण्या हव्या असत. स्टॅप – पॅड-मध्ये किंवा पेनमध्ये शाई पाहिजे असे. प्यायला पाणी हव असे. खायला पानहि हवी असत. या सर्वांसाठीं ते मारुती, गोकूल आणि अलीअलीकडे गजूवर आरडाओरड सुरू करीत असत अशात एखादा कामगार त्याना अळटळ करताना दिसला की त्याची धडगत राहात नसे. तो टॅरेल असला तर त्याच्यावर प्रेसच्या पायऱ्या उतरण्याची पाळीं ओढवत असे.

आता बाबूरावाचा आरडा-ओरडा ऐकून कैकाच्या जीवात – जीव आला. आरडा ओरडा जारी ठेवत बाबूरावानी रजिस्टर काढल खिशातला सारा रुबाब ड्रॉव्हरमध्ये कोंबला. एकेका कामगाराला हाक मारू लागले पैसे देऊ लागले. सह्या घेऊ लागले या प्रेसमध्ये आणि अशा प्रसगीं क्वचित्काळी टिकणारी शातता आज टिकत असलेली पाहून अनुभवी कामगारानी तर्क बाधला की प्रेसमध्ये लवकरच कोणते तरी भरपूर काम येऊ घातलेले आहे.

सर्वांत शेवटी बाबूरावानी गजूला हाक मारली. त्यावेळी प्रेसमध्ये प्रेस बद करायला म्हणून मारुती आणि मारुतीसाठी म्हणून गोकूल हीं दोनच माणसं शिल्लक राहिली होतीं मारुतीन आपल काम सुरू केल होत हौदाजवळचं घमेल, ब्रश आणि सोड्याच्या पाण्याची बादली आत आणली होती. गोकूल मागली दार-खिडक्या बद करीत होता.

टेबलजवळच्या गजूला बाबूरावानी या आठवड्याच्या कामाची सपूर्ण रक्कम दिल्यावर ( खर तर देतानाच ) ते म्हणत होते,

" तुला एक सागतों. आपल्या प्रेसमध्यें थोड्याच दिवसात झेड् – पीच्या सर्व शाळाच्या प्रश्नपत्रिकाच्या छपाईचे काम येणार आहे. तेव्हा तू यापुढ आम्हाला फुल – टाईम वर्क द्यावस —– "

" फूल-टाईम ? "

" हो. फुल – टाईम. फुल – टाईम म्हणजे सकाळ – दुपार दोन्हीं वेळा "

" पण मी शाळेत जात असतो —– "

" ते माहीत आहे मला.. म्हणून मीं काम घेऊ नये काय ? "

हा प्रश्न गजूला चमत्कारिक वाटला. या ठिकाणी त्याच्या बरोबरीचा कुणी

असता तर तो,

" माझ्यासाठी तुम्हीं सारी काम घेत असता काय ? "

असा प्रश्न करण्याइतका धाडसी नसला तरी डोकेबाज सहज होता. पण आता तो गप्प होता म्हणून बाबूराव म्हणत होते, " बोल ना ? "

" तस नाहीं पण माझी शाळा -- "

" हे बघ बुवा ! तुला एक काहींतरी पत्कराव लागेल. एक तर शाळा, नाहीं तर प्रेस. बोल काय म्हणण आहे तुझ ? "

आयुष्यात पहिल्यादाच ' मालक ' या सस्थेच खर रूप गजूला दिसत असल्यान तो गप्प राहिला इकडे बाबूराव म्हणत होते,

" वाटल्यास आताच नको देऊ मला तुझा निर्णय. घरी गेल्यावर आप्पाना साग, की मी अस - अस म्हटल म्हणून. ते काय म्हणतात ते मला उद्या उद्या सुटीच आहे - तेव्हा परवाला साग . "

या बाबतींत आप्पाकडून सरक्षण मिळेल किंवा नाहीं याची शका असलेल्या गजून स्वत.च स्वतःच सरक्षण करण्याचा पवित्रा घेतला,

" पण माझी परीक्षा जवळ आली - तेव्हा आता येत असतो, त्याच पद्धतीन — "

" हें बघ बुवा ! "

बाबूराव म्हणाले,

" मला तुझ्या पद्धतीन प्रेस चालवायचा नाहीं. तुला काहीं तरी एक ठरवाव लागेल. दोन्ही डग्ग्यावर हात ठेवू नये माणसान काय म्हणतो ? "

नुकताच ' मालक ' बघत असलेला गजू त्याच्याशीं कस बोलाव हें न कळून मख्खासारखा खाली मान घालून गप्प होता.

गजू आप्पाचा मुलगा असल्यान म्हणण्यापेक्षा बाबूरावाना आपल्या गरजेची परत जाणीव झाल्यान म्हणण अधिक बर होईल - ते आपल पूर्वीचच म्हणण आता दुसऱ्या भाषेत सागू लागले,

" आम्हाला धद्याच प्रथम बघायला हव असत अशा सीझनच्या वेळी फक्त दोन तास काम करणाऱ्यासाठीं आम्हाला अडीच तीनशे रुपयाची केस बाकीचे सर्व तास रिकामी ठेवण परवडत नाहीं. तुझ्याच्यान नच जमल तर त्या केसवर काम करणाऱ्या दुसऱ्या माणसाची मला व्यवस्था करावी लागेल

" जा, विचार तुझ्या वडिलाला..."

" मारुती, झाल कायरे सार बंद करून ? "

खुर्चीतून उठताना बाबूरावानी मारुतीला जेवढ्या मोठ्यान विचारल होत – तेवढ्या मोठ्यान ओरडण्याची आवश्यकता नव्हती हें त्याना गोकूल – मारुती त्याच्याच उठण्याची वाट बघत समोर उभे असल्याच पाहून लक्षात आल. पाहता पाहता सारीजण प्रेसखाली उतरली मारुतीन कुलूप घालून बाबूरावाना किल्ल्या दिल्या. त्या खिशात टाकताना त्यानी कुलूप ओढून पाहिल. मग सायकलवर टाग मारली.

तसाच गजूहि आपली वाट धरणार होता. पण मारुतीचा एक हात त्याच्या मानगुटीवर जमून बसला दुसऱ्यान त्याचा हात धरला. तोंवर त्याला गोकूल-पुढ उभा करीत मारुती म्हणू लागला,

" देखरे गोकुल, ये भडजी–भागना मागता है—"

गजूच्या अवस्थेची, त्याच्याइतकी नसली तरी मारुतीपेक्षा निश्चित जास्त कल्पना असलेला गोकूल उदार होत म्हणाला,

" जाऊ दे जाते तर! राहिला तर पुडच्या हप्त्यात घेऊ त्याच्याकडून आपून पार्टी.. इस वक्त वो परेशान है—"

गोकूलकडून गजूच्या परेशानीच कारण मारुतीला कळताच तोहि हळ-हळला. पण धरलेला गजूचा हात सोडवेना म्हणून असेल, प्रायश्चित्ताच्या भावनेन असेल किंवा खिशातल्या गुर्मीन असेल, तो म्हणाला,

" अरे भडजी, तू नाही खिलवत नोकों खिलवू यार! मी खिलवतो तुले. चल, हमारे साथ "

बोलता बोलता ती गजूसह जवळच्या हॉटेलात घुसली नाहीं–नाहीं म्हणणाऱ्या गजूला स्वतःसाठीं बोलावलेले सर्व पदार्थ त्यानी खायला लावले. वरन ' कडक मिठी ' चाय झाली. पानपट्टीला मात्र गजून नकार दिला. त्याच्या मोबदल्यात सोबत्याची, 'भडजी–भडजी' म्हणून थट्टा सोसली.

पानपट्टीच्या दुकानाशीं थाबून, बारकाईन आरशात बघत गोकूल आणि मारुती पिलाहत्ती ओढीत होते. गजू सतत ' जातों, जायला हव–" करीत होता.

—

# पांच

खर तर शाम प्रिंटिंग-ब्यूरोची वॉर्निंग नोटीस हातीं पडताच आप्पानी डॉक्टर चोप्राकडे जायला हव होत. पण तोंवर गजू पै का होईना, मिळवता झाला नसल्यान आप्पाना डॉ. चोप्राकडे जाववत नव्हत. पैशाच्या अभावाखेरीज आणखीहि काहीं कारण होतीं. डॉ. चोप्रानी भयकर अस काहीं तरी सागून आपल्याला हादरवून सोडू नये हे त्यातल एक. चोप्रा बाबासाहेबाना जास्त जवळचे पडत, हे दुसर. गजूची मिळकत चोप्रासारख्याच्या ट्रीटमेंटला पुरेल की नाहीं—हा सशय, तिसर. आपण वॉर्निंग नोटीस मिळाल्यानतर अधिक जागरूकतेन काम करीत असल्याची जाणीव, हे चौथ. या सर्वांमुळ त्यानी निभ-तील तितके दिवस लोटत आणले होते.

पण अलीकडे, वॉर्निंग-नोटीसची मुदत सपत आल्यान म्हणा, गजू दर आठवड्याला त्याच्या अपेक्षेपेक्षा चार-दोन रुपये जास्तीचे मिळवू लागल्यान म्हणा, खऱ्याखुऱ्या प्रेमळ व्यक्तींच्या आग्रहान म्हणा वा अनिर्णित अवस्थेत जास्त दिवस काढण त्याच त्यानाच बोंचू लागल्यान म्हणा—त्यानी एकदाचा डॉ. चोप्राकडे जायचा निर्णय घेतला. त्याप्रमाण त्यानी आज डॉ. चोप्राच्या

हॉस्पिटलची वाटहि धरली.

डॉ. चोप्रा याचे हॉम्पिटल शहरातल्या अत्यत आधुनिक भागात असून त्यातल्या त्यात अत्याधुनिक पद्धतीच्या इमारतींत होतें. आजूबाजूच्या चार जिल्ह्यात डॉ. चोप्राची ख्याति होती. या चारहि जिल्ह्यात त्याची हॉस्पिटल होतीं. या हॉस्पिटल्स्‌मध्यें ठराविक दिवशी अन् वेळीं ते हजर राहात असत. त्याचा कोणता दिवस कोणत्या शहरीं आहे, हे तिथल्या हॉस्पिटलमध्यें मोक्याच्या जागेवर लिहिल होत. बाकीच्या दिवशी त्या हॉस्पिटलमध्यें डॉ. चोप्राचे असिस्टटस् काम बघत असत. डोळे धुणे, त्यात औषध टाकण, त्याना पट्ट्या बाधण किवा डॉक्टरानी नेमून दिलेली इजेक्शन देण वगैरेसारखीं किरकोळ काम हे असिस्टटन्स् निभावून नेत असत. धद्यात सदा सर्वकाळ बिझी राहणाऱ्या डॉ चोप्राची मुलाखत क्रम लावून घ्यावी लागत असे. ह्या क्रम लावणाऱ्याना एम्प्लॉयमेन्ट एक्स्चेंजमध्यें देण्यात येतात तसली छापील कार्ड दिली जात असत. त्यात डॉक्टर चोप्राच्या भेटीच्या सभाव्य तारखा लिहिलेल्या असत. या तारखाना भेट होऊ शकली नाहीं तर पेशटला नव कार्ड दिल जात असे

आप्पाच्या खिशात आज तसल्याच जातीच तिसऱ्या क्रमाकाच कार्ड होत. म्हणून त्याना डॉक्टराच्या भेटीची आशा होती अस नाहीं, तर सोबत बाबासाहेबाच पत्रहि होत. ते डॉक्टराकडे जायची टाळाटाळ करीत असावेत अशा खऱ्या सशयान बाबासाहेबानी आप्पा देशकराना आजच दिल होत. त्यामागला बाबासाहेबाचा उद्देश तेच जाणोत, पण आप्पाना मात्र वाटल होत की कदाचित् ह्या पत्रामुळ आपण डॉक्टराच्या खर्चातून बचावू शकू खर तर ह्याच मोहान आप्पाना डॉक्टराच्या पायऱ्या चढवल होत.

तरीहि डॉक्टराना बाबासाहेबाच पत्र पोचवून परतलेला कपौडर आप्पाना म्हणाला, " तुम्ही बसा या बेचवर.. डॉक्टरसाहेबानी पाठवल्यावर मी येतों तुमच्याकडे.. "

" तरी साधारणतः किती वेळ लागेल ?"

" लागेल, दीड–दोन तास ? "

ऐकून आप्पाना पुनर्प्रश्न करण्याच भान राहिल नाहीं कारण त्याना स्वत ला तरी बाबासाहेबाच पत्र म्हणजे नेहरूच्या पत्राइतक मोठ–महत्त्वाच वाटत होत. चिठ्ठी वाचताच डॉक्टर आपल्याला आत घेतील अशी त्याची कल्पना होती. पण

विद्वत्तेचा हा रुबाब संपत्तीपेक्षा वेगळाच होता.!

आप्पा विचार करीत बाकावर बसून राहिले

दीडदोनच्या ऐवजी अडीच-पावणेतीन तासानी दुसराच एक मनुष्य तिथ आला. रूमभर तोंड फिरवत मोठ्यान, परक्या आवाजात ओरडला,

" आत्माराम देशकर कोण आहे ? "

" मी– "

म्हणत आप्पा उभे झाले. त्या माणसान खुणावलेल्या वाटेन चालू लागले. चार–पाच आडव्या उभ्या बोळा ओलांडून डॉक्टर चोप्राच्या लॅबोरेटरीत दाखल झाले. त्यावेळी एक कुणीतरी त्याचा असिस्टट डॉक्टर एका रोग्याला बाहेर काढत होता. तोहि दुसऱ्या एका दारान. ज्याच्या माथ्यावरील काचेवर 'बाहेर जाण्याचा रस्ता' अशी अक्षर लिहिली होतीं. रोग्याच्या डोळ्याना पट्ट्या होत्या. पोचवणारा डॉक्टर त्या रोग्याला मध्यें उंबरठा असल्याच सागत होता.

ती जोडी उंबरठ्याशीं टेकते न टेकते तर आप्पा लॅबोरेटरी न्याहाळू लागले. त्या मोठ्या हॉलच्या कोना–कोपऱ्यात नाना–त-हेचीं यंत्र बसविली होतीं. पैकीं काही भितीत तर काही जमिनीत रुतवलेली होतीं. काहींना चाक किंवा रबरी शेंबीचे पाय होते. कुठंकुठं जेमतेम दोघा–तिघाना बसता येईल अशा रुम्स् होत्या. त्याना काळया रंगाचे पडदे लोमकळत होते, तस पाहिल्याला तो सर्वच हॉल काळगर्द होता. दिवा असून मध्यरात्रीचा भास होत होता. या सर्वांनी आप्पाना कुठल्या तरी सिनेमात पाहिलेल्या सिने–स्टुडिओची आठवण झाली. ते सिनेमाच नाव आठवू लागले

तशात पहिल्या पेशटला जेमतेम उंबरठ्यापार केलेला मघाचा डॉक्टर त्याच्या खुर्चीशीं आला. आप्पाना नाव, गावाची विचारपूस केल्यावर तो बाजूच्या एका कंपार्टमेंटमध्यें गेला. क्षणार्धांत परतला तेव्हा डॉक्टर चोप्रा त्याच्या सोबत होतें. त्याच्या, त्याच्याशीं बोलण्याच्या पद्धतीवरून आप्पानी ते ठरविल.

डॉक्टर चोप्रानीं एका मोठ्या दिव्यापुढल्या स्टूलवर आप्पाना बसवल. असिस्टटन बटन दाबताच आप्पाचे डोळे दिपून मिटले. तोवर डॉक्टरानी त्याच्या कपाळावर एक आणि हनुवटीवर दुसरा हात ठेवला होता. आप्पाना दिव्याकडे बघायला सागू लागले. आप्पानीं तें करून पाहिल. पण जमल नाहीं.

बटनाचा परत आवाज होताच डॉक्टरानी परत त्याना तेच करायला सांगितल. तरी आप्पाना जमल नाहीं. अस पाचव्यादा झाल. तेव्हा मात्र ते त्याच्च दिव्याकडे पाहू शकले.

पाहता पाहता त्याच्या लक्षात आल की, आपण पाहतो तो साधा दिवा नसून त्यात दुसरच काही तरी आहे.

या दरम्यान चोप्रानी हव ते आप्पाच्या डोळ्यात पाहून घेतल असाव. कारण त्याच्या पालटत्या चेहऱ्याबरोबर आप्पावरले हात सुटत गेले.

यासारख्या पद्धतीन पण रूममधल्या बहुतेक सर्व यत्रसामुग्रीशी आप्पाची कसोटी झाल्यावर वॉश-बेसिनकडे जाताना डॉक्टर पुटपुटले,

"का हो, तुमच वय काय ?"

"पचावन्न—"

"डोळे कधीपासून बिघडले ?"

"मला वाटते, झाले असतील सोळा–सतरा वर्षे—"

"चष्मा कधी लागला ?"

"त्यालाहि जवळ जवळ तेवढींच वर्षे—"

"घेतला कुठन होता ?"

"घेतला .."

आप्पाना बोलण टाळावस वाटल,

"मला नक्की—"

"रस्त्यावर बसणाऱ्यापासून ?"

"अ हो "

"आणि औषध कोणकोणतीं वापरलीत ?"

पहिल्यादा आप्पाची बोलण्याची हिमत झाली नाहीं. पण डॉक्टरानी परत तेच विचारल्यावर आप्पा आठवू लागलेल्यापैकी त्याच्या दृष्टीन 'भारी' असलेल्या औषधाची नाव सागायला सुरुवात केली. त्याच सपायच्या आत त्याच्या काही औषधाची नाव स्वतः घेत डॉक्टर म्हणाले,

"बरोबर आहे ना ?"

आप्पानी मान हलविली आता हात कोरवडत त्याच्याकडे येणारे डॉक्टर म्हणाले, "तुम्हाला कुणी सागितल होत हीं औषध घ्यायला अन् तो चष्मा

वापरायला ? ”

हे सार सागण आप्पाना अवघड काम होत. कारण काहीं औषध त्यानी नुसत्या वर्तमानपत्रातल्या जाहिराती वाचून घेतली होतीं. काहीं कुणाच्या सागण्यावरून तर काहीं कुणी स्वस्तात किवा फुकट आणून अथवा मिळवून दिली होती. अशात काहीं काजळहि होतीं. अर्थात् हे सार डॉक्टराना सागणं शक्य नव्हत. पण काहींतरी सागाव म्हणून आप्पानी कुण्यातरी इग्रजी कपनीच्या अन् त्याच्या दृष्टीन फार प्रसिद्ध आणि महाग असलेल्या एक-दोन औषधाची नाव सागितलीत एवढ्यावरच ते थाबले नाहीत तर चोप्राना प्रश्न करून बसले, “ हीं औषध तर डोळ्यासाठी प्रसिद्ध आहेत ना ? ”

“ हो पण औषध प्रसिद्ध आणि महाग असलं म्हणजेच त्यान फायदा होतो, अस नाही. आवश्यक तेव्हा आवश्यक ते औषध वापरल म्हणजेच गुण येत असतो मग ते औषध फुकटाच आणि अप्रसिद्ध का असेना ”

कपौडरला खूण करून दुसऱ्या पेशटला आत आणायला सागितल्यावर डॉक्टर म्हणाले, “ अनावश्यक ठिकाणी तुम्हीं शहाणपण खर्च करून आपले डोळे वर्स्ट करून घेतले आहेत.. ”

“ वर्स्ट ? ’

“ जवळ जवळ––”

“ आता त्याच्यावर काहीच उपाय नाहीं ? ”

“ अ . तसा आहे. ऑपरेशनचा. पण त्यानहि तुमची दृष्टि काम करण्या-इतकी सुधारेल की नाहीं हे मला आजच सागता यायच नाहीं ..शिवाय हे ऑपरेशन खूप खर्चाच आहे. बर, तोहि फारसा प्रश्न नाहीं बाबासाहेबाना मला फोन करायला सागा मी बोलू शकेन याबद्दल अधिक त्याच्याशीं

“ बर—तर तुम्ही जायला हव आता ”

पण यापूर्वीच डॉ. चोप्राच्या असिस्टटन आप्पाना जायचा मार्ग दाखवला. आप्पा बाहेर आले. पूर्वीचेच डोळे घेऊन. पण ते आता मानसिकदृष्ट्या अधिक अधू झाले होते.

# सहा

बाबूराव गुप्त्यानी गजूला फुल-टाईम कामावर येण्याबाबत सांगितल्याला आता काही दिवस होऊन गेले होते त्याच्या म्हणण्याप्रमाण गजूला कामावर जाण भाग पडल असत तर तो सोमवारीच कामावर हजर झाला असता पण त्या दिवशी श्री कन्नमवार याच्या मृत्युमुळ महाराष्ट्रभर हरताळ होता मंगळवारीं आपल्या नेहमींच्या वेळी गजू प्रेसमध्ये गेला होता. शाळेची वेळा होताच तो काहीं एक न बोलता शाळेत निघून गेला होता. जाताना, काम मांडवेतें वेळीं शनिवारच बोलण बाबूराव उकरून काढतील अशी त्याला धास्ती वाटत होती पण विस्मरणामुळ असेल, ज्या कामासाठीं बाबूराव गजूच्या अधिक मेहनतीची अपेक्षा करीत होते तें काम हातीं पडायला वेळ असल्यान असेल किंवा जास्त ताणल तर तुटत नि आपल्याला माणस मिळण दुर्मिळ ह्या व्यावसायिक भयामुळ असेल–बाबूरावानीं गजूपाशीं या बाबतींत बोलण टाळल होत. गजू शाळेकडे जाऊ शकला होता

असे आणखीहि काहीं दिवस निघून गेले होते.

पण आज परत गजूचा साप्ताहिक हिशोब देताना बाबूरावानीं तो प्रश्न काढला होता. आजची त्याची भाषा मागल्यापेक्षा वेगळी होती. तींत विनवणी-पेक्षा सक्तीचा अंश जास्त होता. त्यान गजूला कुंठित करून टाकल होत. कारण या बाबतीत आप्पाशीं बोलण्याच त्याच्यात धाडस होत नव्हत शाळा सोडण्याची तर तो कल्पनाहि करू शकत नव्हता. त्यामुळ आणि कोणताहि विचार बळ घेत नसल्यामुळ आज प्रथमतः त्यान शाळेला दाडी देऊन तो प्रेस-मध्ये राहिला होता. फुल टाईम–काम करण्याच्या त्याच्या आजच्या पहिल्या अन् अनिर्णित दिवसात त्यान कामापेक्षा विचारच जास्त केला होता. सायकाळीं प्रेस सुटेपर्यंत त्यान आपला निर्णय घेऊन टाकला होता. निर्णयासरशीं, तडक चालीन तो घरीं आला. व्हराडयात नि मधल्याहि घरात बाळचा पत्ता नव्हता– तेव्हा तो अशा वेळीं नेहमी चुलीशी राहणाऱ्या सुधाशीं थांबला. एकदम म्हणाला,

" आप्पासाहेब कुठाय् ग ? "

" आले नाही अजून. का ? "

" तुला चांभार–चौकशा कशाला ? "

अन् तो माग फिरला. त्यामुळ त्याच्याशीं तिची अधिक बोलण्याची हिंमत झाली नाहीं. पण त्याच्या ह्या नव्या पवित्र्याचा तिलाहि अचंबा वाटल्यावाचून राहिला नाही.

एकदम व्हराडयात थबकलेल्या गजूच्या डोक्यात आणखी काहीं तरी आल असाव. त्यान आप्पाचा विचार सोडता–सोडता केशवच दार ठोठावण सुरू केल.

यावेळी केशव आपल्या कामात गढला होता नुकत्याच उरकलेल्या एका लग्नात मारलेला माल तो आपल्या घरात रफातफा करीत होता. पान, सुपारी, वेलदोड्यापासून तो पत्रावळीत लपेटून आणलेल्या वनस्पती तुपापर्यंतच्या साऱ्या जिनसा आपल्या कडल्या ' त्या '–' त्या ' डब्यात टाकत होता.

दारावरले धक्के, आणि हाकाची सरबत्ती ऐकताच केशवन एकीकडे ' आलो –आलो, हो येतोच ' अस सुरू केल अन् दुसरीकडे त्याच लग्नात उजागरीन मिळालेल कोर करकरीत धोतर मालाच्या सर्व पसाऱ्यावर, प्रेत झाकतात तस घाईघाईन झाकल मधल दार मागल्या हातानी ओढून घेत व्हराडयात आला.

व्हराडयाचं दार उघडून गजूलाच म्हणून आत घेतलं टेकतों न टेकत तर गजू म्हणाला,

" नानासाहेब, ती नोकरी अजून मिळणं शक्य आहे काय हो ? "

लक्षात न येऊन केशवनं विचारलं,

" कोणती हो ? "

" ती–ती नाही काय क्लबातली ? "

" क्लबातली म्हणताय् ? "

लखकन चेहरा उजळवत केशव म्हणाला,

" का, काय झालं ? "

" आपल्याला छापखान्याचं काम करायचं नाही—"

" अहो, पण झालं तरी काय ? "

गजूनं दमासरशी सारं सांगून टाकलं. ते संपण्याच्या आत, गजूच्या दुःखावर हळहळण्याऐवजी स्वतःचा अंदाज खरा होत असल्याच्या समाधानानं तो म्हणाला,

" काय, मी तुम्हाला काय म्हणत होतो ? झालंना शेवटीं तेच— "

आपल्या शिक्षणाबाबतच्या जिद्दीमुळं हे सपशेल कबूल करण्यात गजूला पराभव वाटला. शिवाय केशव समजत होता तेवढा आपल्या शिक्षणाचा बोजवारा उडाला नाही–हें सत्य तो जाणून होता त्यामुळं आता म्हणाला,

" तेच नाहीं म्हणा. फक्त आजच मी शाळेत गेलों नाही. दिवसभर विचार केला आणि जें ठरवलं आहे, त्यावर तुमचा विचार घ्यायला आलो "

कोणताहि बरावाईट सल्ला उधळण्यास नेहमीच तत्पर राहणारा केशव किंचित् गंभीर झाला. गजूभोवतीं जाळं पसरण्याची संधि गेली नव्हती. पण ते पसरण्यासाठी वातावरण कसं तयार करावं या विचारातच तो म्हणाला,

" मीं तुम्हाला आधींच नव्हतं सांगितलं की एखादा मनुष्य एखादं काम शिकून थोडं–फार पैसा मिळवायला लागला की, त्याच्याकडून शिक्षण पूर्ण होत नाही म्हणून ? "

" पण नानासाहेब, मी तेवढ्यासाठी आज शाळा बुडवली नाही. विचार करायला वेळ हवा होता डोक्यात विचार असल्यामुळं शाळेत अभ्यास झाला नसता म्हणून मी कामावर गेलो होतो त्यायोगे एक साधलं. आजचा

दिवस का होईना, बाबूरावाना बर वाटल ”

“ शिवाय तुम्ही म्हणता त्याप्रमाण पैसा मिळवायला लागल्यावर शिक्षण होत नाही–हे खर मानल तर क्लबातली नोकरी करून मी कस शिक्षण पूर्ण करीन हाहि एक सशयच आहे. पैसा हा तिथहि मिळणारच ”

गजूच्या ह्या बोलण्यान केशवला क्षणभर थक्कच केल. त्याच्या बुद्धीच्या वाढीची थोडी–फार त्याला कल्पना होती. पण आज तिलाहि गोंधळाव लागल. गजूच्या परीन ह्याला दुसर कारण होत. मुळातल्या बुद्धीवर आता अनुभवाची तकाकी येत चालली होती. त्यामुळ केशवला तिच्या वाढीची गति दुणावल्याच दिसून येण स्वाभाविक होत.

पण केशव वय आणि अनुभवान गजूपेक्षा पटीनी मोठा होता. क्षणकाल विचार केल्यावर तो म्हणाला,

“ बरा सवाल केला गजाभाऊ, बरा सवाल केला पण तुम्ही हे लक्षात घ्या की मी तुम्हाला काम शिकून पैसा मिळविणाऱ्याच्या बाबतींत असं घडत असल्याच सागितल, बोललो होतो कारण माहीत आहे? काम शिकलेला माणूस थोडी–फार का होईना मानाची जागा मिळवीत असतो

“ उदाहरण तुमचच देतो. आता तुम्ही प्रेसमध्यें स्टूलवर बसू लागला असणार! क्लबातल्या झाडझुडी नि पाणी भरण्यापेक्षा ही जागा केव्हाहि मानाची शिवाय या जागेवर बसून क्लबपेक्षा पैसाहि अधिक मिळतो असं असल्यावर माणसान शिक्षण हे घेतलच पाहिजे हे त्याला तितक्याशा तीव्रतेन जाणवत नाही .

“ पण जर एखादा स्वाभिमानी माणूस क्लबातली काम करू लागला तर मात्र त्याला आपल्या अपमानास्पद जीवनाची तीव्र टोंचणी राहाते. तो दुःखी होतो, आणि कोणत्या तरी तळमळीन म्हणा किंवा सूडाच्या भावनेन म्हणा तो आपल्या ध्येयाकडे अधिक लक्ष देतो. काय वाटेल ते झाल तरी मला हें जगणं टाळलच पाहिजे, मला वेगळ काही तरी करून ह्या नरकाबाहेर पडलच पाहिजे अस त्याला रात्रदिवस वाटत असत ”

आपल्या अतःकरणातल हा माणूस बोलूच कसा शकतो याच गजूला नवल वाटत होत तो आतावर एकटक होऊन केशवकडे बघत होता.

बोलत असला तरी केशव गजूकडे पाहात होताच त्याचे भाव बारकाईन

टिपत होता. आपल, वरल्यासारख वरच बोलून झाल्यावर त्याला डोळा भिडवत तो एकदम म्हणाला,

" काय पटल कीं नाहीं ? "

" हो. "

एकदम भानावर येत गजू म्हणाला,

" हो–हे सार खर ! पण आता यावर उपाय काय ? "

केशव बोलला नाहीं.

न राहवून गजूच म्हणाला,

" आता मी काय कराव, अस तुमच मत आहे ? "

" माझ्या मताचा तुम्हाला काय उपयोग होणार ? "

" त्याशिवाय आलों कीं काय तुमच्याकडे ? "

" आला असाल फक्त विचारायला पण मानाल तेव्हा ना ? "

" नाहीं, आता मानलेच नानासाहेब तुमची शपथ, आता मी तुम्ही सागाल तसा वागेन "

" कशाला उगाच शपथ घालताहात गजाभाऊ ! "

केशव त्याला आणखी वढेत म्हणाला,

" मागच तुम्ही माझ ऐकल असत तर तुमच्यावर ही पाळीच नसती आली "

" म्हणजे ? "

" अहो, माग नव्हत सागितल मीं तुम्हाला ? "

बोलता बोलता विडीच थोटूक फेकण्याच्या निमित्तान तो जागचा उठला दाराच्या चौकटीवर हात जमवून आप्पाच घर कानोसल. परत बैठक जमवताना म्हणाला,

" आताहि माझा सल्ला तुम्हाला पटला तर बर नाहीं तर तुम्ही बाप–लेक एक व्हायचे आणि आमच्या घराविषयीं मात्र उगाच गैरसमजाची गुरळीं धरून बसायचे. त्यापेक्षा न बोललेल लाख बर ! काय, कस म्हणतो ? "

गजू बोलला नाही. पण केशवहि बोलेना तेव्हा मात्र त्याला वाटल की, तो काहीतरी महत्त्वाची तोड सुचवणार. म्हणून तो म्हणाला,

" नाहीं–नाही. तुम्ही सागाच नानासाहेब. तुम्ही काहीं वाईट थोडच सागणार

आहात ”

“ हा, अश्शी समज हवी !

“ अहो, मी तुम्हाला वाईट मार्ग दाखवून मिळवणार तरी काय आहे ? आहे काय काही मिळवण्याजोग ? ”

गजून मान हलवली.

“ बर, तुम्ही सागणार तर नाहीं कुणाला ? ”

“ नाही. मुळीच नाही. ”

“ तुम्हाला पटल नाहीं, तरीहि ? ”

“ हो. ”

“ बघा बर ? ”

“ नाहीं, अगदीं कुण्णालासुद्धा नाहीं--”

“ शाब्बास ! ”

पण केशव थाबला, तो बोलाव कीं न बोलाव या-म्हटल तर विचारात नि म्हटल तर अविचारात-क्षणार्धात त्याच्या मूळ प्रवृत्तीन मात मिळवली,

“ ऐका तर. माझ म्हणण अस कीं तुम्ही इथन छः करावी ! ”

ऐकायला न आल्यासारखा चेहरा करीत गजू म्हणाला,

“ म्हणजे हो नानासाहेब ? ”

“ वेगळीकडे राहायला जाव ”

“ घर सोडून ? ”

“ मग काय घर घेऊन म्हणतोय काय ? ”

आपल्या दुष्टतेला विनोदाचा मुलामा दिल्यास ती कमी होईल, अशा समजुतीन केशव हसत सुटला. पण हसता हसताच म्हणाला,

“ अहो, घर नेल की ते आप्पासाहेब, तो बाळ, ती सुधा अन् त्याच्यासोबत तुमच्या पाठीशी आता असलेल सकटहि आलच ! खर कीं नाहीं ? ”

गजू बोललाच नाहीं.

केशवलाच म्हणाव लागल,

“ काय, काय म्हणतोय् ? ”

गजूच्या पोटात वेगळच काहीं तरी ढवळायला लागलं. पण तो, कदाचित् केशवच्या धाकामुळ असेल-बोलला मात्र त्यापेक्षा वेगळच,

“ पण आता ते कस शक्य आहे ? ”

“ नसायला काय झाल ? ”

“ पूर्वी तात्पुरती गरज भागवायला क्लबातली नोकरी होती. आता ती गेली म्हणताहात तुम्हींच. माग तुम्हीं सागत होते की क्लबात राहण्याची व्यवस्था झाली असती. आता तर ते सार ”

“ ह्या सगळ्या गोष्टी कारणादाखल दाखवायच्या असतात गजाननराव ! ”

केशव उदासपणे म्हणाला,

“ तुमची इच्छा असली तर सार काहीं परत जमवून आणता येईल बोला आताहि ”

“क्लबातली नोकरी अजून मिळेल ? ”

“ त्या नोकरीची ऐशीतैशी—

“ अहो, मनात आणल तर तिच्यापेक्षा छप्पन्न पटीन चागली नोकरी हुडकून काढण मला कठीण नाहीं वेळप्रसगीं जो माणूस आधळ्या–बहिऱ्याना मुली मिळवून देतो त्या माणसाला काय तुमच्यासारख्या हुशार मुलाला साधी नोकरी मिळवून देण कठीण आहे ? ”

“ पण लगेच ती मिळण कस काय शक्य आहे बुवा ”

“ इतकी काय तुम्हाला तिची घाई पडली आहे ? ”

“ वा ! घाई नाहीं तर ! ”

गजू वाट चाचपडू लागला,

“ समजा, उद्या इथून निघालो तर राहायला जागा आणि खर्चायला काहीं पैसा तर हवाच कीं नाही ? शिवाय परीक्षा अगदी जवळ येऊन ठेपली आहे ”

“ एवढीच अडचण असेल, तर घेऊ निभावून कशी तरी. पण आधी तुमची घर सोडायची तयारी आहे काय ते बघा—”

या प्रश्नान गजूतली ओल वाढत गेली. पण कधी कधी दयेला बळी जाण्यातहि माणसाला वाटतो तो कमीपणा गजूला बोलायला भाग पाडून गेला,

“ तुम्ही कशाला त्रास घेताय् नानासाहेब माझ्यासाठीं ! ”

“ यात कसला आलाय त्रास ? तुमच्यासारख्या होतकरू विद्यार्थ्यासाठीं माझे पाच–पन्नास रुपये कामीं आले तर तें पाप होणार नाहीं

" अस समजेन, की लीलाच्या लग्नाचा अडव्हान्स दिला काय, आलना लक्षात–मीं काय म्हणतो, ते ? "

गजूच्या लक्षात आलहि असाव, पण त्याला गृहीत धरूनच केशव बोलत असावा कशावरून ? याशिवाय केशवच्या औदार्यातहि त्याला शका होती. महत्त्वाच, घर सोडण्याच्या विचारान त्याच्यात सुरू झालेली गलबल आता शिगेस पोचली होती.

अशातच केशव विचारत होता,

" बोला मग, आहे काय तर तयारी ? "

" नाहीं बुवा. नाही जमणार हे––"

" का हो ? "

" अ हं नाहीं जमणार ! "

" कारण तर सागाल ? "

" समजा––"

गजू एकदम पोरकट होत गेला,

" मी इथून गेलो अन् आप्पाची नोकरी सुटली तर बाळच कस होईल ? बाळच एक जाऊ द्या. तुमच्या मताप्रमाण कुठहि नोकरी करून त्याला पोट भरता येईल. पण सुधान कुठ जाव ? ती मोठी झाल्यावर तिला कोण साभाळील ?

" नाहीं–नाही. हे जमणारच नाही नानासाहेब आपल्याच्यान "

" विचार करून बोला गजाननराव, विचार करून बोला बर ! सधि वारवार येत नसते परत एकदा सागतो––"

केशव आता म्हटल तर चिडून नि म्हटल तर गजूला डिंवचण्याच्या हेतून बोलू लागला,

" आता जर तुम्हीं माझ ऐकल नाही तर तुमचा सारा जन्म कपोझिग करण्यात जाईल कितीहि लाचारीन एकाच प्रेसमध्ये टिकून राहिलात तरी आयुष्याच्या अखेरीस शभर–सव्वाशेशिवाय कवडी मिळायची नाही.

" आता आहे त्या स्वभावाप्रमाण वागलात तर दरवर्षीं नोकरी बदलवत जावी लागेल नव्या नोकरींत मालकाच्या गरजेनुसार पगार मिळत जाईल म्हणजे, फार तर मिनिमम कीं काय म्हणतात–त्या वेजेस ॲक्टप्रमाणे पण बहुतेक कधीं रोजान तर कधी ठेक्यान कामं करावी लागतील. आयुष्याच्या

उतारावर असताना तींहि मिळतील की नाही याची शकाच आहे ”

“ ने एक जाऊ द्या माणसाच्या जीवनात महत्त्वाची बाब असते ती लग्नाची. तिची निकड तुम्हाला सध्याच जाणवत नसेल. त्या व्यवसायातल्या कुणब्या-तेल्याचीं लग्नहि होतात म्हणून तुम्हाला वाटत असेल की आपलहि होईल. नाहीं–असहि नाहीं. लगडी–पागळी, मुकी, बहिरी बायको पत्कराल तर तेंहि होईल पण मग ससार कसा चालवावा हा प्रश्न राहीलच.

“ वाईट नका वाटू देऊ. स्पष्ट बोलतो. राधाकाकू वारल्यावर आप्पानी लग्नाची खटपट केली नसेल, असं तुम्हाला वाटत काय ? पण अशाना मुली देतील कोण ?—”

यापैकी कशा एकावर गजूकडून उत्तर मिळत नसल्याच केशवला बोलून चुकल्यावर ध्यानात आल. तेव्हाच आपण वाट सोडून भलतीकडेच भरकटत असल्याच त्याला जाणवल नि रित्या रित्यासारख वाटायला लागलं. अशानतर बहुतेक सारी म्हणतात, ते केशवहि म्हणाला,

“ ह, मीं काय म्हटल, ते आल की नाहीं अजून लक्षात ? ”

“ अ हो—”

“ काय ? ”

“ मी यातून मार्ग काढेनच ”

आतावर सुन्न असलेली गजूची जिद्द तडफडून जागी झाली,

“ मी फक्त तात्पुरत्या अडचणीसाठीं तुमचा सल्ला घ्यायला आलो होतो. पुढल्यासाठी काय करायच तें मीं ठरवल आहे—”

“ तुम्ही काहीं एक ठरवू शकत नाहीं—”

“ का, का नाहीं ? ”

“ ठरवणारा कधीच ठरवून टाकत असतो. एवढी मोठी संधि तर कोणताहि मनुष्य घालवीत नसतो ”

“ तस नाहीं हो, नानासाहेब ! ”

सहन न होऊन गजू म्हणाला,

“ पुढल्यासाठीं मी एक प्लॅन तयार करून ठेवला आहे मला ह्या परिक्षेपुरतीच निकड होती ही निभावली कीं झाल . ”

“ प्लॅन–तो हो कोणता ? ”

" मेच्या सुटीत मी क्लबसारखी कुठ तरी नोकरी करीन "

" अशक्य अशक्य "

" पण का ? "

" अहो, प्लॅन–योजना कधीं यशस्वी होत नसतात म्हणून जिथ सरकारी प्लॅन यशस्वी होत नाहीत, तिथ तुमच्या प्लॅनचा काय केवा आहे—? "

" समजा—"

गजू मानायला तयार नव्हता,

" ते नाही जमल तर मी नाईट–क्लास जॉईन करीन "

हे मात्र केशवच्या अनुभवापलीकडल होत, म्हणून आणि गजूच्या बुद्धीचं कौतुक वाटल म्हणून तो गप्प राहिला असा बुद्धिवान छोकरा पुढमाग खरोखर पुढ गेलाच तरी आपल्या कामात पडावा ह्या हेतून केशवला त्याला दुखविण अदूरदर्शीपणाच वाटल. तो म्हणाला,

" तुमचा ओढा शिक्षणाकडे इतकाच जबर असेल तर तुम्ही याहि परिस्थितीतून मार्ग काढू शकणार नाहीं, अस नाही ! "

बोलता बोलता केशव वळणावर आला,

" पण ते फार कठीण आहे हातच सोडून पळत्याच्या पाठीमाग लागण्यासारख आहे "

" नानासाहेब, तस नाहीं हो !—"

" बघू या काय होत तर "

" पण यात तुम्हाला शकाच का यावी–तेच मला कळत नाहीं—"

गजूच म्हणाला,

" समजा, हें नाहींच जमल, तर तुम्हीं सागितला तो तर मार्ग आहेच "

" म्हणजे ? "

न आठवून केशव म्हणाला,

" कोणता हो ? "

" घर सोडण्याचा दुसरा कोणता—"

" पण हे शक्य होईल काय तुम्हाला ? "

" पहा, वेळ येऊं द्या म्हणजे करून नाहीं दाखवणार–तर मला नावाचा गजू नका म्हणू मग तर झाल ना ? "

इथ केशवची समाधानान मान हलली. त्याचा एक उत्तरा वाद पूर्ण झाला.

मग ज्याच्याकरता गजू इथ आला होता त्याची आठवण होऊन केशवला उपाय माग् लागला खूप विचार करूनहि केशवला तो सुचेना. येऊन–जाऊन त्याचे विचार गजूच्या घर सोडण्यावर अडकत, शेवटी काही एक निष्पन्न न होऊन गजून बैठक हलवली

आप्पाना पाहून गजू चपापल्यासारखा झाला. सकोचान इकडे–तिकडे करू लागला.

अशातच त्याला बाळ–सुधाच्या बोलण्यातून कळल की उद्यापासून त्याची शाळा सकाळची झाली आहे खात्री करून घेतल्यावर गजूला आनद झाला.

कारण उद्यापासून तो सकाळची शाळा आटोपून प्रेसमध्ये जाणार होता. अकरा ते सातपर्यंत काम करून बाबूरावाना फुल-टाईम वर्क देणार होता.

# सात

आप्पा देशकर बाबासाहेबांच्या कंपार्टमेंटमध्ये उभे होते. बाबासाहेबांच्या पुढ्यातली सेक्रेटरी डायरीचीं पानं चाळत होती. आप्पांना दिसू नये अशा बेतानं तिनं डायरीचं उघडं पान बाबासाहेबांना दाखवलं. डायरी सेक्रेटरीकडे परत करीत बाबासाहेब आप्पांना म्हणाले,

" मी तुम्हांला अशासाठी बोलावलं, की परवाला मी डॉ. चोप्राशी फोनवर बोललो "

आप्पांना हादराच बसला. कटु गोष्टी मनुष्य शक्य तितक्या लवकर विसरण्याचा प्रयत्न करतो. तसाच आप्पांनी डॉक्टर चोप्रांचं सारं प्रकरण ते घडलं तेव्हापासून विसरण्याचा प्रयत्न चालवला होता. त्याबाबत ते अद्याप अक्षरानंहि कुणापाशीं बोलले नव्हते. घरात तर त्यांच्या हिशोबी दुःखाचा सारखा वाटा उचलणारं कुणीच नव्हतं. स्वतःला सोसवत असे तोवर आप्पा गजूलाहि एखादी घटना सांगत नसत. तोवर ते त्याला ' मूल'च समजत असत. डॉ. चोप्रांची त्यांच्याशीं झालेली बोलणीं सोस्य वाटल्यानं त्यांनीं तीं आपल्यातच

घोळवून घोळवून झिजवत अन् अलीकडील काहीं तासात नाहींशी करीत आणली होती तोच आता बाबासाहेबानी त्याना धक्का दिला होता. त्यामुळ पुढल्या प्रसगासाठी ते स्वतःला तयार करू लागले होते. मोठ्या धैर्यान बाबासाहेबाकडे बघत होते.

बाबासाहेब म्हणत होते, "डॉक्टर म्हणाले की, एका फार मोठ्या ऑपरेशनन तुमच्या दृष्टीत किंचितशी सुधारणा होण्याची शक्यता आहे--"

थाबून बाबासाहेब, म्हटल तर आप्पा आणि म्हटल तर शहाला म्हणाले,

"हो ना?"

"हो, असच"

"ह, तर या बाबतींत तुम्हीं काय विचार करीत आहात?"

आप्पांनी सेक्रेटरीकडे पाहिल.

बाबासाहेब त्याना विचारीत होते, "मी तुम्हाला म्हणतो आहे, देशकर"

"अ हो."

आप्पा भानावर येत म्हणाले, "त्यानी आपणाला ऑपरेशनच्या खर्चाबद्दल"

"हो अडीच तीन हजारापर्यंत खर्च येण्याची त्यानी शक्यता दाखवली आहे"

आप्पानी मान खाली घातली.

बाबासाहेबानी विचारल, "मग, तुम्हीं काय ठरवल आहे?"

"मी मी काय ठरविणार"

"आहे काय एवढा खर्च करण शक्य तुम्हाला, ते सागा"

"मला?"

फिक्कट हसत आप्पा म्हणाले,

"मला अडीच – तीनशेसुद्धा जमविता यायचे नाहींत, बाबासाहेब."

"तर मग ठरवलय तरी काय तुम्हीं?"

हाच प्रश्न बाबासाहेबानी तीनदा विचारल्यान आप्पाना बोलाव लागल,

"माझ्या स्वाधीन तर काहीच नाहीं बाबासाहेब. जे काय करील ते ईश्वराच्या."

"अस म्हणून स्वस्थ बसल तर निभेल?"

"दुसर करणार तरी काय?"

अगतिक चिडीन आप्पाचा आवाज तीव्र झाला. आपण बाबासाहेबापुढ

बोलतो आहोत, याच भान आल्यावर ते हादरलेच. क्षमायाचनेन त्याच्याकडे पाहू लागले.

"तुम्ही थग असता तर ब्यूरोन तुमच्यासाठी काहीं केलहि असत "

बाबासाहेब म्हणत होते,

"आहात अशाहि अवस्थेत तुमच्या आयसाईटमध्ये निश्चित सुधारणा होऊ शकेल अस डॉ चोप्रानी सागितल असत तरीहि ब्यूरोला काही करता आल असत पुढमाग तुमच्याकडली रकम ब्यूरोला मिळाली असती."

"पण व्यवसायाच्या दृष्टीन विचार करता आणि डॉक्टराचा रिपोर्ट पाहता तुमच्या बाबतींत ब्यूरोला ती अपेक्षा ठेवता येणार नाहीं.."

"शिवाय डॉक्टर असहि म्हणाल्याच आठवत की ऑपरेशन अन्-सक्सेसफुल झाल तर तुम्हाला हल्ली दिसत आणि पुढहि काही काळ दिसत राहील – तस देखील दिसायचं नाही "

"त्यामुळ ब्यूरोकडून शक्य नसल तरी ॲज ए ह्यूमन बिईंग म्हणून मीं स्वतःच्या पॉकेटमधून तुमच्यासाठी काहीतरी करू शकलों असतो. पण एवढी मोठी रिस्क घेण्याची माझी हिंमत नाही. कारण तुमची आहे तीहि आय-साईट बिघडली तर तुम्हाला जन्मभर माझ्या नाव शिव्याशाप देण्याची पाळी येईल—"

"त्यामुळं मी तुम्हाला मुद्दाम चर्चा करण्यासाठीं बोलावल आहे यातल तुम्हाला काय मानवण्याजोग आहे ते बोलू शकता तुम्ही "

आप्पानी विचार सुरू केला. दोन मुद्यावर. एक तर, बाबासाहेबाच्या औदार्याचा त्याना वाटावा तितका भरवसा वाटत नव्हता. दुसरा, शस्त्रक्रिया अयशस्वी ठरल्यास अगदी आधळ बनून आहे तेहि जग मुकण्याची आपली तयारी आहे काय, याचा त्याचा त्यानाच पत्ता लागत नव्हता.

पण अशातच मोह त्याना भुरळ घालू लागला. त्यामुळ बाबासाहेबाना चाचपण्यासाठी असेल, त्यानीच बोलायला भाग पाडल म्हणून असेल – कधी नव्हे ती बाबासाहेबाच्या नजरेला नजर भिडवत आप्पानी विचारल,

"या ऑपरेशनमधून तिसरा काहीच पर्याय नाहीं काय ?"

"तुम्हाला नेमक काय म्हणायच आहे ?"

"म्हणजे ऑपरेशन जमल नाहीं, तर माझे डोळे अजिबातच जातील

काय ? ”

“ अ हो. ”

शहाकडे बघत बाबासाहेब घोंगड झटकू लागले,

“ डॉक्टर चोप्रा म्हणाले खर अस. का हो ? ”

शहाला मान हलवावी लागली.

आप्पाना पारखून झाल्यावर बाबासाहेब म्हणाले,

“ धाडस करून बघायला काय हरकत आहे एकदा ! या जगात धाडसाशिवाय कुणाला काहीं मिळाल आहे काय ? शिवाय साधल नर तुम्ही डोळ्यानी तरुण व्हाल. हे तुमच्या आणि आमच्या पण दृष्टीन महत्त्वाच नाही काय ? ”

बाबासाहेबानी आप्पाना कपार्टमेंटमध्ये उभ करून प्रथम डॉक्टर चोप्राच नाव काढल्यान आप्पात जी धडकी भरली होती ती आता बाबासाहेबाच गोडीगुलाबीच बोलण ऐकून ओसरली होती. असा मनुष्य अशा अवस्थेत आपल्याला कामावरून दूर करू शकेल अस या क्षणी तरी आप्पाना वाटत नव्हत त्यामुळं डोळ्याबद्दलची काळजी कमी झाल्यान म्हणा किंवा कायमचे डोळे गेल्यावर घरी बसाव लागलच तर गू – मुताचा भार पोरावर पडू नये म्हणून म्हणा,

आप्पा म्हणाले, “ पण नाही साधल तर मात्र — ”

“ हा. हे तर आहेच. ”

आप्पाचा कल जोखत बाबासाहेबाच औदार्य उफाळल,

“ ते तुमच तुम्ही बघा. ऑपरेशनचा सर्व खर्च मी द्यायला तयार आहे ब्यूरोला शक्य नसल तरी माझ्या पॉकेटमधून देईन. ”

आप्पा गप्प राहिले. बाबासाहेबानी विचारल, “मग, काय ठरवता आहात ? ”

“ विचार करून सागतो — ”

“ हो, पण कधी ? ”

“ लवकरच. ”

“ ठीक आहे. मी ब्यूरोतर्फे आणखी पधरा दिवसाची सवलत देतों पण ही तुम्हाला शेवटची सवलत बरं का ? ऐकल ना शहा ? ”

“ बर तर, आपली चर्चा सपली. तुम्हाला जायला हरकत नाहीं . नमस्कार ! ”

# आठ

गजूच म्हणून आज सकाळी शाळेत गेला नव्हता. तो कदाचित् आपल्या रिझल्टबद्दल उदास असल्यान असेल. ही उदासीनता कदाचित् त्याच्या शिक्षणात येऊन गेलेल्या नि येऊ घातलेल्या अडथळयाच्या रागेमुळ त्याच्यात निर्माण झाली असेल. कदाचित् ऐन परीक्षेत इतर विद्यार्थ्यांसारख त्याला रात्ररात्रभर नि दिवसातून सापडेल तितका वेळ खोलीत कोंडून घेऊन अभ्यास करायला न मिळाल्यान असेल किंवा कदाचित् संस्कृत आणि इंग्रजीचे पेपर्स चांगले गेले नाहींत. या इतर विद्यार्थ्यांनी लिहिलेली उत्तर ऐकून त्याच्याच झालेल्या समजुतीमुळहि असेल. व्हायचे ते होवो, असा दैवावर हवाला टाकून तो ठरल्यावेळी सुहास छापखान्यात कामावर आला होता. अर्धा–पाऊण दिवस तो रिझल्टबद्दल नाना शंका काढून उदास राहिला होता.

पण सुटी व्हायची वेळा जसजशी जवळ येऊ लागली, तसतसं त्याला रिझल्टच आकर्षण वाटू लागल सकाळींच रिझल्ट पाहून कामावर आलों असतो तर बर झाल असत, असं त्याला वाटू लागल. कधी कधीं हें वाटण इतक तीव्र

होई की कोणतें तरी निमित्त काढून पळ काढण्याचा विचार त्याच्या डोक्यात धुडगूसू लागे. पण बाबूरावाचा एरव्हींपेक्षा जरा गरम वाटणारा चेहरा पाहून तो स्वतःला शात करी.

प्रेस सुटल्यावर तो स्वतःला आवरेनामा झाला होता. लगबगीन घरासाठीं निघाला होता. पण आजच बसच्या रागेत त्याला बरच खोळबाव लागल होत. तेहि इतक की प्रेस सुटताच तो पायाने चालू लागला असता तर कदाचित् आता बसन येत होता, तितक्या वेळात घरी येऊन पोंचला असता. इतका त्याला आता वाड्यात शिरायला काळोख झाला होता.

घरात आप्पाचा सुगावा नव्हता. अशात फारस दिसत नाहीं ह्या कारणान एरव्हीं आप्पा घरी येऊन पोचलेले असत बाळ वा सुधाकडून हात-पाय चेपून घेत असत. जेवणासाठी गजूची वाट बघत असत. पण हे लक्षात येत न येत तर गजूला बाळची आठवण झाली परतु त्याला दिसली सुधा गजूच्या अस्तित्वाच्या जाणीवेदाखल ती खुर्चीतून उठत होती. तिला ' बस-बस ' करीत गजून ( खर तर स्वतःसाठीच ) विचारल,

" का ग, लागला रिझल्ट ? "

" तर ? "

" काय म्हणतोय् ? "

" पा ऽ स "

" खरच ? "

" बघ ना ! "

बाळगून असलेला दाखला आणि मार्कलिस्ट गजूपुढ उकलत ती म्हणाली,

" पाचशेपैकी चारशे अठ्ठावीस मार्क मिळवलेय मी—"

त्याच्या मनःस्थितीच्या मानान तिच कौतुक झाल्यावर तो बाळसाठी इकडे-तिकडे पाहू लागला वस्तुतः आपण वाट पाहतों ती बातमी इकडूनच कुठून तरी अचानक कानी यावी अस गजूला वाटत होत, पण आपल्याच आनदात दग असलेली सुधा काहीं बोलेना म्हणून त्यान बाळची चौकशी सुरू केली होती,

" बाळ, नाहीं दिसत ग ? "

" दादा, तुला एक गम्मत सागू काय ? "

" कसली ? "

" एका माणसाची कीं नाहीं, छाऽन जिरली ! "

" का, काय झाल ? "

गजून घाबरून विचारल,

" साग ना लौकर "

बाळच्या धाकान ती आत बघत म्हणाली,

" एक माणूस कीं नाहीं—"

" सुधटले, तोड उघडल तर थोबाड फोडीन ह, सागून ठेवतो—"

सुधान तोंड आवरल. गजूला डोळे मिचकावले गजू गोंधळला. उवरठ्यात आत–बाहेर करू लागला. मग त्याच्यातल्या ' थोर 'पणान त्याला आत लोटल. आवाजावरून कल्पिलेल्या बाळच्या ठाण्याकडे तो चालू लागला

मोडक्या पेटीला पाठ लावून नि गुडघ्यात मुडक खुपसून बाळ अंधारातच बसला होता. त्याला टेकत गजून अशा वेळी आपा विचारतात त्या आवाजात विचारल,

" का रे, काय झाल ? "

फार वेळान बाळ तणतणला,

" सारे शिक्षक पार्शल आहेत साले ! "

" अरे, पण झाल तरी काय ? "

" मला नापास केल साल्यानी, दुसर काय करणार आणखी ! "

" नापास ? "

' हो ना रे ! "

" किती मार्कांनी रे ? "

" मला काय विचारतोस—बघ त्या प्रोग्रेसकार्डात. साल्यानी आणखी चाळीस मार्क दिले असते तर त्याच्या बापाच काय जाणार होत ? "

" अरे, पण तुला मार्क्सच तितके पडले असतील "

" नाहींतर ! "

चवताळलेल्या बोक्यासारखा गजूकडे बघत बाळ म्हणाला,

" फक्त आम्हा तिघा–चौघानाच मार्क्स देताना साले कजुष झाले "

" कोण, कोण रे ? "

त्याच्या सेक्शनमध्यें नापास झालेल्याचीं नाव बाळन घेतलीत. गजू त्याच्या

सेक्शनमध्यें नसून त्याला किंचित् हायस वाटल. म्हणाला,

" अरे, पण त्यानी अभ्यास नसेल केला "

" तर ? "

परत तणतणत गजू म्हणाला,

" दोन-दोन ट्यूशन्स असलेली मुल अभ्यास कशी करतील ? म्हणे, अभ्यास नाहीं—"

" इतराच जाऊ दे रे ! "

दोन्ही हेतूनी गजू म्हणाला,

" तू किती अभ्यास केला ते आठवत काय तुला ? जेव्हा बघाव तेव्हा कपड्याना इस्तरी कर, बुटाना पॉलीश कर "

" तरी मी वारवार म्हणत असेच-बाळ अभ्यासाकडे लक्ष दे रे-बाळ, अभ्यासाकडे लक्ष दे रे—"

" राहू दे-राहू दे म्हटल तर राग येईल "

पण बाळ म्हणालाच,

" तू तरी सतत अभ्यास कुठ करीत होतास रे ? मग साग बर कमा पास झाला तर ? "

गजूच्या जिवात-जीव आला. इकडे बाळच भुणभुणन सुरूच होत,

" मी म्हणतो ना, सारे साले पार्शल असतात ! "

" तस नसत रे बाळ—"

" काही एक सागू नको ! तू वारवार पेठेसराकडे जातो, त्याचा हा परिणाम आहे, दुसर काहीं नाही.—"

" कोण म्हणत रे ? "

" नापास झालेली सारीच मुल म्हणतात "

" म्हणून तूहि म्हणतोस, नाहीं रे ? "

गजूला सताप अनावर झाला. पण मोठ्या सयमान त्यान तो गिळला. त्यासाठी त्याला एक तर स्वतःच्या मोठेपणाची नि दुसरी बाळच्या दुःखाची जाणीव ठेवावी लागली त्यामुळ त्यान बाळची समजूतच काढण्याचा प्रयत्न केला नापास झालेलीहि माणस मोठेपणीं कशी थोर ,होतात हें अनेक पुढाऱ्याच्या नावावरून पटवून देता देता मा. सा. कन्नमवार फार थोडे शिकले असून ते वारले तेव्हा

किती मोठ्या हुद्यावर होते, हेहि सागून टाकल तरीहि बाळची तणतण थाबेना तेव्हा त्यान त्याचा नाद सोडला वऱ्हाड्यात आला. त्याचीच वाट बघत असलेली सुधा विचारू लागली,

"काय रे दादा आता तरी घेतील काय मला गव्हर्नमेन्ट – गर्ल्स हायस्कूलमध्ये ?"

"त्याच शाळेवाचून काय अडल आहे ?"

"आप्पा म्हणाले होते परवाला की फी भरण्याची माझी ऐपत नाही. तेव्हा चौथी झाल्यावर मीं शाळा सोडावी . पण सुशीला टेबे म्हणे कीं गव्हर्नमेंट – गर्ल्स हायस्कूलमध्ये फी नाहीं म्हणून .."

"बघू —"

म्हणत असतानाच केशवन लीलाच्या पास होण्याबद्दलचे गजूला पेढे खाण्याच्या निमित्तान आपल्या घरातून हाक मारली. नकळत गजूहि तिकडे वळला. कारण एक तर त्याला स्वतःच कौतुक करवून घ्यायच होत. कशापोटी का असेना या बाबतीत केशव फार उदार होता. निदान गजूच्या तरी दृष्टीन दुसर केशवचे त्याच्याबाबतचे अंदाज आपण खोटे ठरवून दाखवलेत हे त्याला केशवला दाखवायच होत. तिसर, या यशान उफाळलेल्या त्याच्या सर्व उमेदी केशवकडून ओवाळून कुरवाळून घ्यायच्या होत्या. गजू दारात घुसला त्यावेळी केशवदेखील हव्या त्या सामुग्रीनिशी सज्ज होता. गजूला पाहताच तो मोठ्यान म्हणाला,

"अभिनदन हो गजाभाऊ, अभिनदन !"

गजू तिथ टेकीपर्यंत त्यान त्याच्या हातावर पेढेहि ठेवले. तोडात टाकण्यापूर्वी गजू म्हणाला,

"हे कशाबद्दल हो ?"

"अहो, आमची लीला पण पास झालीय् तुमच्याबरोबर"

पेढ्यादाखल गजू बोलला,

"अस काय ! आता कोणत्या वर्गात गेली ?"

"सातव्या"

"छान"

"अहो, छान म्हणून काय म्हणताय, मध्यें दोनदा कलडली नसती तर

आता व्हावीत असती ते जाऊ द्या! तुम्हीं पेढे कधीं देणार ते सांगा आधीं "

" मी — "

" काहीं हरकत नाहीं. तुमचे सुद्धा पेढे मीच देतो अग लीला, आण बर तो मधाचा डबा — "

लीलान एक पितळी डबा तिथ आणला. तो साधारणतः चार पायल्याचा होता त्यातहि हलवून हलवून गच्च बसवलेले पिवळे, पांढरे अन् केशरी रंगाचे पेढे गळ्यापर्यंत भरले होते. डबा पाहताच आपण तो उगाच इथ आणवत असल्याच केशवला खटकल. त्यान लीलाकडे रोखून पाहिल त्याचीच बहीण ती. लगेच ओंजळभर पेढे भावाच्या हातात टाकून ती डब्यासह आत गली. तोंडात टाकताच गजूला त्या पेढ्याचा आंबूस वास जाणवला. तसे ते वाळवून ठेवलेले असल्यान चावताना खडीमाखरेसारखे वाजूहि लागले.

तोच आपल बोलण दुहेरी अर्थान पुढ रेटत केशव म्हणाला,

" तुम्हीं विचारल नाहीं मला, तुमचेसुद्धा पेढे मींच का दिले ते? "

" सांगा ना "

" अहो, तुमच पास होण म्हणजे एक नवल आहे."

" अस्स!"

" स्तुति नाही करीत हं. इकडे दिवसभर काबाडकष्ट, शाळेव्यतिरिक्तच्या वेळी पुस्तकाना हात न लावण आणि तरी देखील मेरिट की काय म्हणतात — त्यान पास होण म्हणजे केवढी अभिमानाची गोष्ट आहे आम्हाला? "

" अं – हो."

" तस म्हणून चालायच नाहीं! या गुणाच सतत चीज व्हायला हव बर गजाभाऊ! त्याची सतत जोपासना व्हायला हवी. म्हणतात ना हिरा दृष्टीस पडताच ओळखला गेला तर ठीक – नाहीं तर परत तो कोळशात नाहींसा होण्याची शक्यता असते, काय कस म्हणतो? "

" हं, खर आहे "

## नऊ

अशात वाड्याच्या दारात वाढत असलेला गलका केशव–गजूच्या आनंदात व्यत्यय आणू लागला. गजू आणि केशवची तोंड थाबलीत. ते गलक्यातले शब्द सावडू लागले. अर्थ जुळेपर्यंत केशवन एकदा गजूला बकाराम बायकोला बडवत असावास सांगून पाहिल. दुसऱ्यादा जमादाराच्या घरातला नवा मुलगा पळू घातल्याची शंका बोलून दाखवली. पण शेवटीं त्यालाहि गलका वेगळाच वाटू लागल्यान तो गजूसह दारात आला. चौकटीवर हात जमवून वाड्याच्या दाराकडे पाहू लागला. त्यावेळी वाड्यातली बहुतेक सारीं बिऱ्हाड त्याच्यासारखींच दाराकडे बघत होती. कुणाकुणाच्या हातात दिवे होते.

म्हटल तर अगदी वाड्याच्या दारात नि म्हटल तर थोड्या अंतरावर बकाराम, त्याची बायको, वॉचमेकर, त्याच्या घरातले काही सोबती, अबकारी अधिकारी, जमादार नि त्याच्याकडला अगदी नवा छोकरा वगैरेच कोंडाळ जमल होत. ते नर्कांचा खडा लोटत नेणाऱ्या किड्यासारख कशातरी भोवतीं वळवळत होत. त्या सर्वांवर कंदील धरलेली बकारामची बायको म्हणत होती,

" त्याहीचे पोर असतीन ना घरी —— "

कुणीतरी उत्तर देत होतीं, " असेल, लहाना — "

" लहाना येऊन काय करन ? "

" मोठाहि आला वाटत—"

" एवढ्या लवकर ? "

" मग त दिसला मले ! "

" तर मग बोलवा त्याला—"

गलक्यातले शब्द जुळवन म्हणण्यापेक्षा ते स्वतःला भिडवत केशवसह गजू गलक्याकडे चालू लागण्याशीं अन् प्रेतामारख्या हलवल्या जाणाऱ्या आप्पाचा कोट ओळखू येण्याशीं एकच गाठ पडली. गजूकडन अर्ध अतर तुडवल जात नाहीं तर गलक्यातून आवाज आला, " आहे, आहे. गजू येत आहे—"

" अरे गजू, तुझे आप्पा पडले रे ! "

" थाबा, बोलू नका एकदम ! "

बोल निघायच्या आत गजू गलक्याशीं टेकला होता. न बोलता गजूच्या तिथल्या स्थानाला बऱ्याचशानी मान दिला. पण काहीं जण आपली जागा सोडायला तयार दिसेनात आप्पाना पडताना आपणच पहिल्यादा पाहिल किंवा धावून त्याना सावरल ह्या भावनेन त्याना तस वाटत असाव. तर काहींजण आप्पाच्या गरजेमुळ तिथन हलेनात

आता गजू सार पाहू शकत होता.

जमादाराच्या नव्या छोकऱ्यान आप्पावर कदील धरून ठेवला होता. काहींची बोल–बडबड आणि सल्लामसलत सुरू होती. त्यावरून गजूला घडलेला प्रकार जसाच्या तसाच कळत होता.

येताना आप्पानी उबरठ्याखाली जो पाय टाकला होता तो तिथूनच उबरठ्याखाली गुप्त होणाऱ्या मोरीच्या तोडावर पडला होता पाय मोरीच्या तोंडावरल्या फरशीवर पडल्यान ती टोला बसलेल्या विटीसारखी बाजूला उडाली होती नि तिन आप्पाच्या पायासाठी मोरी उघडी करून दिली होती त्यामुळ समोर फेक असलेल पाऊल मोरीन आपल्या आकाराप्रमाण मुरगळून आत घेतल होत. तेहि इतक्या जोरकसपणे की आप्पाच तोंडच माग फिरल होत. शरीर मुरगळता मुरगळताच ते खालीं कोसळले होते. तोडातून शब्द

निघण्याऐवजी शरीर आदळल्याचा आवाज जवळपासच्या दाराना ऐकायला गेला होता. धावून पडलेल्या माणसाना काय झाल ते डोळ्यानीच पहायला मिळाल होत. कारण तोवर आप्पाची वाचा गेली होती.

आता आप्पाना उंबरठ्यातून बाजूला केल गेल होत. उंबरठ्यातल्या दगडान पाडलेल्या खोकीतून कपाळावरल रक्त वाहात होत. त्याचा मोरींतून उपसलेला पाय गुडघ्यापर्यंत गाळान भरला होता. जवळ जवळ तिथपर्यंतचच धोतरहि गाळान ओलचिंब झाल होत. त्यातला गाळ फरशीवर ठिपकत होता. एका वहाणेचा पत्ता नव्हता. चष्म्याची फ्रेम मोडकी-तोडकी होऊन उंबरठ्यावर ठेवल्यासारखी दिसत होती एका भिंगातल्या दोन्ही काचाचा पत्ता नव्हता. दुसऱ्यातल्या जिरोला पण तीन तडा पडल्या होत्या. ह्या सर्व वातावरणाभोवतीं मोरीतले डास घोंगावत होते. ढवळली गेलेली घाण दुर्गंधी सोडीत होती.

पाहता-पाहता वॉचमेकरच्या लक्षात आल. आप्पाच पाऊल भूतासारख उलट दिसत होत कौंगल्याच्या सधिसरशीं तो त्यावर तुटून पडला. काहीं लोकाच्या हरकतींना न जुमानता तो घड्याळ्याच्या चावीसारखा आप्पाच पाऊल पिरगाळू लागला उलटीकडून सुलटीकडे फिरवू लागला. पण ते सहजी दाद देईना तेव्हा त्यान जोर काढला. बायकानी तोंड फिरवण्याइतका इथ पावलाला नमाव लागल. ते खट्टकन् आवाजासरशीं फिरल आवाजानतर त्या पायाचा गुडघ्याखालचा सर्व भाग चारीकडे फिरण्याइतका सैल पडला हे त्यालाच जाणवायला लागल तेव्हा तो झटदिशी आप्पाच्या आठ हात दूर सरकला.

इकडे सल्लामसलत जारी होती. म्हटल तर गजू नि म्हटल तर केशवकडे बघत बकाराम म्हणत होता, " त्याहीले, घरात जा लवकर घेऊन— "

" घरात काय लोणच घालायच आहे काय ? "

अबकारी खात्यातलाच म्हणून तो अधिकारी या भाषत बोलू धजला. पुढ म्हणाला, " सिव्हिल हॉस्पिटलमध्यें चला घेऊन शक्य तितक्या लवकर "

कुणीतरी म्हणाल, " अहो पण तिथ घेत नाहीत ना ? "

" अहो, पण तिथ घेत नाहींत ना ! "

" नाहीं कसं ? चार रुपये रोजाची स्पेशल रूम घ्या बर, मग कसे नाहीं घेत तर मी बघतो ! "

" पण स्पेशल-रूम ह्याना झेपण शक्य आहे काय ? "

" मला म्हटल ? "

केशव भानावर येत म्हणाला, " काय, गजाभाऊ काय म्हणतात ? "

" अ ? "

हें तर गजूलाहि माहीत नव्हत. अस काही विचारल जाईल, याची आधीं कल्पना असती तर तो काही विचार करून ठेवता. पण इतक्या लोकात दारिद्य उघड पाडायच जिवावर येऊन तो म्हणाला,

" पण तिथ त्याची सोय होईल काय ? "

" सागितल ना, चार-सहा रुपये रोजाची रूम— "

" तस नाहीं. मी म्हणतों– त्याची बाकीची सोय कोण पाहील– "

" सागितल ना पैसा म्हणून— "

अबकारी अधिकारी म्हणत होता,

" अहो पैसा असला की नर्कातहि माणसाची फर्स्ट-क्लास व्यवस्था होऊ शकते . हे तर हॉस्पिटल आहे. तुम्ही सेकड-क्लास रूम घ्या की तिथल्या झाडून साऱ्या नर्सेस व डॉक्टर्स तुमच्यापुढ घुटमळत राहतील— येता जाता हाऊ डू यू डू आणि व्हॉट डू यू वान्ट करीत राहतील काहो बाजीराव ? "

अशासाठी किती पैसा हवा असतो, याची निश्चित नसली तरी साधारणतः तरी गजूला कल्पना होती. पण यावेळीं चार दिवसाच खोलीभाडहि देता येण्याइतका पैसा त्याच्याजवळ नव्हता घरात देखील. कारण त्या कुटुंबापाशी घरीं ठेवण्याइतका पैसा कधीच राहात नसे. असे तो सारा आप्पाच्या खिशात. दुसरी रक्कम हाती येईपर्यंत बसभाड्याला पुरण्याइतका ह्या रकमाहि चार-दोन रुपयाच्या आकड्यानी त्याच्याजवळ येत उसनवारीच्या नावें. सर्वांत मोठी रक्कम पगाराच्याच दिवशी येई पण ती जितकी मोठी असे तितक्या लवकर निघूनहि जाई या बाबतीत गजूचा खिसा तर सल्ला द्यायला अगदीच निरुपयोगी होता. अशानच आप्पाचा पगार होणार असल्याची गजूला आठवण झाली. पण ती स्पष्ट होण्यापूर्वी घरखर्चाच्या काळजीन ती उडवून लावली. शिवाय आप्पाच्या गैरहजरीत ब्यूरो त्याला पैसा देईल की नाही, हीहि शका होतीच. या सर्वांमुळ गजूला आपली आब राखण्यासाठीं त्यान पूर्वीं काढली तीच शका आताहि काढीत म्हटल

" मला म्हणायच आहे, आप्पांना तिथ ठेवल तर त्याच्यापाशीं आम्हा-

पैकी कुणाला तरी नेहमीं राहाव लागेल मी तर आता नोकरीवर जात असतो ''

यावर अबकारी अधिकारी किंवा केशवहि बाळला सुटी असल्याच सुचवून गजूला तोड सुचवू शकले असते. पण ते मुद्दाम गप्प होते. निदान केशव तरी. त्यामुळ आपली पाळीं समजून बकाराम बोलला,

" इतक्याशा दुखन्याले कायले पायजे जी एवढा मोठा दवाखाना ? माह्या अडान्याच आयकान त एक सागतो--"

ऐकण्याबद्दल कुणीहि उत्सुक दिसण्यापूर्वीच तो म्हणाला,

" अरडेलात सेदेव मीठ घालून रगडला त दोन दिवसात पाय सारका येते. नाही आला त मले नावाचा बकाराम नोका मनू "

" का हो, वाचमनसाहेब ? "

वॉचमेकरला बकाराम नेहमीच ' वाचमन ' म्हणत असे. पण पुढ ' साहेब ' लावत असल्यान नि वाड्यात त्याला दुसरे कुणीच साहेब म्हणत नसल्यान बकारामवर तो खूष राहात असे. त्या भरात आताहि तो म्हणाला,

" बरोबर आहे. बरोबर आहे-- '

" म्हणून मी म्हणतो-- "

गजूला तेवढच फावल, " सध्या काही दिवस बकारामजीच्या म्हणण्याप्रमाण करून पाहू घरींच उपाय. काय नानासाहेब ? "

" वा ! का नाही. "

एकदम खुलवटून केशव म्हणाला,

" अहो, दवाखाना हे आता अलीकडे निघाले. पूर्वी ते नव्हते तेव्हा काय माणस पडल्या-घसरल्याबरोबर एकदम मरतच होतीं ? "

यामुळ गजूला अनुकूल असलेल्या माणसाना रानटी ठरवून आपल्या मताच्या काहीं बिऱ्हाडकरूसह अबकारी अधिकारी तिथून चालता झाला. तो कदाचित् बहुसंख्याकासमोर आपला अपमान होऊ नये याहि भयान असेल.

ठरल्याप्रमाण आप्पाच जिवत प्रेत त्याच्या घरात आणल गेल. मधल्या खोलीतल्या खाटेवर आडववल गेल. त्यानी मान हलवल्यावर बऱ्याच जणाना समाधान वाटल. आपल काम संपल्याच्या भावनेन त्यातली काहींजण आपा-पल्या घराकडे निघून गेलीत. शेवटपर्यंत राहिलेल्यापैकी बकारामन बाळला

एरंडेल आणायला पाठविल. जोशीबुवा आणि त्याची बायको सुधाला गप्प करण्यात गुतलीत. केशव आणि गजू आप्पाचे कपडे बदलवू लागले धोतर न्हाणीत नेऊन टाकल. कोट-सदरा जागेवर लावण्यासाठी त्यासह गजू खुटाळ्याशी आला. नेहमीप्रमाण कपडे अडकवलेहि. पण परतण्यापूर्वी आप्पाच्या तात्पुरत्या व्यवस्थेसाठी म्हणा अगर शनिवारपर्यंत त्या घराला लागणाऱ्या खर्चासाठीं म्हणा—आप्पाच्या खिशात काही पैसे सापडतात काय हे पाहण्यासाठीं गजून ते चाचपले. पाहता पाहता त्याला एका खिशाचा 'सशय' आला. गजून त्यात कोपरापर्यंत हात खुपसला. हातीं लागलेला ऐवज कागद समजून बाहेर काढला. दिव्याशीं पाहतो, तो खरच ' ऐवज ' होता. आप्पाचा पगार झाला असावा अशी तो पाहून गजूची समजूत होऊ लागली. पण नोटाच्या चळतीची जाडी त्याला आप्पाच्या नेहमीच्या पगारापेक्षा जास्त वाटली. त्यान ती मोजायलाच घेतली तींत दोनशे—दहा रुपये होते. गजू नवलात पडला. भान न राहवून त्यान आप्पांना विचारावयाच ठरवल. पण उच्चाऱ्यातच थबकला

कारण याच वेळी बकाराम उलथण्याच्या दाडीन आप्पाचा दातकडी उलवत होता. फोडलेला पूर्ण कादा केशवन आप्पाच्या नाका—तोंडाशी धरली होता. जोशीबुवा वारा घालत होते. कुणी तरी गजूला वारा सोडायला सागत होत. बाळन सर्वांवर कदील धरून ठेवला होता एका हातान तो डोळे पुसत होता.

हें पहावेना नि नोटानी त्याच्यान सुरू केलेल्या सशयामुळ राहवेहि ना तेव्हा गजू परत माग फिरला. सहज म्हणून आप्पाचे राहिलेले खिसे चाळू लागला. चाळता चाळता सर्वांत बाहेरील खालच्या मोठ्या खिशात त्याला एक पाकीट सापडल. ते तोंडफुट होत मथळा तीनरगी शाईत ' शाम प्रिंटिंग ब्यूरो ' हीं अक्षर लेवून बसला होता. गजून आतला कागद काढला. केशवच्या घरातून त्याच्या घरात डोकावणाऱ्या उजेडावर धरून तो तो वाचू लागला.

" आमचे ब्यूरोतील एक मुद्रण—शोधक श्री. आत्माराम देशकर याना त्यानी ब्यूरोकडून वारवार तोंडी आणि लेखी सूचना मिळूनहि आपल्या कामात ब्यूरोचे समाधान होईल अशी सुधारणा न केल्यामुळे ब्यूरोकडून या नोटीसद्वारे कळविण्यात येते की, आज दि. ३१—४—६४ पासून त्याना कामावरून कमी करण्यात येत आहे. कायद्याप्रमाणं त्याना एक महिन्याची नोटीस द्यावयास हवी असते. पण या एक महिन्यात

त्याच्याकडून काम करवून त्याना देण्यात येणाऱ्या पगारापासून ब्यूरोला कोणताहि फायदा होईल असे वाटत नाहीं. उलट नुकसानच होण्याचा सभव अधिक. त्यामुळे एक महिन्याची आगाऊ नोटीस देण्याऐवजी ब्यूरो त्याना नोटीसच्या महिन्याचा पगार देणे अधिक हितावह समजते. तेव्हा ही नोटीस मिळताच एक तासाचे आत त्यानी आपला सपूर्ण हिशोब अकौटटकडून घेऊन जावा त्यानी तसे न केल्यास हिशोबाची प्रत आणि दोन महिन्याचा पगार पोस्टाद्वारे त्याना उद्या सकाळीं रवाना करण्यात येईल.

" त्याच्यावर ओढवत असलेल्या ह्या सकटाबद्दल ब्यूरोला खेद होत आहे.

" ह्या नोटीसची एक प्रत स्थानिक लेबर ऑफीस आणि दुसरी प्रत प्रेस वर्कर्स युनियनला रजिस्टर–पोस्टाने रवाना झालेली आहे

" कळावे, ही नोटीस— "

आप्पाबद्दलच्या सहानुभूतीन गजूला एकदम उदार केल. घराचा सारा भार स्वतः सोसण्यास तयार झाल्यावर तो दोनशे–वीस रुपये खिशात ठेवू लागला. व्यवस्थित ठेवून होण्याच्या आत मधल्या उबरठ्यात आला. म्हणाला,

" काहो नानासाहेब, सिव्हिल हॉस्पिटलमध्ये स्पेशल खोली घेतली, तर खरोखर आप्पाना प्रवेश मिळेल काय ? "

केशव पापणी न हलवता त्याच्याकडे बघू लागला. तरीहि न राहवणारा गजू दुसऱ्या शब्दात म्हणत होता,

" माझ म्हणण अस . तिथ तज्ज्ञ डॉक्टर्स आहेत म्हणतात त्यामुळ आप्पाना जरा लवकर बर वाटेल. बाळला सुटीच आहे. तो राहात जाईल त्याच्यापाशी. रात्री मी पण राहू शकेन . सुधा घरच करतेच आहे "

"पण पैशाच ? "

" ते मी पाहून घेतो— "

" मग काहीं हरकत नाहीं— "

तोच म्हणाला,

" जारे बाळ, रिक्षा किवा टॅक्सी ये बर घेऊन दारुवाला चौकातून— "

# एक

मोरीत पाय पडल्याच्या रात्री आप्पाना सिव्हिल हॉस्पिटलमध्ये नेण्यात आल होत. अडीच रुपये रोजाने तिसऱ्या वर्गाच्या स्पेशल खोलीत त्याना प्रवेश मिळाला होता. त्यामुळे आणि त्याच्याकडे ये–जा करणाऱ्या चाहत्याच्या चेहऱ्या-पोषाग्वावरून आप्पा देशकर कजुषीमुळ तिसऱ्या वर्गात दाखल झाले नसून ते हाडानच तिसऱ्या वर्गाचें असल्याचा स्टाफन निर्णय घेऊन टाकला होता अशा प्रसगीं ' तो ' जे करीत असे ते आप्पाच्या बाबतींत केल होत. म्हणजे आप्पाची केस ऑनररी डॉक्टर्सवर सोपविली होती

शहरात कुठ तरी खाजगी हॉपिटल्स् चालविणारे हे डॉक्टर्स सिव्हिल हॉस्पि-टलमध्ये आठवड्यातले आपले काहीं तास खर्चीं घालीत असत- खर तर सरकारी साधन आणि तिथले बेवारशी पेशन्टस् याच्या सहाय्यान ते तिथ काम शिकत असत. अशा ऑनररी डॉक्टर्सचा शहरात मानचा मानहि वाढत असे आणि स्वार्थाचा स्वार्थहि साधत असे. अशा डॉक्टराच्या नि शिकाऊ नर्सेसच्या तावडीत आप्पाचा नुकताच निकामी झालेला पाय सिव्हिलच्या

स्टाफन सोपविला होना.

ह्या ऑनररी स्टाफन आप्पावर निरनिराळे प्रयोग सुरू केले होते. अगदीं पहिल्याच दिवशी त्याच्या गुडघ्याखालील सर्व पायाला एक अगडबब प्लॅस्टर बाधल होत. सुरुवातीचा काहीं काळ तेवढयानच पाय ताळ्यावर येतो काय हें पाहण्याचा प्रयत्न चालवला. त्यामुळ अधून मधून ते प्लॅस्टर सोडत असत. उकळून वाढलेल्या बटाट्याच्या रगाचा प्लॅस्टरमधला पायाचा भाग एक्स–रे मशीनपुढ लावत असत. ऑनररी डॉक्टर्सचा ताफा फोटोग्राफर पोझ बघतो, तसा एकाकान मशीनमध्ये बघत असत. बाहेर पडून चर्चा करीत असत. शकाची स्पर्धा चालवत असत शेवटी नर्सला प्लॅस्टरच बाधायला सागत असत. ' पुढ पाहू ' म्हणून निघून जात असत.

पण एकदा त्यापैकी एका डॉक्टरने आप्पाचे ऑपरेशन करावेंच लागेल, असे सर्वांना पटवून दिले पटल्यावर एके दिवशी दोघा–चौघानी मिळून ते कसेबसे तडीसहि नेले. पुन्हा दोन–चार महिन्यानी सोडविलें जाणारे तसलेच अगडबब प्लॅस्टर आप्पाच्या पायाला बाधण्यात आले.

ह्या दरम्यान औषध–पाण्याच्या खर्चानं आप्पा मेटाकुटीस येत होते. कारण त्याना बरीचशी औषध स्वखर्चानं घ्यावी लागत होतीं. त्यामुळ डॉक्टरानी लिहून दिलेल्या औषधाच्या किमतीची ते प्रथम चौकशी करीत. तीहि डॉक्टर्स सागत त्या व्यतिरिक्तच्या मेडिकल–स्टोअर्समध्यें. मग स्वस्त वाटत, तिथली औषध मागवीत. एखाद्यान तीं कुठन मागविलीतशी चौकशी केली की कधी आप्पा डॉक्टरानी सागितलेल्या स्टोअर्सची नाव ठोकून देत. एखाद्यान बिला-बद्दल ' आस्था ' दाखवलीच, तशी आप्पात शका उजळू लागली की, ते गजू वा बाळच नाव दडपून देत तर कधी कधी डॉक्टराच्या सभाव्य रोषाला टाळण्यासाठी ते खऱ्या स्टोअर्सची नाव सागताना डॉक्टरानी सागितलेल दुकान होत बद किंवा तिथ हे औषध नव्हत–असहि सागत.

अस असल तरी औषधाना पैसा हा लागतच असे. तो टाळण्यासाठीं आपण कधी इथन सटकतो याचा ते सदासर्वकाळ विचार करीत असत. गजू आला म्हणजे त्याला बोलून दाखवत असत. आतून त्यालाहि अस वाटत असला तरी तो वरवर उदारता दाखवत असे पण पैशाची खरी किंमत माहीत असलेले. आप्पा म्हणत असत,

" अरे, शे–सव्वाशे रुपये म्हणजे प्रॉपर्टी नव्हे. ते सपल्यावर कुठला खर्च करशील ? म्हणून म्हणतों, झाल तेवढ पुरे ! उरले चार–दोन रुपये– ते वाश्या मडक्याच्या कामी येतील ! . "

यातल्या शेवटल्या वाक्याचा गजूला अर्थ लागत नसे. म्हाताऱ्यानी अस बोलण स्वाभाविक आहे, अस त्याला वाटत असे.

पण जेव्हा खरोखरच आप्पाच्या दोनशेदहा रुपयातले चार–दोनच उरलें तेव्हा गजूहि आप्पाच्या ' याच दुखण्यातून माझा अखेर व्हायचा असेल तर तो मुलाबाळाच्या घोळक्यात होऊ दे ' या वारवार ऐकलेल्या इच्छेशीं सहमत झाला. एके दिवशी आप्पाची नेली तशीच आडवी आकृति घरात कोंबली गेली.

तथापि अलीकडील काहीं दिवसात त्यानाहि जीवनाचा कटाळा आला होता. कारण त्याचे कायमचे ठाण खाटेवर होते. प्लॅस्टरन अगडबब आणि लाकडासारखा निबर पाय त्याच्या ताब्यात नव्हता. सदानकदा तो अथरुणावर सताड ताणलेला असे. त्याच्या दोन्ही बाजूनीं वाळूच्या पिशव्याची अडकण असत. खाली फाटक्या दुलईची चव्हेरी घडी असे. अवघडलेला दुसराहि पाय सरकवतो म्हटल तर दुखऱ्याला कळा पोचत. इतक्या की कधी कधीं आप्पाना आपला नेमका कोणता पाय दुखरा आहे हें विचारानच ठरवाव लागे. दुखऱ्याला हलवायच झाल तर घरातल्या कुणाची मदत घ्यावी लागे. एखादी नाजुक वस्तू हाताळावी तसा परका मनुष्य त्या पायाची उचल–ठेव करी. तरीहि अशा वेळी आप्पाची जीभ दातात दाबली जाई. ध्यानस्थासारखे डोळे मिटले जाई. चेहरा पाच सीसीची सीरिज टोचताना व्हावा तसा होई. ठेवल्या जागीहि तो पाय आप्पाना स्वस्थता लाभू देत नसे उन्हाळ्यामुळहि असेल–नसानसात मुगळे चावल्यासारखा किंवा तेलात उकळू घातल्यासारखा आग–आग ओकत असे. अशा वेळी उघड्या जखमेवर फुकर घालून तिची आग सह्य करता येणं शक्य असते–पण प्लॅस्टरमधल्या या पायावर ते शक्य नसल्याने आप्पाना जशीच्या तशीच.सोसावी लागत असे. यामुळ अपघातात बचावलेला मनुष्य किती दुर्दैवी असतो ते आप्पा अपघाताच्या वेळी झालेल्या त्रासावर तोलून बघत असत.

सर्वांच्या शाळा सुरू झाल्यावर आप्पाना आपल्या दुखऱ्या पायाची चिंता असह्य झाली होती. कारण तोवर या कामात त्याची धाकटीं मुल तरबेज होऊन

त्याना सहाय्य करीत होतीं. तीं शाळेत जायला लागल्यापासून आपल्या पायाच्या उठाठेवीसाठी कुणाचें सहाय्य घ्यावें हीच त्याना मोठी विवचना असे. तरी बर की सुधाची शाळा सकाळची अन् बाळची दुपारची असे त्याचे सारे विधी पहाटेच उठून गजूच्या सहाय्यान उरकवले जात तरीहि दिवसातून काहीं घटका अशा येत की घरात कुणी नसे. असलेल्यापैकीहि कुणी कधी नळावर तर कुणी कधी चक्की किंवा दुकानावर जात असत. एवढ्याशात देखील आप्पा कधी अवघडत असत तर कधी त्याना लघवीच भाड हव असे. अपचनाचा विकार असलेल्या आप्पाना जस वारवार प्यायला पाणी हव असे तस वारवार लघवीही करावीशी वाटत असे. त्यामुळ मुलाच्या गैरहजेरीत त्याना काहीं एक हव नकोस झाल की ते जोशीबुवाच्या घराकडे तोड करून ओरडत असत व्हराड्यात कुणी असल तर आप्पाच्या पाचव्या–सहाव्या हाकेला ओ देत असत. येत असत नि आप्पाच हव–नकोच बघत, करीत असत. पण केशवच हे घर याला लवकरच कटाळून आल होत. आप्पाच्या हाका सुरू झाल्या की कित्येकदा व्हराड्यातल हसण–खिदळण बद होत असे. जोशीबुवा किंवा त्याची बायकोहि कधी शेजारच्या घरात तर कधी आपल्याच मागल्या खोलीत जाऊन बसत असत

बोबल–बोबल करून थकलेले आप्पा गप्प राहात असत. परत व्हराड्यात गप्पा सुरू होण्याचा कानोसा घेत असत पण तो सहसा येत नसे.

एकदा अशा हाकानतर थकलेल्या आप्पानी न राहवून स्वत.च खाटेखालील भाड घेण्याचा प्रयत्न सुरू केला. दुसऱ्या पायाला, त्याच्या कलान सरकवण्याचा प्रयत्न करू लागले. तोहि मानण्यास तयार दिसला. आप्पात धाडस वाढल. ते त्याला गातान खाटेखाली सरकवू लागले गात पोटरीखाली असे तोवर तो लाकडासारखा ताठपणे सरकूहि लागला. गातावर गुडघा येतो न येतो तर मात्र मोडलेल्या शेवग्याच्या शेंगेसारखा जमिनीवर लोमकळला. त्यासरशीं एक हृदय-द्रावक किंचाळी फोडून आप्पा खाटेवर कोसळले. त्याना शुद्धीवर आणण्याच्या निमित्तान त्या दिवशी जो सिधी डॉक्टर त्याच्या घरात शिरला तो अजून बाहेर पडू शकला नाहीं

त्यामुळ आप्पानीं परत अस धाडस करून पाहिल नाहीं. एकदा धरवेचना तेव्हा त्यानीं अथरुणातच लघवी केली होती. छोट्याना हे सागण त्याना

लाजिरवाण वाटत असल्यान मोठा येईपर्यंत त्यानी ओल्या गादीवर पांघरूण टाकल होत. गजू आल्यावर ते काढताना अप्पा म्हणाले होते,

" गज्या गजू, आज मी अंथरुणात लघवी केली रे—ते काढून बाहेर टाकतो काय ?"

गजूला तेहि कराव लागल होत.

तस तर तो आता त्याच सारच करू लागला होता म्हणा यामुळ असेल, अलीअलीकडे आप्पाची झोपसुद्धा नाहींशी झाली होती. रात्ररात्रभर ते जागेच दिसत बघाव तेव्हा चुटक्या आणि जांभयासोबत म्हणत असत,

" नारायणा, आता आटोप रे लवकर नको माझ्यासोबत दुसऱ्याचेहि हाल करूस "

रात्रीबेरात्रीं गजूला हें जाणवल तर तो विचारीत असे,

" अजून झोप नाहीं आली ?"

" नाहीं ना रे !"

" औषध नाहीं दिल काय डॉक्टरानी ?"

" झोपेच्च म्हणतोस ?"

इथ आप्पाचा चेहरा सशयित वाटत असे, पण पुढ पुढ सरावल्यान ते तो निर्विकार ठेवू लागले होते. म्हणत असत,

" काय पडल आहे रे त्या गोळींत "

" काहीं पडल असो अगर नसो. पण आपण डॉक्टरराना पैसे देतों आहोत, तेव्हा त्यानीं दिलेल औषध घ्यायला नको काय ?"

यावर अगदी अलीकडे आप्पा उदासपणे म्हणत असत,

" घेऊ आता एकदमच ईश्वराची आज्ञा झाल्यावर .."

# दोन

प्रेसमधून गजू बाहेर पडला. त्याला लगोलग मारुती–गोकूलची आठवण झाली. गजू मिळवू लागल्यापासून त्यानी त्याच्यामाग पार्टीच जे तुणतुण लावल होत त्याच्या तारा एकेका कारणाचा पीळ बसून अलीअलीकडे खूपच ताणल्या जात होत्या. गजू कपोझिंगच काम शिकल्याचा एक, तो कॉन्ट्रॅक्टन काम करुन पैसे मिळवू लागल्याबद्दलचा एक, परिक्षेत पास झाल्याबद्दलचा एक आणि अगदी अलीकडे पगारी नोकर म्हणून काम करू लागल्याचा एक असे कितीतरी पीळ बसले होते. गजूला काम शिकवण्यात आपलाच मोठा वाटा आहे असाहि त्या जोडीचा रास्त समज नि त्यामुळ गजकडून पार्टी घेण्याचा ती आपला हक्क मानीत होती. म्हणून सोमवारी सकाळपासून शनिवारी पैसा हातीं पडेपर्यंत या ना त्या निमित्तान ती गजूमाग पार्टीच तुणतुण लावत होती. बाबूराव खुर्चीत येऊन बसेपर्यंत आजहि तिन गजूचा पिच्छा पुरवत आणला होता. पण गजूला पैसे मिळण्यापूर्वी बाबूरावकडून पैसा उपटलेली ती जोडी आता प्रेसमधून नाहींशीं झाली होती. पगारी झाल्यापासून त्याच्याकडे आलेल प्रेस बद करण्याच काम करताना या

गोष्टीचा गजूला आनद होत होता.

किल्ल्या बाबूरावाच्या स्वाधीन करीत गजू विचारात पडला मारुती-गोकूलची जोडगोळी हमीद नि बच्चू पैकी नक्की कुणाच्या ठेल्याशी असावी याचा त्याला अदाज येईना. चौकावरल्या कोपऱ्यात असणारे हे दोन ठेले ओलाडल्याखेरीज त्याला आपल्या वाटेन लागण अशक्य होत. शेवटी कलावर भरवसा ठेवून त्यान आपली नेहमीची वाट बदलली. चौकात आला. हमीदचा ठेला होता, त्याच्या समोरल्या रागेतल्या दुकानाना खेटून गजू चालू लागला. छाती धडधडवत नि हमीदच्या ठेल्याभोवतीं बुबुळ गरगरवत.

अशातच ठेल्यापुढल्या बाकावरल्या गोकूलन मारुतीला ढोपरत अन् गजूकडे हात उडवत म्हटल,

" देख बे, देख–मारत्या ! ओ ऽ ऽ देख भडजी भाग रहा..."

" कहा है रे ? बता भला "

अस म्हणेपर्यंतच मारुतीला गजू दिसला वरमलेला गजू होत्या जागीं रेगाळला होता पाहताच मारुती त्याच्यावर धावून पडला नेहमींसारखा एक हात त्याच्या मानगुटावर नि दुसऱ्यात त्याचा हात पकडून मारुती गजूला ठेल्याकडे फरफटू लागला अर्ध्या रस्त्यात भेटलेल्या गोकूलन गजूला दुसऱ्या बाजून – पण मारुतीसारख धरल रस्ता सपवून झाल्यावर त्यानी त्याला ठेल्यापुढ उभ केल. गोकूल म्हणाला,

" बोलो बेट्टा भडजी, कहा भाग रहे थे ? "

" नाहीं रे. मी पळत नव्हतो — "

" चुतिया मत बनाव बोलो, उधर कहा जाना मागता था ? "

" वडिलासाठीं औषध आणायला जात होतो . "

" फिर वही रगबाजी ? और ओभी माबदौलत से ? "

" तुम्हारी कसम. मै औषध लानेकू जा रहा होता — "

" होता नहीं, था बोलो बेटा. और औषध नहीं, दवा बोलो . "

" पण खोट नोको बोलू बा ! "

मारुती म्हणाला,

" खरच तू औशीद . "

" हो. बघ ना. हें बघ डॉक्टर काकानींनीं लिहून दिल आहे "

" का बा, आज नाईट – कलास नाहीं काय ? "

" आहे ना. "

" तो फिर ? "

" आज नव्हतों जात क्लासला "

" क्यो रे ? छोड दिया क्या ? "

" सोडायच नाव नको काढू "

मग थडा होत गजू म्हणाला,

" आज फी भरायची होती –– "

" नखरे नोका करू भडजी ! तुम्ही अशी चाट मारान हे आम्हीं आधीच ओळखून होतों. मून त आज बच्चूच्या ठेल्यावर न जाता इथ उभे आहोत का रे मारत्या ? "

" बरोब्बर आहे. ह, साग भडजी – कोणत्या होटलात चालत त ? "

बोलता बोलता गोकूलन खाद्यावरून वाकून गजूच्या खिशात पाहिल. मारुतीला डोळा घातला तो गजचे खिसे चाचपायला सरसावला तस गजून बलात्काराचा प्रतिकार करणाऱ्या स्त्रीसारखा छातीवर हात ठेवला. कळवळून म्हणालाहि,

" नही भै ! या हप्त्याला तर अजिबात शक्य नाहीं. "

" आता थे काही एक सागू नको –– "

जवळच्या हॉटेलकडे लोटताना गोकूल म्हणाला,

" तुह्यावाल हे रडगारान लय दिवसापासून आयकून रायलो आमी लोक ! का रे मारत्या ? "

" वा, क्या बात कही ना मेरी जान ! जैसी लाखोमे एक भडजी पार्टी देईन मून त आतावरी आफून चहापाण्याच रायलो ! क्यौ ? "

गजू प्राणपणान गयावया करू लागला होता. आपल्या आत्यतिक गरजेच्या निम्मेसुद्धा पैसे बाबूरावानी दिले नसल्याच सागता सागाता जवळचे सात रुपये सुटे धरून दाखवू लागला होता. यावरहि त्या जोडीचा विश्वास बसेना. ब्राह्मण नेहमीं खोट बोलतात या समजाची ती जोडी आपापल्या बाजूचे गजूचे खिसे चाचपू लागली. ते उलटवून झाल्यावर त्याचा गजूवर विश्वास खिळू लागला. खर तर गजून आप्पाची शपथ घेतल्यावर तिन त्याला दयापात्र ठरवून औदार्य दाखवायच ठरवल. एकीकडे आवेश वाया गेल्यान सुन्न पण झाली

दरम्यान त्या जोडीन वेगवेगळ्या परीन पण एक विचार चालवला असावा. कारण गोकूलच्या,

"एक हो सकता रे मारत्या!"

"क्या?"

"आपन दोनो मिलके इसको उधार पैसे दयेंगे!"

वर मारुती लगोलग म्हणाला,

"हो, हें होते रे! पण भडजीच्या मनात खरोखर आपल्याले पार्टी द्याची आहे काय?"

"त्याचा बाप देईन! का रे भडजी?"

धाकानहि असेल, गजू तयार दिसला. नुसता धाक हेच काही त्याच्या औदार्याला कारण नव्हत. त्यानीहि त्याला आतावर तो नाही – नाही करीत असताना चार – दोनदा हॉटेलात नेल होत. अजाणतेपणान का होईना – ह्या जोडीचा सबध तो दुखावू इच्छित नव्हता. तो आज भुकेलासुद्धा होता. सुधाला सकाळी शाळेत जाव लागत असल्यान त्याला अलीकडे रात्रीच्या शिळ्यापाक्याला पोटात लोटून कामावर निघाव लागत असे. तेहि पुरेस असेच अस नाहीं. विटल चिटल तर त्याला ढकलवत नसे घशात. खेरीज आता त्याला क्लासला जायच होत. या सर्वांचा परिपाक तो सोबत्याची तोड मान्य करायला तयार झाला होता. मग सोबत्यानींच पार्टीच्या खर्चाचा आकडा ठरवला प्रत्येकान गजूला दीडदीड रुपया उसना द्यायच ठरताच तीं सारी हॉटेलकडे निघाली.

मारुती – गोकुलच अलीकडे एक हॉटेल नक्की होत आल होत तिथून – तेवढ्यात ते 'नारायणच होटल' म्हणून ओळखल जात आहे. पलीकडल्या परिसराला कदाचित् हें नाव माहीतहि नसाव

'नारायणच होटल' तीस बाय चाळीसच्या एका लाबट – चौकोनी जागेत बसवल होत. माग पाच फुटाची पट्टी सोडून लाकडी फळ्याची उतरड होती. दूधपावडरच्या डब्यावर ती रचली असे. प्रत्येक फळीवर वर्तमानपत्राचे तलकट कागद अथरले होते. त्यावर पदार्थांची उघडीं – बोडकी ताट हारीन माडली होती. त्याना भिडून टेबल – खुर्च्यांचा जुनाट मेष्टान पसारा पडला होता. उतरडीच्या मागल्या भागात चहाची भट्टी होती. तिथच कुठतरी साडपाण्याची मोरी अन् प्याय – वापराच पाणी होत. भट्टी सुरू असली म्हणजे सार होटल

धुरान भरून जात असे. या भितीशींचा मनुष्य त्या भिंतीशींच्याला दिसत नसे. खाणारी माणसं पहाऱ्याखाली विष खाव – तशी एका हातान सतत डोळे पुसत खात असत.

नारायण झिंगराजी धायकुटे ह्या माणसाच्या स्वाधीन त्या होटलातले सारे हक्क दिसत होते टेबल पुसण्यापासून कढईत झारा ढवळण्यापर्यंतची सारी काम एकटाच करीत असे.

नाहीं म्हणायला, बळेच परकरात ठेवलेली एक छोकरी तिथ राहात असे. सहसा ती शाळेव्यतिरिक्तच्या वेळीं तिथ आढळत असेच कधी रिकाम्याशा टेबलाशी कादे कापत असे तर कधी बटाटे सोलत बसत असे. वयान ती फारशी नसली तरी होटलातल्या मालाची सारी रग तिच्या अवयवावर चमकत असे यौवनगर्द आवाजात ती परिचिताशीं हिंदी सिनेमातल्या गोष्टी करीत असे. त्यामुळ शाळेव्यतिरिक्तच्या वेळात ते होटल सण्ण चालत असे. काही गिऱ्हाइक तर एकेका बसणी चार – चारदा चहा मागवत असत. तरी नारायणरावावर त्यान चहा ' कडक ' केला नसल्याचा ठपका आढळत असत.

इथ येण्यात गोकूल – मारुतीच्या जोडीचा एवढाच विरगुळा नसे. देवकी नसली म्हणजे बहुधा गोकूल ताटाच्या थप्पीशीं बस्तान ठोकत असे. तसाच आताहि बसला. त्याच्यानतर बाकीची बसलीत. होटेलभर बघत तो म्हणाला,

" काय नारायणराव, गरम काय आहे ? "

नारायणराव सागू लागला. तें पूर्ण व्हायच्या आत मारुतीन विचारल,

" देवकाबाई नाहीं दिसत आज ? "

" पोरगी ना ? थे गेली तालमीले . "

" तालमीले, कुठ हो ? "

" कामगार कल्यान केद्रात नाटक आहे काय – ना ? "

" हौ रे गोकूल ! साला, अपनेकू कैसा मालूम नहीं रे ? "

" कोणत्या नाटकात काम करते जी देवकाबाई ? "

" बायकाईच्या .."

" थे झाल हो पन थ्या नाटकाच नाव काय ? "

" कोन जाने बाप्पा ! आपल्याले काय समजते .."

" मग देवकाबाई तालमीलेच गेली कायच्याऊन ? "

“ थे तिच तिले माहीत ”

पण लगेच लक्षात आल्यावर तो म्हणाला,

“ तुम्हाले काय पायजे ? ”

“ आना, तीन मिसळ ”

“ पन नगदी आहे ना पैसे ? ”

तोच गोकूलच्या डोळ्यानी वळला,

“ नाही–नाही. आजकाल आफून उधारी अजिबात बद केली आहे, मून मतो. राग नोका मानू ”

बोलता बोलता बशा भरायला तो आत गेला. यावेळी मारुती म्हणत होता,

“ आजकाल उधारी कशी नाहीं बद करान तुम्ही ! तुमची चवड्यावर आहे ना सच्या चलेगा क्या रे भडजी, नाटक देखनेकू ? ”

“ कुठ रे ? ”

“ भोकात ! अबे त लेका आता तुन आईकल नाही काय ? ”

बशा माडताना नारायण म्हणत होता,

“ पन थे नाटक मानसासाठीं नाही काई ! ”

“ कोन मने ? ”

“ देवकीच त सागत होती का फक्त बायकाईसाठी आहे मून. थेई फक्त कामगार लोकाईच्या. ”

“ पन तिथ तुमच्या पोरीच काय काम होत हो ? तिथ त कामगाराईच्याच बायका–पोरीनी नाटक बसवल पायजे ”

“ हो पन थो–त्याच नाव काय ? ”

“ केन्द्राधिकारी ? ”

“ असच काही तरी नाव आहे त्याच थो मने का कामगाराईच्या बायका नाटकात याले सरमते मून देवकीले नेतो अशाच अन्खीन तीन–चार पोरी जमा केल्या त्यान देवकीच्या शाळेतल्या कोनी तरी मिनिस्टर येनार आहे, तवा ह्या नाटकाचा प्रयोग करून दाखवनार आहे मते थो काय त्याच नाव ”

आता डोळे पुसत गोकूल म्हणत होता,

“ काय नारायणराव, मिसळ कोन बनवली ? ”

“ कोन करनार आहे ! म्याच केली. का बा, काय झाल ? ”

" देवकाबाईले नाहीं येत काय—"

" थाब ना बे—"

गोकूल मध्येंच म्हणाला,

" मिसल तो बडी मस्त बनी नारायणराव !"

" थेच मतो—"

" लेकीन थोडासा नमक कम है "

" मीठ ? कोनीच त नाही मनल जी सकाळपासून मीठ कमी आहे मून ?"

" मिसळ ताजी आहे ना ?"

नारायणरावन घाबरून मान हलवली. शिवाय या विषयाशी गोकूलला कर्तव्यहि नव्हत. त्यामुळ तो विश्वासू आवाजात म्हणाला,

" नसेल म्हटल म्हणा. कुणाला कमी लागते कुणाला जास्त लागते."

आता त्यान मारुतीला लाथ हाणत म्हटल,

" क्यौ रे, होना की नही नमक ?"

मारुतीन अर्थातच होकार दिला. तसा नारायणराव आतल्या भागात गेला अंधारात ओणवा पडून खुडबूड करू लागला.

तो खुडबुडीत गुतल्याच गोकूल पदार्थांच्या फटीतून पहात असताच चिवड्याच्या ताटात हात घालू लागला पाहता पाहता तीन मुठा चिवडा सोबत्यासह आपल्या बशीत भरला. मीठ घेतल्यावर परत म्हणाला,

" नारायणराव, कांदा आहे काय ?"

" हो."

" चिरलेला नसेल ?"

मारुती म्हणाला,

" देवकीबाई तालमीले गेली मून, मतो—"

" नसू नसला तर फोडून आना—"

परत नारायणराव आत खुडबुडायला लागल्यावर गोकूलन पापडीच्या ताटात हात घातला.

हे पाहून गजूच्या अंगाला थरकाप सुटला होता. तो गोकूलच्या हातापासून वाटेन चालणाऱ्यापर्यंतच्या सर्वांकडे घाबऱ्या घाबऱ्या बघत होता.

## तीन

गजू टेबलाशीं येताच बाबूरावानी ड्रॉव्हरमध्ये हात खुपसला. आतली बोट चाळवताना ते जप करावा तसे पुटपुटू लागले. अशा तऱ्हेन बराच वेळ ड्रॉव्हरमध्यें थाबलेल्या हातान शेवटी दोन-दोनच्या दोन अन् एकची एक नोट बाहेर काढली उदारपणे गजूकडे ही रक्कम फेकताना ते म्हणाले,

"ह, कर सही।"

गज नोटाच्या चिटोऱ्याकडे बघत राहिला. हलेहि ना तेव्हा सराईत बाबूराव परत घाईन म्हणाले,

"चल, घे. आटोप लवकर. मला जायचं आहे."

"पण एवढेच?"

"मग किती हवेत तर? लाख-दोन लाख?"

"तस नाही—"

टेबलाच्या काठाशीं बोट चाळवत गजू म्हणाला,

"मला तीसेक रुपये तरी हवे होते"

" अरे हो ! आल लक्षात. पण आणायचेत कुठून ? पैशाचीं कुठ झाड असतात काय ? "

" तस नाही हो ! "

आता चिडूनहि असेल, गजू म्हणाला,

" माझेच निघतात, तुमच्याकडे—"

" मग, मी काय पळून चाल्लोय कीं काय ? "

" नाही–नाही तस कोण म्हणत पण मला गरज आहे आप्पासाहेब आजारी असल्यान सार घर माझ्यावर आहे "

" ते झाल रे बुवा ! "

अशा प्रसगी बाबूराव वापरीत तो सूर नि तेच शब्द वापरीत आताहि म्हणाले,

" पण मी आणू तरी कुठून पैसे ? तुला माहीत आहे ना की सारा दिवस मीं पैशासाठी या दारचा त्या दारी फिरलो म्हणून ? पण नाही दिले कुणी त्याला मी तरी काय करू ? "

गजू खाली मान घालून परत टेबलाशी बोट चाळवू लागला. इतर कसदार कामगारामारख त्याला बाबूरावाशी बोलण जमत नव्हत त्यामुळ बाबूराव व्याख्यात्याचा आव आणून म्हणत होते,

" दूर कशाला मला एक साग तू जर माझ्या जागेवर आणि मीं तुझ्या जागेवर असतो. समज, माझ्यासारखी तुझी आणि तुझ्यासारखी माझी परिस्थिती असती तर तू काय केल असतस ?

" बोलना ?

" बर, आता नको सागू ! उद्या–परवा साग. विचार कर वाटल्यास कुणाला तरी विचार नि मग साग पण आता हे एवढे पैसे जा घेऊन

" चल, आटोप लवकर ! "

आणि ते तेच पैसे गजूकडे सरकवू लागले. त्याच्या ऐवजी बाबूरावाकडे बघत गजू कळवळून सागू लागला,

" एवढ्यान माझ काहींच होत नाहीं, बाबूराव. बारा रुपये तर मला क्लासचे द्यायचे आहेत. नाहींतर ते मला क्लासमध्यें बसू द्यायचे नाहींत. शिवाय घरखर्च बेगळा तेव्हा मला कमींत कमी पचवीस तरी रुपये द्या—"

" आणि बाकीच्याना काहींच देऊ नको— "

बाबूरावानी त्याच्याकडे त्वेषान बघायला नजर उचलली. कारण गजूचा क्लास त्याना सलत असे. कामगारानी फक्त कामगारच राहाव अस त्याचं मत होत. त्याचा क्लास बद करण त्याच्या स्वाधीन असत तर कदाचित् तो 'सुरूच' झाला नसता. आताहि त्याच्यापाशीं देण्याइतके पैसे असते तरी क्लासच नाव ऐकून त्यानी दिलेच नसते. त्यामुळ आता भुवया अखडून म्हणत होते,

" असच की नाहीं ? "

" तस नाही म्हणत मीं— "

" मग काय तर ? अरे, माणसान माणुसकीच्या दृष्टीन विचार करायला हवा नेहमीं आता तूच साग बर, क्लासची फी महत्त्वाची की पोराबाळाच्या पोटात अन्न घालण महत्त्वाचं ? तुला फीसाठीं पैसे देऊन बाकीच्याची मुलबाळं उपाशी ठेवू काय ? "

बाबूरावाच हे बोलण निलाजर वाटून असेल किवा शिक्षणाविषयीच्या त्याच्या भावना ते अकारण दुखवत असल्यान असेल – गजू किंचित्सा सूर ताणत म्हणाला,

" अहो, मी काही तुम्हाला कर्जाऊ मागत नाही. माझेच मागतोय् ना ! "

" हे बघ, बुवा ! तू सतत अशी जिकीर करीत राहशील, तर आपल्याला नाहीं पटणार. सागून ठेवतो— "

पैशाबद्दल जिकीर करूं लागणाऱ्या प्रत्येक गरजू कामगाराला तो हातघाईवर आल्याच पाहून अशी सदिग्ध धमकी देण्याचा बाबूरावाचा रिवाजच होता. तिन कामगार नमतोसं दिसल नाहीं तर ते लगेच पुढ म्हणत,

" आम्ही काहीं आजवर कुणाचा पैसा बुडवला नाहीं. तस असत तर आमच्या प्रेसचाहि शाम प्रिंटिंग ब्यूरो झाला असता. एवढ्या उपर तू तुझा विचार करून बोल, म्हणजे झाल— "

गजू खरोखरच नमला. भिक्षा मागताना बोलाव तसा बोलला,

" तुम्हाला म्हणून खर सागतो बाबूराव, माझ एवढ्यात अजिबात निभत नाहीं "

यावरला उपाय म्हणून बाबूरावानी त्याच्याकडे खाऊ की गिळू अशा नजरेन पाहिल. अनुभवाप्रमाण अशा नजरेला कोणताहि नवशिक्या मनुष्य दबकत

असे. हातात पडलेली रक्कम घेऊन टेबलपासून लाब होत असे. पण गजूच्या गरजेन त्याला तिथच खिळवून धरल. नजर सोसवेना तेव्हा बाबूरावाकडे पाहण्याऐवजीं तो खाली पाहू लागला. बोटाची हालचाल वाढवली

विचार केला केला नि बाबूरावानी अशा झटक्यान ड्राव्हर ओढला की गजूला वाटल रागाच्या भरात ते आता सर्व रक्कम आपल्या अंगावर फेकणार पण बाबूरावाचा राग इतका मूर्ख कधींच होत नसे. त्यानी जेमतेम दोन रुपयाची आणखी एक नोट बाहेर काढली सारी रक्कम चुकवतोशा आवेशात पूर्वीच्या नोटावर टाकली. त्याच झटक्यात म्हणाले,

" ह, आतां तरी झाल ना तुझ्या मनाच ? कर सही लवकर "

तरीहि गजूच्यान हात लाववला नाहीं. तो मनाशीं कसलीशी जुळवाजुळव करीत होता. पण बाबूराव ओरडण्याच्या धाकान ती सपण्यापूर्वी पुटपुटला,

" निदान अस तरी करा-- "

यापूर्वीच भिकाऱ्याला हलवावा तसा बाबूरावाचा तळवा हलू लागला. तो न थाबवता ते म्हणाले,

" यापेक्षा तुला एक कवडी अधिक मिळणार नाही. हेहि हवे असतील तर घे, नाहीं तर राहू दे बोल, हवे कीं ठेवू ड्राव्हरमध्ये ? "

गजून नोटाकडे हात नेला त्या उचलल्या. खालवर करू लागला. यावेळी त्याचा भार टेबलाला रेलला होता. तो जाईच ना, पण नोटा उचलल्या म्हणून आता बाबूराव विचारू लागले,

" का रे, तुला सर्व पैशाची आजच गरज आहे काय ? "

" हो. म्हणून तर-- "

" साग बर, ह्या सर्वाच तू काय करणार आहे आजच्या आज ? "

हे गजूला आताच्या आता सागण शक्य नव्हत तो गप्प होता बाबूराव म्हणत होते,

" सर्व आठवड्याची कमाई एकाच दिवशीं खर्च करणारा तूच एक कामगार दिसतो बुवा मला दुसरा तर कुणी नाहीं दिसला आजवर "

" तस नाही. उद्या रविवार आहे.. बाजाराचा दिवस आहे ! "

" तर ! आपल गाव म्हणजे एखादं लहानसं खेडच तर आहे – मग बाजाराचा दिवस सपल्यावर काय खरेदी करता येत असच ना ? "

गजून बुकात सही केल्याची खात्री झाल्यावर ते आणखी प्रेमळपणान म्हणाले,

"अरे, गरजेपुरत्या वस्तू घ्याव्यात माणसान आधीं घेऊन, बाकीच्या जसजसा पैसा मिळत जाईल तसतशा आणीत राहाव्यात ..काय, पटल कीं नाही ?"

याहि मऊपणाचा गजून फायदा उपटण्याचा प्रयत्न केला,

"बाकीचे पैसे सोमवारीं द्याल काय ?"

"अ हो बघू जमल तर. पण मला आठवण दे ह "

"हो देईन—"

गजू म्हणालाच,

"पण मागल्या खेपीं कुणाला तरी तुम्ही म्हणाले होते की, पळून चाललो काय म्हणून मी—"

"मागल सोड आता. माणसान नेहमीं पुढला विचार करावा. सोमवारीं नाही, तर मगळवारीं मगळवारीं नाहीं तर—"

तशातच चालता चालता गजू थबकल्याच जाणवून ते म्हणाले,

"जा – जा ! का रे, कोण राहिलं रे पैसे घ्यायच अजून सीताराम, चल लवकर. मला जायच आहे..."

सीताराम टेबलाशीं ठेपल्यान गजूला तिथून हलावच लागल.



# चार

आता आप्पा देशकर नेहमीसारखे खाटेवर बसून होते. सकाळची शाळा आटोपून घरी आलेल्या सुधान घरातली हीं–तीं काम उरकत आणली होतीं. बाळ दिवेलागणीस घरात घुसताच आप्पानी त्याला म्हटल होत,

" बाळ तू पाणी भर रे ! "

यावर तो म्हणाला होता,

" मला अभ्यास करायचा आहे. "

" ते झाल रे ही अभ्यासाची वेळ नाहीं. आधी घरातली काम करा दोघ मिळून. गजू येईल आता. तोवर सैपाक व्हायला नको काय ? "

अशावर बाळला आप्पासोबत गजूचाहि राग येत असे. अलीकडे आपल्या वाट्याला गजूपेक्षा खूप काम येतात, अशी–त्याची कधी कधी तर उघड तक्रार असे. यावर आप्पा त्याला समजावत असत त्याच्या भाषेत गजू नि त्याच्यातला तफावत त्याला जाणवून देण्याचा प्रयत्न करीत असत तरीहि तो म्हणत असे,

" यामुळच तर आमच्यावर इन्सल्टची पाळी येते, आप्पासाहेब "

एकदा यावर आप्पानी विचारल होत,

" कशी रे, बाबा ? "

" नाहीं तर काय ! घरातल्या कामामुळ अभ्यास होत नाहीं मग नापास झाल्यावर तिकडून "

" नापास होण्याची हीं कारण नसतात रे, बाबा ! शिक्षण दैवात असायला हव असत म्हणजे उकिरड्यावरला माणूस सिहासनावर जाऊन बसू शकतो दूर कशाला, गजूच नाहीं बघत ? कुठ केला त्यान अभ्यास रात्रदिवस ? पण झालाच न पास ? "

बाळला हे जिव्हारी लागल होत. तेव्हापासून आपल्या स्वाभाविक बोलण्यान भावाभावात तेढ शिरू नये म्हणून ते जीभ साभाळून बोलत असत म्हणत असत,

" तिकडून गजू आता थकून–भागून घरी येईल. त्याला वेळीच खाय-प्यायला मिळायला नको काय ? शिवाय तो आता मिळवता आहे. तुमची सारी भिस्त त्याच्यावर अवलबून आहे. तुमच्या बऱ्यासाठीच त्याला तुम्ही आता पुढ–पुढ करायला हव खूष ठेवायला हव. माझ काय, मी आज आहे–उद्या नाही. तेव्हा तुम्हाला वारवार कोण सागत जाईल हे ? .. "

बाळला हे कितपत कळत असे, देव जाणे. पण आप्पाच लाबच–लाब सुरू राहात असे खर तर अलीकडे त्याच्या डोक्यात कुजून त्याना हैराण करणारे हे विचार त्याना कुणातरीपाशी बोलून दाखवावेसे वाटत असत; या–ना त्या निमित्तान बाहेर पडत असत. ऐकवत नसे तेव्हा म्हणा किवा अलीकडे आपल्या सर्व कामाची त्याला सवय होत आल्यान म्हणा–तरीपण तावातावानच बाळ आपल्या कामाला लागत असे. हातापायाची आदळआपट करीत तो कधीं बादल्या तर कधीं आणखी काही घेऊन नळाकडे किवा दुसरीकडे कुठतरी निघून जात असे ही तणतण पाहून आप्पा खाटेवरल्या खाटेवर पुटपुटत असत,

" या पोराच माझ्या पश्चात् कस्स होईल कोण जाणे ! ईश्वरा, तूच आहेस बाबा ! "

आज गजूच्या आठवणीन ते आता सुधाला विचारीत होते,

" का ग मुली, तुझ कुठवर आलय ? "

" कशाचं ?"

" अग, स्वयपाकाच्च आणखी कशाच ."

" भात शिजतोय "

" होय ना "

अशातच कधीं तरी गजू घरात शिरला. एवढ्यात कधीं येत नव्हता तितक्या लवकर तो आज घरी आला होता. आल्यासरशीं उभ्या-उभ्या कोपऱ्यात वहाणा फेकत होता. फणफणत आतल्या आप्पाकडे बघत होता. आप्पानाहि या सर्वांची चाहूल बसल्या जागीं जाणवत होती न्हाणींतून तो पाय धुऊन आप्पाच्या खाटेशी येईपर्यंत त्याना त्याला अदाजता आल नाही तो खाटेशीं टेकला नि नेहमी प्रमाण आप्पाच्या प्रकृतीची वास्तपुस्त न करता कधी आढ्या-कडे तर कधी जमिनीकडे पाहू लागला. लाब उष्ण उसासे टाकू-घेऊ लागला. प्रेसमधल्या नलल्या तरी क्लासमधल्या, त्याच्या आवडीच्या विषयावरहि तो बोलेना. तेव्हा आप्पाची त्याच्याकडे पाहण्याची हिंमतच होईनाशी झाली.

शेवटीं बोलण आपल्यालाच्च सुरू कराव लागणार या विचारान त्याना तो उपाशी असल्यान असा वागत असावा अशी भुरळ घातली तरीहि ते मागल्या दाराकडे तोंड करून म्हणाले,

" का ग, सुधा-कुठवर आल आहे ?"

" डाळ शिजतेय अजून "

सुधाचा या वेळचा खरेपणा त्याना आवडला नाही. पण गजूच्या धाकान ते तिच्यावर ओरडू शकले नाही. अलीकडे सर्वस्वी त्याच्यावर अवलबून असल्या-पासून ते त्याला फार भीत असत. त्याला तर सोडाच, पण त्याच्या हजेरीत घरातल्या कुणावरहि ओरडण, चिडण टाळत असत. आता शक्य तितक्या शातपणान सुधालाच्च म्हणाले,

" स्वयपाकाला वेळ असेल, तर गजूसाठीं चहा तरी ठेव "

" का ऽऽ ही नको चहा वगैरे !"

मोठ्या धाडसान ते म्हणाले,

" का ऽ रे ?"

" मी घेतलाय "

" घेतलाय, कुठ रे ?"

" हॉटेलात. आणखी कुठ घेणार ? "

न राहवून आप्पाच्या तोंडून निघाल,

" अस्स "

पण गजूला ही धमकी वाटली आप्पाच्या डोळ्यात रोखून बघत तो म्हणाला,

" का, घेऊ नये काय ? "

" अ तस नाहीं . "

" मग कस तर ? "

" तस काहीं नाहीं— "

आप्पाना बोलण भाग पडल,

आतावर तुला एखादे वेळीं भूक लागली तर तू खात असे काही तरी .पण चहा घेत नसे म्हणून–म्हणतो—"

" अज्जून तुम्ही मला बच्चाच समजता काय ? "

' बच्चा–बच्चा ! ' आप्पा ओठात पुटपुटू लागले. त्याच्या दृष्टीन त्याच्या घरात घुसणारा हा शब्द नवा कोरा होता. पण त्याची अर्थफोड करण्याबद्दल गजूशी त्याना बोलवलं नाहीं. थोडावेळ तसाच गेल्यावर त्यानीं धाडस केल,

" आज क्लास नाहीं काय ? "

" का, मेले काय सारे विद्यार्थी ? "

" तस नाही रे !—

कस बोलाव ते न कळून सरळ आप्पा म्हणाले,

" तू गेला नाहींस म्हणून म्हणतो— "

" पण जाऊ कसा ? "

आणि उत्तरासाठीं खोळबून तो आप्पाच्या तोंडाकडे पाहू लागला. त्याला नेमक काय विचारायचय्, म्हणायचय् याची आप्पाना चागलीच कल्पना होती. पण ती तोंडातून निघताच गजू भडकेल म्हणून ते बोलायच टाळत होते. म्हणून काही गजू थाबला नाही,

" मी क्लासला तोंड दाखवू कसा ?

" का, फी नाही भरली अजून ? "

" कुठन भरू ? "

ह तर आप्पानाहि माहीत नव्हत त्यान तेच विचारल्यावर म्हणाले,

" बाबूरावानी दिले नाही वाटते पैसे ? "

" त्या-त्या — "

गजू आवेश गिळण्यासाठी एकदम थाबला. कारण त्याच्या तोंडीं पुढ ' मादरचोद ' हा सणसणीत शब्द होता. बाबूरावाच्या गैरहजेरीत सारे कामगार त्याना ह्याच नावान सबोधित असत. विशेषत हप्त्याच्या दिवशीं तोड न दाखविणाऱ्या बाबूरावाना हे नाव जास्त बहाल होत असे. हे घरी तरी वापरण्याइतका गजू अजून जरढावला नसावा. कदाचित् आप्पाचे नि बाबूरावाचे सबध घनिष्ठ असल्यान आप्पा दुखावतील म्हणूनहि त्यान जीभ आवरली असावी. इतक असून त्याच्याच्यान आता आवेश गिळवला नाहीं.

" त्या गाढवाचा पत्ता तरी आहे प्रेसमध्यें ? "

" गाढव, कोण रे ? "

" तोच, बाबूरावाचा बच्चा ! "

" बाबूरावाना म्हणतोस ? "

" मग भीति पडली की काय त्याच्या बापाची ? "

" अस म्हणू नये रे—"

भवितव्याच्या काळजीन आप्पा म्हणाले,

" किती झाल तरी ते आपले "

" असेल ! मालक असला म्हणून खातो की काय कामगाराना ? आणि एवढीच लाज आहे तर त्यान कामगाराचे पैसे कशाला ठेवावेत ? काय आम्ही त्याना अगावर पैसे मागतो ? की पैसे देऊन तो आमच्यावर उपकार करतोय ? "

" तसं नाही रे ? "

आप्पा आणखीच सर्दगर्द आवाजात पुटपुटले,

" जिथ आपल्याला पोट भराव लागत, तिथल्या मालकाला अस तोंड टाकून बोलण बर नव्हे ! "

" अहो आप्पासाहेब, मनुष्य नोकरी करतो ती कशासाठीं ? मी तुम्हालाच विचारतो, कशासाठीं मनुष्य नोकरी करतो ?

" आपल्या गरजेमुळच ना ? मग त्याची गरज भागली नाही तर असल्या नोकरीचा काय उपयोग ? सागा बर तुम्हीच ? "

आप्पानी चमकून पाहिल न राहवून म्हणाले,

" म्हणजे, सोडूनबिडून आलास की काय नोकरी ? "

" सोडून ! "

खेदाच्या सुरात तो म्हणाला,

" पण तो आज आलाच कुठ प्रेसमध्ये तोंड दाखवायला ! नाही तर काढली असती त्याची सारी खाल्लीपिल्ली ! "

" तेच म्हणतो— "

नकळत आप्पाच्या तोंडून समाधान बाहेर पडल. मग ते फारच शांतपणान म्हणाले,

" हे चालायचच रे बाबा, खाजगी नोकऱ्यात हे असच चलायच "

" वा ! वा ! म्हणे चालायच— "

" आम्ही असच आयुष्य कठलय् रे गजू— "

आप्पा सैलशा आवाजात म्हणत होते,

" आम्ही, असच आयुष्य काढलय्— "

" तुम्ही कठल असेल. तुमचा काळ वेगळा होता. आता काळ बदलला आहे आप्पासाहेब. जिसकी मेहनत उसकी दौलतेचा काळ आला आहे या भांडवल-शाहीन खूप पिळवणूक केली आतावर श्रमजीवि वर्गाची. आता नाही चालायच हे. आता आम्हा लोकाचे दिवस येताहेत . "

बोलवल्यावाचून राहवत नसल्यान त्याचा आवेश कमी झाला असावास स्वतःच ठरवून आप्पा म्हणाले,

" का रे, युनियनच्या ऑफीसमध्यें जात असतो काय अधून-मधून ? "

" हो "

पण लक्षात आल्यावर तोच म्हणाला.

" हे तुम्हाला कुणी सागितल ? "

" कुणी नाहीं बुवा ! "

" मग विचारल ते कशावरून ? "

" सहज. "

मुलगा ' मार्गा ' वर आहेस पाहून आप्पाना आनंदच झाला होता. पण ज्या नशेमुळ तो ' मार्गा ' वर होता तिची गुगी चढवीत ते उगाच म्हणाले,

" ज्याच्यापुढ काहीं ध्ये आहेत–अयशा, तुझ्यासारख्या माणसान यूनियन-बिनियनच्या भानगडीपासून शक्य तितक लाब राहाण बर, असं आपल–माझ मत आहे . "

" अशान आता निभेल, असं नाहीं वाटत आप्पासाहेब ! "

" अरे, पण आमच कस निभल ? "

" कोण म्हणत तुमच निभल म्हणून ? "

अशा सुरवातीन आप्पाच कस निभल नाहीं ते गजून त्याच्या आत्तापर्यंतच्या अवस्थेच उदाहरण घेऊन त्याना पटवून दिल–आवेशानिशी देऊ लागला तरीहि, स्वतःच्या विवचनेमुळहि असाव, समजावता सूर कायम ठेवून आप्पा म्हणाले,

" खासगी नोकऱ्यात हें अटळ आहे खासगी नोकऱ्या करणाऱ्याचा जगात अजून वाली निर्माण झाला नाहीं. उदाहरणच द्यायच झाल तर आणीबाणीच्या परिस्थितीच देता येईल. ईमर्जन्सीच्या नावें सरकारन सारीकडले कर वाढविले कुठ कुठ नवीन बसवलेत. सरकारच हें धोरण वाहती गगा समजून व्यापाऱ्यानीहि तीत अप्रत्यक्ष–प्रत्यक्ष हात धुवून घेण्याचा प्रयत्न चालवला आहे. यामुळ प्रत्येक कुटुबाचा शभरामाग वीस–तीस रुपयानी खर्च वाढलेला आहे. सरकारी नोकर महागाईच्या नाव ओरड करतील म्हणून सरकारन त्याच्याहि महागाई भत्त्यात पधरा ते तीस रुपयापर्यंत वाढ केली आहे कुठ कुठ मूळ पगारातहि वाढ करीत आहे आपल सरकार. पण खासगी नोकराचा पगार जोचा तोच आहे. फारच गरजेच्या माणसान मालकापाशी बोंब ठोकली तर एखादा मालक मेहेरनजर होऊन त्याच्या पगारात शभरामाग पाच–दोन रुपयाचं पासग टाकतो. बस, एवढच तेहि फार क्वचिताच्या बाबतीत. बाकीच्याना मात्र घर चालवता–चालवता नको प्राण होत जाऊ दे–

" म्हणून म्हणतो, खासगी नोकरींत माणसान–"

" मलाहि तेंच म्हणायच आहे, आप्पासाहेब–मलासुद्धा तेच म्हणायच आहे–"

सोबत्या–शेजाऱ्याच्या सहवासान असल आपण सार घर चालवतो ह्या अभिमानान असेल अथवा आयुष्यात पहिल्यादा दाढीचीं खुपट नुकतींच ओरबाडल्यामुळ आपण मोठे झालो ह्या जाणिवेन असेल किंवा ज्यामुळ तो

चिडला त्या बाबीला आणखी तीव्र करून आप्पापुढ माडायची असल्यान असेल—आता गजू म्हणाला.

" खासगी नोकऱ्या कशा असतात त मला माहीत आहे. नानासाहेबानीहि या सबधी मला माग सागितल होत. आता तर मीं स्वतः बघत आहे म्हणून अशा नोकऱ्यात माझ आयुष्य जाऊ नये असा मी परत निश्चय केला आहे. खर तर हा माझा पूर्वीचाच निश्चय आहे. त्यासाठीच मी हीं काबाडकष्ट उपसायला कसाबसा तयार झालों आहे पण एवढहि करून, जें व्हायच तेच होत नसेल, तर हीं काबाडकष्ट उपसायची कशाला हेंच मला कळत नाहीं—"

आप्पा घाबरलेच. तरीहि इथ अबोल राहून निभेल अस त्याना वाटेना. मोठ्याच नेटान ते म्हणाले,

" पण ही नोकरी तुझ्या ध्येयात कुठ आड आली आहे ? "

" मग काय तर ! वळेवर पैसे मिळत नाहीं, याचा अर्थ काय ? "

तोच म्हणाला,

" आज तीन महिन्याची फी साचली आहे माझ्यावर क्लासची. एक हेड-सर सोडले तर बाकीचे सारे माझ्याकडे उपेक्षेन बघतात. अभ्यास समजावून सागायला का–कू करतात. शब्दाचे अर्थ किंवा स्पेलिंग विचारले तर डिक्शनरीत पहायला सागतात. अशा वेळीं किती अपमान होतो वर्गात याची तुम्हाला कल्पना आहे ? आणि हा सारा कुणामुळ—तर ह्या बाबूरावमुळ ?

" माझेच पैसे असून मी हा अपमान का सोसावा वारवार ? सागा बर तुम्हीच ? तरी बर, की मी काहीं त्याना अंगावर मागत नाहीं. म्हणून म्हणतो, आपला पैसा वेळेवर मिळून आपल्या गरजा जी नोगरी भागवू शकत नाहीं—ती करण्यात अर्थच काय आहे ? "

या सवालान आप्पा हकपकच झाले. केवळ गजूच्या भरवशावर आपल्या विस्कळीत ससारासाठीं त्यानीं ज्या अपेक्षाची जमवाजमव सुरू केली होती. त्या सर्व गजूच्या संतापाच्या पुरात वाहून जातील कीं काय अशी त्याना शका आली. तीपोटीं गजू उपाशी असल्यान असा बोलत असावासा त्यानी तात्पुरता समज करुन घेतला. कारण निरोगी तरुणाला भूक धरवत नाही असा त्याचा अनुभव होता. अशा वेळीं शात राहण्याच त्यानीं ठरवल. ते सार मुकाट्यान ऐकून घेऊ लागले

# पाच

पण गजूच्या सतापाच उपास हेच कारण नाही, हे आप्पाना तो जेवणानतरहि शात होण्याची लक्षण दिसेनात तेव्हा कळल.

यावर म्हटल तर तात्कालिक नि म्हटल तर ( स्वत:सबधीच्या ) दीर्घकालीन उपायासाठी आप्पा विचारात पडले. तस पाहिल्यास आप्पाचा इलाज तयार होता. पाय मोडल्यानतर शुद्धीवर आल्यापासून ते हा इलाज करण्याची सधीच बघत होते. पण गजूशी बोलण्याची हिमत नसल्यान आजच उद्यावर टाकत होते. बाबूरावानी पैसे न दिल्यामुळ गजू जेव्हा जेव्हा चिडला, चळफळला होता–तेव्हा तेव्हा त्याचा 'इलाज' अगदी तोडावर येऊन गेला होता आता जेव्हा गजू बाबूराव आणि त्याच्या नोकरीबाबत बोलण थाबवेना तेव्हा भाग्याच्या क्षणी फुलवावा तसा चेहरा फुलवत आप्पा म्हणाले,

"यावर एक उपाय आहे रे गजू . पण तो तुला पटतो की नाहीं–ते मात्र सागवत नाही "

"कोणता ?"

" . "

" सागा ना ? "

" करशील काय, ते साग ? "

" माझ्या सोयीचा असला तर मी करीन. "

" तुझ्या सोयीचा "

आप्पा विचारात पडले. कारण शाम प्रिंटिंग ब्यूरोत स्वतः दिलेल्या ' मुला-खती ' पासून तों आप्पाना नोटीस मिळेपर्यंत ब्यूरोबद्दल गजूची मत सतत वाईट होत आली असल्याचं आप्पाच्या एकाएकी लक्षात आल. जराभर विचार केल्यानतर त्याना एक सुचल की, शिक्षणाच्या नावान गजू काहींहि करायला तयार होऊ शकेल ती गुगी चढवली की तो ब्यूरोबद्दलची सारीं वाईट मत विसरू शकेल. या आशेन ते म्हणाले,

" पण मला वाटते, होऊ शकेल "

" पण काय, ते तर सागाल ? "

" शाम प्रिंटिंग ब्यूरोंत नोकरी धरशील तर बर होईल ! "

" शाम-प्रिंटिंग–ब्यूरोत ? ज्यानी तुम्हाला "

" तरीहि— "

आप्पा धाडसावले,

" आपल्या शहरात खर तर तोच एक प्रेस असा आहे की ज्याला खऱ्या अर्थान ' प्रेस ' म्हणता येईल— "

" ते झाल मींहि ऐकत असतो. पण ज्यानी तुम्हाला "

" हो. त्यानीच म्हणून मला इतके दिवस निभावून घेतल होत. नोकरींतून काढल, तेंहि कस सनदशीर मार्गान या जागी दुसरा कुणी असता तर कोण-ताहि मुलाहिजा न ठेवता केव्हाच घरीं बसवल असत त्यान मला— "

जीव अडकलेल्या गोष्टीसंबधी बोलाव तसे आप्पा शाम प्रिंटिंग ब्यूरोबद्दल बोलत होते,

" बाबासाहेबाची कारकीर्द सुरू होण्यापूर्वीं देखील तिथ माणसाना पैशाच्या बाबतींत कधीं म्हणून त्रास होत नसे. ज्याना साप्ताहिक पेमेंटची गरज असे त्याना सात–पधरा–बावीस व एकला न चुकता पैसे मिळत असत महिन्यानी पगार घेणाऱ्याना एक तारखेला सुटी असली, तर तीस–एकतीसलाच पगार मिळत असे. हल्लीं तर त्याहिपेक्षा प्रॉम्प्ट कारभार झाला आहे सर्वच

बाबतीत— ”

शाम प्रिंटिंग ब्यूरोच्या ह्या व्यवस्थेबद्दल शहरातल्या सर्व कामगाराना माहीत होत. त्यामुळ तिथ नोकरी मिळावीस कित्येकाना मनापासून वाटत असे. काहीं तिथल्या नोकरीची स्वप्न बघत असत विशेषत: आपापल्या प्रेसमधला पैशा-बाबतचा अनियमितपणा पाहून शाम प्रिंटिंग ब्यूरोतल्या कामगाराना भाग्यवान ठरवत असत. सोबत्याच्या बोलण्यावरून गजूलाहि अलीअलीकडे तिथल्या नोकरीचा विचार स्पर्श करीत होता. पण आप्पाना नोटीस मिळाल्यानतर त्यान स्वत:ला म्हणण्यापेक्षा, ब्यूरोला आपल्या बाबतींत नालायक ठरवत आणल होत पण आता आप्पाच्या वाखाणणीमुळ असेल वा स्वत:च्या गरजेपोटी असेल त्यान ब्यूरोला आपल्याकरता लायक ठरवत आणल. म्हणाला,

“ तिथ मला नोकरी मिळेल काय ? ”

“ तुझी इच्छा असल्यास करू आपण खटपट. ”

“ कोण, तुम्ही ? ”

तिथल्या आप्पाच्या पतीवर गजूला अविश्वास वाटून तो म्हणून गेला. नतर सावध होऊन गप्प राहिला. सार पारखत आप्पा म्हणाले,

“ माझी तिथ पत नाहीं अस वाटत की काय तुला ? ”

“ तस नाहीं— ”

“ काय तस नाही ? अरे, किती झाल तरी मी तिथला जुना माणूस तुला चिटकवण्याइतकीहि तिथ माझी ओळख नसेल ? शिवाय बाबासाहेबाच मत काय तुला माहीत आहे काय ? सागू नको कुणाला. त्याना आपल्यातली माणस पुढ आणायचीं आहेत या धद्यात ते म्हणतात, आपल्या लोकानी आता पूजापाती सोडून वेगवेगळे धदे स्वीकारले पाहिजेत.. त्याशिवाय ह्या बहुजन-समाजापुढ गुदारा लागायचा नाही ”

“ बाबासाहेब अस म्हणतात ? ”

गजू कोणत्या अर्थान म्हणाला ते न कळून आप्पा जोषात म्हणाले,

“ हो, हो. बाबासाहेब का ? ”

“ नाहीं, ते परदेशातून आले आहे म्हणून म्हणतो ! ”

“ अरे, म्हणून काय माणूस आपली जात विसरत असतो रे ? हा षौक कुणी करावा, माहीत आहे ? एवढहि नाहीं समजत ! अरे, खालच्या जातीनी.

ज्याना आपली जात सागायला लाज वाटत असते–त्यानी ”

गजू बोलला नाहीं–तेव्हा तो अनुकूल होत असल्याच्या समजान आप्पानी ठामपणे विचारल, “ चल, बोल मग–आहे काय तुझी तयारी ? ”

“ पण तिथ तीन–तीन पाळ्या असतात ना ? ”

“ मग काय बिघडल त्यात ? ”

“ शिवाय प्रत्येक पाळीवाल्याची ठराविक दिवशीं पाळीहि बदलत असते म्हणतात ? ”

“ अरे, हो. म्हणून काय झाल ? ”

गजूला न समजून आप्पा आनद दाखवत म्हणाले,

“ मी तर म्हणतो, एका दृष्टीन ते फार चागल आहे. त्याच त्या वेळी कामावर जायचा माणसाला कटाळा येत असतो. त्यामुळ अशा वेळा अनायासेच बदलत राहिल्या कामावर जाण्याच्या, तर ते चागल की वाईट ? ”

“ तें सगळ खर हो— ”

आता गज सरळ–सरळ म्हणाला, “ पण माझ्या क्लासच कस होईल ? ”

हा विचारच आप्पाच्या डोक्यात नव्हता. नाहींतर ते पाळ्याबद्दल इतक बोलून बसलेन सते.

जराभरात त्याना यातहि मार्ग दिसू लागला ससाराची व्यवस्था लावण्याची संधि दिसत असल्याच्या उमेदीन त्याचा चेहरा उजळला. ते म्हणाले,

“ हे बघ, मनात आणल तर आपल्याला यावरहि तोड काढता येईल . ”

“ ती कशी काय बुवा ? ”

“ तूं हव्या त्याच पाळीला कामावर जायच. मग तर झाल ना ? ”

“ नेहमींसाठीं ? ”

“ अर्थात्च. ”

“ पण बाबासाहेब हें कस मान्य करतील ? ”

“ करतील. माझ्याकरिता म्हणून ते तुला ही सवलत देतील. ”

“ मला नाहीं वाटत— ”

“ साहजिक आहे ! ”

आप्पा थाबले. नेमक्या कोणत्या भयामुळ गजू हें बोलतो आहे, ते काढून घेण्यासाठीं म्हणाले, “ कशारून नाहीं वाटत तुला ? ”

" माग नाही काय ? इटरव्ह्यूवच्या वेळींच तर मी ह्याच कारणामुळं नाकारला गेलों होतों—— "

" तेवढ्यावरून तू त्या माणसाची पारख करू नकोस. तसं पाहिल्यास त्या माणसासारखा चागला माणूस नाही दिसला मला एवढ्या हयातींत. सागितल तर खोट वाटेल तुला आता मी डोळ्याच ऑपरेशन करायला तयार झालो असतो तर बाबासाहेब स्वतःच्या खिशातून मला अडीच हजार रुपये देणार होते. पण मींच ऑपरेशन नाकारल म्हणून राहिल. वाटेल कुणाला हे खर ? "

याच्या पुष्टयर्थ आप्पानी गजूकडून त्याना माग मिळालेली वॉर्निंग-नोटीस मागवली तीत असलेल एक वाक्य दाखवल. शाम प्रिटिंग ब्यूरो त्याच्या डोळ्याच्या उपचारार्थ कर्ज द्यावयास कसा तयार आहे, हा त्या वाक्याचा अर्थ होता. आप्पा एवढ्यावरच थाबले नाही. बाबासाहेब ब्राम्हणाचे कसे चाहते आहे ते सागायला सुरुवात केली.

या सर्वांमुळच असेल अस नाहीं—तर आप्पावर विसबून किवा स्वत च्या गरजेमुळहि असेल. आता गजू म्हणाला,

" अस असेल, तर मग बघा खटपट करून "

" खरच ? "

" हो हो. काम करून पैसे न देणाऱ्या ह्या बाबूरावकडे काम करण्यापेक्षा—"

" मीहि तेच म्हणतो— "

" पण माझ्या क्लासमध्यें काही अडथळा तर नाही येणार ना ? "

" अजिबात नाही—— "

पण ते लगेच म्हणाले,

" बाबासाहेब हा माणूस कसा ते मी तुला सागितलच आहे. एकदा का त्या गृहस्थाची तुझ्यावर नजर वळली तर तुझ दैवच उघडल म्हणून समज. तुला तर माहीत आहेच, तो माणूस चागला इग्लड-रिटर्न आहे. "

अशासारख्या आप्पाच्या सर्व बोलण्यातून बाबासाहेब खूपच शिकलेले आहेत नि त्याना कुणाच्याहि शिक्षणाविषयी आस्था आणि अभिमान असेल एवढाच गजून अर्थ काढला. त्याच्याबद्दल पूर्वग्रह विसरून नव्यान समज करायला सुरुवात केली.

# सहा

बहुधा आठवड्यातून तीनदा, नाहीच जमल तर दोनदा किंवा एकदा तर निश्चित सिनेमा पाहणाऱ्या गोकूल मारुतीच्या जोडीन आज प्रेसमध्ये आल्यापासून गजूभोवतीं सिनेमाचा धोशा लावला होता. राहून–राहून आळीपाळीन ते पालुपद आठवत होते,

" फिर, क्या बिचार है ? "

गजू बोलला नाहीं की पहिल्याला डोळा घालून दुसरा गजूला डिवचत होता,

" जाऊ देना बे, कोणत्या मानसासग गोष्टी करून राहयला तू ? दुगण धुवून कढी करनारे हे लोक असते. त्याहीची काय मजाल आहे सिनेमासाठी दोन–दोन रुपये खर्च कराची ! "

सोसवेना तेव्हा यावर एकदा गजू म्हणाला होता,

" वैसी बात नाही यार. माझी परिस्थिति कशी आहे ती तुम्हा लोकाना तर माहीतच आहे. "

" सोडबे, या बकावतींत काय पडल आहे. "

" अरे भडजी—"

सोबत्याला साथ करीत मारुती म्हणाला होता,

" तू काय समजत का आमी लोक घरचे मोठे रहीस लागून गेलो आहे ? अबे, इन्सानको दिल होना. फिर सारी बाते बराबर होती है—"

" दिलका सवाल नहीं यार. आम्हीं लोक यावेळीं फार कठीण परिस्थितींत आहोत. तुम्हाला खर वाटणार नाहीं – सागितल तर सध्या आमच सार घर माझ्या एकटयावर चालल आहे नुसत घरच असत तर काही जड गेल नसत तेवढ पण त्यात आजारपण आहे. डॉक्टर काकानीलाच पाच–पाच रुपये हप्ता द्यावा लागतो माझ्या क्लासचा खर्च वेगळा. त्यात हा मादरचोदच्या बच्चा वक्तावर पैसे देत नाहीं ."

आपल कुणी ऐकत की नाहीं ते पाहण्यासाठी गजू थाबतो न थाबतो तर गोकूलला डोळा घालीत मारुती म्हणाला,

" बोल, बोल थाबला कायले ? सागन काय सागाच थे आपल्या बाप्पाच्या इमानान ."

" जा, तुमको सब झुठा लगता !"

आणि आपण कायमच गप्प होत आहोंत, अस गजून भासवल. तोवर डावीकडून आवाज आला,

" का रे, तुला म्हटल तर राग येईन, नाहीं रे ?"

पण तो आवाज थाबला नाहींच,

" अरे, आता तू आमच्या बरोबरीच कमावू लागला आहे. सार घर तूच चालवत, अस तुह म्हनन आहे. तस आहे त मग मले साग बर रे का जगात असा कोनता बाप आहे का ज्याच पोरग सार घर चालवत असताना थो आपल्या पोराले हप्त्याकाठी चार–दोन रुपये खर्चाले देनार नाहीं ?"

" तस नाही रे. मी खर्च केलेत तर आप्पा काहीं म्हणणार नाहींत पण घरात खर्चायलाच पैसा पुरत नाहीं – तेव्हा मी तरी काय करू आणि ते तरी काय करतील .."

" वा–वा–वा ! तू काय करशील ना !"

थट्टेवारी सार उडवल्यावर मारुती म्हणाला,

" कारे, तुले काय वाटते – आमच्या घरात सार काहीं आमच्या पगारान

होत असन ?

" तस नाहीं—"

अजूनहि शिल्लक असलेला गजूतला ब्राम्हण बोलला,

" तुम्हा लोकाची गोष्ट वेगळी असते तुमच्या घरातली बहुतेक सारीं माणस कामावर जात असतात—"

" मग तुमच्या घरातल्या लोकाना कोणी मनाई केली रे ? "

नकळत चिडून मारुती म्हणाला,

" तुह्या भावाले काय झाल कुठं नोकरी कराले ! कर बर मना एखाद्या होटलात नोकरी, आता तर खाऊन-पेऊ वीस-पचवीस रुपये मयना भेटते, का रे गोकूल ? "

आता गोकूल म्हणत होता,

" अन्खीन कोन-कोन आहे रे तुझ्या घरात, भडजी ? "

" बहीण आहे . "

" किती वर्षांची आहे रे ? "

गजू भाबडेपणान उत्तरला,

" असेल, अकरा-साडे-अकरा वर्षांची "

" फिर तो बिलकूल नाकाम है "

हे गजूच्या लक्षातून चुकवण्यासाठी तोच परत म्हणाला,

" माह्य मनन, थे जरा मोठी असती तर एखाद्या साहेबाकडे तिलेहि धा-पधरा रुपये मयना मिळाला असता खाऊन-पेऊन--"

" हे सार तुमच्या लोकात चालते रे--"

गजूतला ब्राम्हण कायम होता,

" आम्हा लोकात नाहीं चालत अस काहीं--"

" कस चालन ! तुम्ही मंजे मोठ्ठे रहिसाचे बेटेच लागून गेले आहे ! लेका-ईचा धदा भडभुजाचा आन् मिजास पाहाव त बात्शाची ! "

" जाने दे बे मारत्या ! "

प्रकरण चिघळूं नये म्हणून गोकूलन वेळींच तोंड घातल. मारुती नि तो आळीपाळीन नेहमींच अस करीत असत एकमेकाच्या बचावासाठी. याच कारणान गजू त्याच्यात मुरत चालला होता. आता मारुतीला आवरल्यावर

गोकूल म्हणत होता,

" भडजी, तुहया सर्व गोष्टी खऱ्या. पण आपल्याले एक नाही पटत. दुनियात असा एकहि बाप नाहीं का थो आपल्या कमावत्या पोराला चार–दोन रुपये खर्च कराले मनाई करन ."

" जाऊ दे ना रे ! आपल्याला काय करा लागते ! फालतुचा मस्की कायले करून रायला त्याले ? नाहींतर काय ! "

पण तोच म्हणाला,

" आफून आपल्यासाठीं थोडेच मागतो पैसे ? त्याच्याचसाठीच सागतो. एवढा थो कमावता असून त्याले हातखर्चाले चार–दोन रुपये देत नाहीं – थो काय त्याचा बाप मनाव् ? मले नाही वाटत, का आपा भडजीचा सख्खा बाप असन मून ! "

" हातखर्चाच एक राहू द्या. पन भडजीचे कपडे पाहाना. काय वार आहे रे, हे कुडत्याच कापड ? आन् हा पायजमा दक्षिणेत मिळाला का कोणत्या मुरद्याच्या आगावरून चोरून आनला रे ? याच्यापेक्षा आमच्या घरचे पोतेरे चागले आहे, लेका ! समजला भडजी ? "

एवढ्यानहि त्याच समाधान झाल नसाव,

" नही तो हमारे कपडे देख ! पाच रुपये वीस पैसे मीटरचा कपडा आहे मनिल्याचा ! हप्त्यातून दोनदा टिनोपालची धुलाई करतो. समजला रे ? "

तोच थुकल्यासारख करीत म्हणाला,

" धुत्तुह्या तर ! काय लेका, एवढा मानसासारखा मानूस असून असा गयबान्यासारखा राह्यत ! तुह्यसग राहाची लाज वाटते, आम्हाले ! आजसे मत आया कर हमारे साथ घुमनेको—"

नाहीं – म्हटल तरी ह्या बोलण्याचा गजूवर परिणाम झाला होता. त्यामुळ असेल वा तावात येऊन असेल गज म्हणाला होता,

" आज बाबूरावन पूर्ण हप्ता दिला तर जाऊ आपण सिनेमाला "

त्याच्या दैवान म्हणा वा दुर्दैवान म्हणा आज खुषीत असलेल्या बाबूरावानीं त्याला पूर्ण हप्ता दिला होता. त्यामुळ ठरल्याप्रमाण गोकूलन त्या सर्वांना नारायणच्या होटलात नेऊन थोड्या पैशात खूप खाऊ घातले होत. आजच्या कार्यक्रमातला आपला वाटा खर्च केला होता. सिनेमाच्या मधल्या वेळीं अन्

तो सुटल्यावर लागणारा चहा–पानाचा खर्च मारुती करणार होता. त्या बद-ल्यात सर्वांची तिकीट गजूला काढायची होती.

होटलबाहेर पडता–पडता देवकीला पाहून मारुतीला आठवण झाली. पण तो नारायणराव झिंगराजीकडे पाहून म्हणाला,

" काय नारायणराव, चालता काय सिनेमा पाहाले ? "

" आन होटल ? "

" मारा ताला "

" नाही रे, आज इक्रीचा दिवस आहे .."

" आहे ? आता कुठ दिवस आहे हो, नारायणराव ? "

तो देवकीकडे बघत म्हणाला,

" आता तर रात होत आली आहे बोला मग ? "

" तिकीट कोन काहाडनार आहे रे ? "

" मी–मी "

" माह्या एकट्याचच्च काहाडसीन ? "

" मग कोन येनार आहे अन्खीन ? "

मारुती देवकीकडे बघत म्हणाला,

" सागा ना ? "

" पोरगी नाही येईन ? "

" हो ओ, देवके ? "

" तो फिर ? "

ती बहुधा हिंदींत बोलत असे,

" अब्बा, अकेलें आयेगे क्या ? "

" त मग चालन तुही—"

" तिकिट कौनसा निकालेगा ? "

" तू बोलेगी वही "

" मै निचे नही बैठुगा "

ती म्हणाली,

" मै कभी निचे नही बैठती . "

" तू कशी बसशीन—"

पण मारुती सावरला,

" तो बैठना कहा भी – तेरेको कोन नहीं बोलता ? "

" वही बोल्ती. "

सोलते बटाटे झाकझूक करीत ती म्हणाली,

" और सिनेमा कौनचा चलते ? "

" अब, तेरेहि दिलसे लेने पडेगा बोल ? "

" पन तुन कोनता ठरवला ? "

" कारे भडजी ? "

" म म "

कसाबसा गजू बोलला,

" मोलकरीण ठरवला होता ना आपण ? "

" मी मराठी सिनेमा नाहीं पाहात ? "

देवकी बेत सैल सोडत म्हणाली,

" जाव तुम— "

" पन तुले कोनता आवडते ? "

" सागितल ना हिंदी मून— "

" मग जाऊ एक दिल सौ अपसानेले— "

" तो पायला आहे म्या— "

" आज और कल ? "

" थोई पायला आहे म्या–– "

" सोल्वा साल ? "

" थो तर जुना आहे— "

पण काय वाटल कुणास माहीत ती पुढ म्हणाली,

" पन म्या पायला नव्हता. जाऊ लेकाले थोच. "

ती भराभर आवरासावर करू लागली. तसा कानाशीं लागून गजू मारुतीला विचारत होता,

" का रे, याचा खर्च कोण करणार ? "

" तुझ्या भरवशावर आहो कायबे आम्ही ? "

थोबाडात बसल्यासारखा गजू गप्प राहिला. पुन्हा अपमान होऊ नये

म्हणून सोबत्यासोबत मुकाट्यान चालत राहिला.

पण त्या रात्रीं त्याला पैशासाठीं खिशात हातच घालावा लागला नाहीं. देवकीच्या नशेत गुग असलेल्या मारुतीनच सारा खर्च केला. थोड्या वेळापूर्वीं मिळालेल्या रकमेतली बहुतेक सारी रक्कम तळव्यावरल्या धुळीसारखी उधळून लावली.

' सोलवॉ साल ' सुरू झाल्यापासून सपेपर्यंत गुंग-सुन्न असलेला गजू ' तो ' संपल्याच गोकूलकडून कळवल गेल्यावर भानावर आला. गर्दीच्या लोटासोबत थिएटरबाहेर फेकला गेला.

देवकीला पोंचवायला म्हणून ठरवलेल्या दोन रिक्षात बाकीची सारीं बसलीत.

बसन जाव कीं रिक्षान हें अजून निश्चित न झालेला गजू पायींच चालत होता.

# सात

क्लास वगैरे आटोपून साधारणतः आठ साडे-आठच्या सुमारास घरी येणाऱ्या गजूची आप्पा आज पाच वाजल्यापासून प्रतीक्षा करीत होते यात ते इतके गढले होते की, त्याना आपल्या लाकडासारख्या पायाच भान राहिल नव्हत. त्याची उठाठेव करण्या–करवण्याच ते विसरले होते. वाड्याचा उबरठा वाजला की गजू आला असावास त्यानीं वारवार वाटवून घेतल होत. असे त्यानी पाच–सहा तास घालवत आणले होते. नवानतर मात्र त्याच्या आनदाला चिंतेची कीड लागून तो पोखरायला सुरुवात केली होती. पाय धड असते तर ते सुहास–छापखान्याकडेहि जाऊन आले असते, इतके आता व्यथित, गजूसाठी सचित झाले होते.

साडे-अकरा-पावणे-बाराच्या दरम्यान गजू कसा का होईना, वाड्यात घुसला.

आप्पाना सिव्हिल हॉस्पिटलमधून घरी आणून टाकल्यानतरच्या चार–सहा दिवसानतर गजू नि केशवची भेट नव्हती. भर उन्हाळ्यात लग्नसराईमुळ केशव आपल्या धद्यात गुतला होता. जेवायच भान न ठेवता इस गावका

तीस गाव अन् ह्या लग्नानतर ते–असं केशवचं मतन सुरू होत. चार–सहा पाणी पडल्यावर तो अधून मधून घरात दिसायला लागला होता तरी आपण शाळा सोडली असल्याची लाजिरवाणी बातमी सागण्याचा प्रसग ओढवू नये म्हणून गजू त्याला टाळत आला होता. स्वतःच्या तळमळीमुळ केशवच्या अदाजाना स्फुरू देण गजूला कमीपणाच वाटत होत. केशवच्या धाकान तो रविवारीहि कामगार कल्याण केद्रात दुपारचा वेळ घालवत असे. मिळतील तीं पुस्तक, नियतकालिक किंवा अभ्यासाची पुस्तक वाचत बसत असे हे सार करताना त्याच्यात आणखी एक विचार येत असे की आपण दहावी पास करूनच केशवला आश्चयचकित कराव. तोवर उगाच तोंड दाखवून त्याच्याकडून हिरमोड करून घेत राहू नये. आप्पा लगडे झाल्यापासून गजूच्या घराला मुद्दाम तोंड दाखविण केशवन बद केल होत. पैशाअडक्याच्या भयान तो धूर्त माणूस हे पार पाडू शकला होता त्याच्या थोड्याच दिवसान त्याच्या घरातल्या इतरानीहि गजूच्या घराशीं अबोला असल्यासारखी वागणूक सुरू केली होती. ह्याची कल्पना येण्यापूर्वी बोलत त्या बाळ–सुधाशीं लीलादेखील तुसडेपणान बोलत असे. कळू लागल्यावर गजूला हें सार हवस वाटत होत. स्वतःतल्या ह्या भयान म्हणा वा कैफान म्हणा येता–जाता गजू त्या घराकडे बघण टाळत असे. दार ओलाडताना तो मोरीच्या पलीकडून चालत असे.

पण आताच्या विचारानी गजूला केशवच्या दाराशीं चालण भाग पाडल. तसा तो दारात येताच रेंगाळूहि लागला. यावेळीं कदिलात डायरी चाळणाऱ्या केशवन डोळे वासले. तेव्हा गजू आपल्याकडे येतो आहे, अशा पक्क्या समजान म्हणा वा त्याच्याशी नजरानजर झाल्यान म्हणा वा त्याच्याकडे कुणीहि नि कधीहि येऊन ठेपत असल्यान म्हणा–तो विचारता झाला,

"कोण आहे ?"

"मी, गजू—"

गजू थाबलाच. त्यामुळ केशवहि त्याच्याकरता वापरीत असे तो अघळपघळ सूर वापरीत म्हणाला,

"अरे व्वा ! बऱ्याच दिवसात दिसता आता कुठन येता आहात ?"

क्लासच नाव सागावस गजूला वाटल. पण वेळकाळान त्याला काबूत ठेवल. केशवन ये न म्हणताहि तो पायरी चढला. त्यामुळ केशवन त्याला आत घेतल.

पण विचारीत होता,

" जेवण व्हायच असेल अजून, नाहीं ? "

" हो. "

" मग उशीर कशाला करता ? "

" जेवू-त्यात काय मोठस ! "

आत घुसत गजू म्हणाला,

" यदा सीझन कसा गेला तुमचा ? "

" नेहमींसारखाच. का ? "

" सहज. घरात कोण-कोण आहे ? "

" सारींच. का ? "

" झोपलीत वाटत ? "

" काहीं झोपली असतील. काहीं झोपत असतील .. "

" लीलाहि ? "

" हो. का ? "

" अभ्यास वगैरे नाहीं करीत ? "

" आताच आटोपला. "

" तेच म्हणतो . सहामाहींत ती, कलडली म्हणतात खर काय ? "

" हो. मी नव्हतोना घरीं ! कार्टी अभ्यास नव्हती करीत. तुम्हाला कुणी सागितल ? "

" सुधा म्हणत होती आमची. "

तोच म्हणाला,

" तिन अस करायला नको होत . नाहीं-नाहीं, माझ्या म्हणण्याचा अर्थ, तुम्हाला शिक्षणाची एवढी ओढ-एवढा अभिमान असताना तिन शिक्षणात मन घालायला नको काय ? "

" आता मी बघतोंयू ती कशी अभ्यास करीत नाहीं ते मला वेळ आहे—"

आपल्या बोलण्याचा सशय येऊ नये म्हणून केशवन प्रथम अस उत्तर दिल्यावर मग तो गजूला गळात घेऊ लागला,

" मुलीनीं थोडथोड अभ्यासात दुर्लक्ष केल तर काहीं बिघडत नाहीं. जिच्यापाशीं रूप आहे, तिचं तर अजिबातच काहीं वाकडे होत नाहीं-याचा

अर्थ मी तिच्याकडे दुर्लक्षच करीन असा नाहीं बर

" पण मुलाच मात्र शिक्षणावाचून चालत नाही. ज्याच्या पाठीशी अजिबात पैशाच बळ नाहीं, त्याला तर मुळीच चालायच नाही केवळ घरातल्या चार-चौघानी स्वतःच्या स्वार्थापायी हुशार ठरविलेल्या मुलाला कोणताहि बाप आपली मुलगी देणार नाहीं. मग तो मुलगा त्याच्या कितीहि सबधातला का असेना! अहो, नातेवाईक देत नाहींत अशा मुलाना आपल्या मुली ..मग शेजारपाजाऱ्याचा काय दोष त्यात ?"

गजूला न्याहाळत तो म्हणाला,

" बरोबर आहे ना ?"

गजून मान हलवली. बोलला नाही. त्यामुळ तो पुरता जिरला असा समज वाढवीत केशवन शिक्षणाबद्दलचा आपला नेहमीचा महिमा सुरू ठेवला. तो ऐकवेना म्हणून असेल किवा आणखी कोणत्या कारणामुळ असेल, आता गजू म्हणाला,

" खरोखरच काहो नानासाहेब, कमी शिकलेल्याचीं लग्न जमत नाहींत ?"

" सागतों काय तर—"

यावर केशव परत आपल नेहमींच बोलणार होता. पण गजूच्या रोखान त्याला परत गोंधळात पाडल,

" पण तुम्ही हें आजच का विचारता ?"

" काहीं नाहीं अगदीं सहज म्हणून "

" तेच तर म्हणतो—"

तो आता खर असेल वा खोट असेल, म्हणाला,

" तुमच तस अजून काहीं बिघडल नाहीं. नाईट क्लासमध्यें का होईना, शिक्षण चालू आहे. लग्नाच वयहि व्हायच आहे, आपल्या रिवाजाप्रमाण त्यामुळ तुम्हाला आजच चिता करायच कारण नाही . "

आपल्या कोंडीला गजू दुसऱ्या दिशेन वाट करून देऊ लागला,

" मी तर शिकतों आहेच, पण काहीं कारणानी मला तुमची मदत लागली तर कराल कीं नाहीं ?"

गजूला वाटल यावर केशव नेहमींप्रमाण म्हणेल,

" वा, वा! का नाहीं! अवश्य—"

पण केशव विचारीत होता,

"कोणती हो ?"

"माग तुम्ही करायला तयार होते ती ?"

"माझ्या नाहीं लक्षात आल—"

"ती नाही काय ?"

तरीहि गजू म्हणाला,

"पुढ माग मला घर सोडण्याची पाळी आली तर तुम्ही नव्हते म्हणाले, बाकीच मी पाहून घेईन म्हणून ?"

"ती म्हणताय् ?"

"केशव विचारात पडला. खर तर त्याला गजूच हसू येत होत सोबतच आपण हसलो तर सभाव्य स्वार्थ तडकेल हीहि त्याला भीति वाटली. मनात असो, नसो–तो म्हणाला,

"मला वाटते, आता तुम्हाला तिची गरज पडणार नाही "

' का, कशावरून ?"

"आता तुम्ही स्वतः चागले मिळवते झाले. चार माणस पोसू लागले. तेव्हा तुम्हीं मला मदतीबद्दल विचारण म्हणजे माझी थट्टाच नव्हे काय ?"

अगात न धरवून आप्पानी आतून आवाज दिला,

"कोण, गजू का रे ?"

"हो. का ?"

"ये ना, आत—"

"येतो, थाबा––"

नतर पूर्वीपेक्षा हलक्या आवाजात गजू म्हणाला,

"थट्टा नाही करीत नानासाहेब मी तुमची. मला अद्याप स्वतःचा काही एक भरवसा वाटत नाही "

यावेळी केशव आढ्याकडे बघत होता तरी गजू बोलत होता,

"आता वावरतो त्या वातावरणानें माझे कधी काय होईल ते सागवत नाही. तुम्ही एकदा म्हटल होत तेच मला पटायला लागल आहे. माणसाला एकदा पैसे मिळवण्याची सवय लागली म्हणजे ती सोडवत नाहीं. मिळालेला पैसा खर्च होतो. वाटेल ते षौक लागतात. हें सार खर आहे नानासाहेब तुमच. म्हणून

मी मुद्दाम तुमच्याकडे आलो आहे आता मी दा विळख्यातून लवकर बाहेर पडलो नाहीं–तर तो मला किती आवळत आणील ते सागवत नाही . ”

त्याच्या घरातून परत आप्पा ओरडले,

“ येतोय् ना रे गजू ? ’

“ हो, म्हटल ना एकदा ! ”

पुन्हा तो केशवला म्हणाला,

“ हो, आठवल तेव्हा म्हणतो–आता तुम्ही सागितल होत त्याप्रमाण वागल्याशिवाय गत्यतर नाही. म्हणून या बाबतीत तुमची पूर्वीसारखीच तयारी आहे की नाही–ते बघायला मुद्दाम आलो आहे बोला नानासाहेब, मी आता काय करू ? ”

या तयारीशी प्रत्यक्षात गजू कुठवर येऊन ठेपला होता कुणास माहीत, पण केशवला क्षणभर वाटल की, गजू फार निकट येऊन ठेपला असावा. तो विचारात पडला. खरा तर पेचात सापडला. गजूला आता हे कितपत शक्य आहे, अशा अवस्थेत आपण त्याला मदत करण, फुसवण बर की वाईट, एवढ करूनहि त्याच्याविषयींच्या आपल्या पूर्वीच्या अपेक्षा यापुढहि पूर्ण होऊ शकतील काय ? वगैरेंचा निर्णय न घेववृन म्हणा वा सबधाअभावात गजू अन् त्याच्यात पूर्वीपेक्षा दूरत्व निर्माण झाल्यान म्हणा–तरी पण गजूला सोडवेना म्हणून केशव म्हणाला,

“ पण आजच तुमच्यावर तशी पाळी आली नाही, अस मला वाटत–बरोबर आहे ना ? ”

“ तरी पण ती कधीं येईल ते सागता येत नाही ”

“ मग आल्यावर पाहू. ”

तो म्हणाला,

“ अजून अवकाश आहे जा आता. आप्पासाहेब बोलावताहेत कधीपासन मलाहि झोप आलीय् ”

म्हणून गजू जागचा उठला. लोटून लावल्यासारखा आपल्या घरात घुसू लागला

# आठ

देवकीसह सर्वांसोबत ' सोलवॉ साल 'पाहताना धुमसू लागलेला गजू लीलाच्या दर्शनासाठी म्हणून केशवच्या घरात घुसला होता. केशवच्या कान उघाडणीन त्याच्या धुमसण्यात शिक्षणाविषयींच्या चिंतेची भर पडली होती अकारणच आपण शिक्षणापासून पारखे होत आहोत अस त्याला वाटल्यान, त्याबाबतचा आत्मविश्वास ढासळू लागला होता. त्याला सावरण्यासाठीं असेल, केशव नि आपल्यातल अंतर पाहण्यासाठी असेल अथवा लीला वा तिच्यासारखी दुसरी कोणतीहि हक्काची छोकरी मिळवायची झाल्यास तिला शिक्षणाशिवाय दुसर साधन नाही ही त्याच्यातल्या खऱ्याखुऱ्या शिक्षणविषयक जिद्दीन त्याच्यात पुन्हा करून दिलेली जाणीव तीव्र झाल्यान असेल, गजून केशवला चाचपून पाहिल होत. केशवच्या बोलण्यावरून तो असावा तितका जागेवर दिसत नव्हता या सर्वांमुळ गजूची वाढती जखम फुकरत जाण्याऐवजी ओरखडली गेली होती. केशवन जवळजवळ हाकलूनच लावल्यान आपल्या जखमेसह तो घरात आला होता. तशातच आप्पा म्हणत होते,

" गजू, किती रे उशीर हा ? "

" बर, मग ? "

" तस नाहीं रे. कुठं होतास इतका वेळ, म्हणून विचारतो "

" गावातच होतो. गेलों नव्हतो कुठ परगावला. "

गजूचा हा अवतार आप्पाना अगदींच नवा नसला तरी पूर्वींच्या सर्व अवतारापेक्षा उग्र खास वाटला. तरी शक्य तितक्या गरजू आवाजात ते बोलले,

" कुठ सिनेमाबिनेमाला गेला होता काय ? "

" हो. का ? "

" काहीं नाहीं "

" विचारा ना, का गेला होतास म्हणून ? "

आप्पाना हे शक्य नव्हत. तरी गजूला राहावल नाही,

" आम्हा कामगाराच्या जीवनात तेवढाच एक विरगुळा असतो आप्पासाहेब. आमच्या घरात रेडिओ नसतात. महाग तिकीट घेऊन नाटक पाहता येत नाहीत. कामगार कल्याण-केद्रात पगारी माणसाच्या देशसेवेवरील भाषणाखेरीज काहीं नसत. तेच ते. फार त वक्ते बदलतात. पुस्तक बघावीत तर तींहि राष्ट्राच्या औद्योगिक विकासातील कामगाराच्या स्थानाचा महिमा गाणारी. म्हणायला तिथ रेडिओ आहे, पण ' राम राम मडळी ' किंवा ' कामगार सभा ' याखेरीज काहीं ऐकायचा कामाचा नाहीं. त्यापेक्षा सिनेमा बघण काय वाईट आहे ? थोड्या पैशात चार घटका करमणूक तरी होते त्यान "

आता न राहवून—आप्पा म्हणाले,

" एवढ्यातच तू स्वतःला कसलेला कामगार समजू लागला म्हणायचा ? "

" तितकहि माझ्या दैवात दिसत नाहीं आप्पासाहेब, तितकमुद्धा दैवात दिसत नाहीं. त्यालादेखील खूप पैसा लागतो. दूर कशाला, आजचीच गोष्ट. आमच्या प्रेसमधल्या मारुतीन आपली सपूर्ण हप्त्याची कमाई आज एका सिनेमात उडवून टाकली नशिबवान आहे बिचारा "

सात्वनार्थ बोलून गेल्यावर ' अमला ' कसलेला कामगार होण्याची कल्पना गजूलाच बोचली ही जाण कदाचित् त्याला क्लासच्या आठवणीन करून दिली असेल तरी ताज्या सस्काराचा परिणाम त्यान ओकलाच,

" त्याचं एक जाऊ द्या. माझ्यासारख्यान आठवड्यातून एकदा सिनेमा

पाहतो म्हटल तर तेंहि तुम्हाला खटकत कुणाच्या पानठेल्याशी सिनेमाचीं गाणीं ऐकत बसणंहि तुम्हाला लफंगेपणाच वाटत ”

हे सार गजू कशापायी बोलतो, तेच आप्पाना समजेना म्हणून असेल वा त्याच्यावर तो काहीं आरोप ठेवत असल्यान असेल ते आता सरळपणे म्हणाले,

‘ तुला काय म्हणायच ते साग. उगाच आडवळण कशासाठी घेतोस एवढी ? ”

“ खर बोललो तर आवडेल तुम्हाला ? ”

“ हो—”

त्याना म्हणाव लागल,

“ बोल ना—”

“ सागा बर आप्पासाहेब—–”

तो म्हणाला,

“ इतक्या दिवसापासून मी मिळवतो आहे. घर चालवतो आहे. पण तुम्ही आजवर कधी मला स्वत:हून चार पैसे दिले आहेत ? ”

“ अरे, पण मी देणारा कोण ? करता–करविता तर तूच आहेस ना ? ”

“ म्हणायला. ”

तो उद्वेगान म्हणाला,

“ आहे ना,·मी म्हणायला करता–करविता ”

“ नाही रे गजू, तस नाहीं —”

आप्पा म्हणाले,

“ तू मनात आणल तर हव तें करू शकतोस आजवर मी तुझ्या पैशाबद्दल अक्षरान विचारल आहे काय ? ”

“ म्हणूनच—–”

तो उपरोधान तणतणत म्हणाला,

“ त्या दिवशी म्हणाले होते, बाबारे—–काय करायच ते पाहून कर. त्या लोकात आणि आपल्यात फरक आहे. ते एक जाऊ द्या–आहे, माझ्यात अन त्या गावढळ कामगारात फरक निश्चित आहे. ”

आठवायला म्हणून थाबल्यावर तोच म्हणाला,

“ इतक्या दिवसातून मी कमावतो आहे, आपल सार घर चालवतो आहे.

पण तुम्ही माझ्या कपड्यालत्त्याकडे कधीं लक्ष दिल आहे ? तुम्हाला माहीत आहे ना, प्रेसमधले बाकीचे सारे तरुण कामगार रेऑन सॉस्कीनचे कपडे वापरतात म्हणून ? आठवड्याला दोनदा धुलाई करतात म्हणून. माझी मात्र जेमतेम एकदा धुलाई होते. तीहि घरीच. हाताने. सोड्याच्या पाण्यात साऱ्याच्या कपड्याबरोबर कपडे उकळून. इस्तरी नाहींच. गादीखाली रात्रभर कपडे दाबून ठेवायचे आणि सोमवारी सकाळीं चढवून प्रेसमध्ये जायच म्हटल आहे कधी तुम्ही लॉंड्रीत कपडे टाकण्याबद्दल आजवर ? "

" नाहीं म्हटल तेच बर झाल. अलीकडील लॉंड्रीवाले असे भिकारचोट कपडे धुवायला घेतील की नाही तेहि सागता येत नाही— "

हे बाबासाहेब दाटत असताना आप्पाना लागत नसे तितक लागत होत. ते कदाचित् नात्यातल्या फरकामुळ सुद्धा असेल; पण ते गप्प होते. लाचारीमुळं. गजूचहि काही सारच खोट नव्हत यामुळ. त्याच्यासाठी त्याच मन तुटत होत याहिमुळ.

इकडे आप्पा मुकाट्यान ऐकत असल्यान गजूहि रितारिकामा होत आला होता. त्याच्या व्यथाचा पू वाहात आला होता. त्याचा आवाज अखटता–आवरता झाला होता पण त्याचा भार अद्याप पूर्ण ओसरला नव्हता कारण आप्पाना त्याला जेवण्याबद्दल सागितल तेव्हा तो म्हणाला,

" नको. "

" का ऽ रे ? "

" मला भूक नाही—"

" ऑ ? का ? "

" सागितलना एकदा ? नाही म्हणजे नाही. "

आप्पानी पुन्हा मान तुकविली. क्षणभर त्याची बारीक–सारीक हालचाल न्याहाळत राहिले.

या दरम्यानच्या शाततेन त्याना परत गप्प राहण अशक्य केल. त्याना वाटणारी आनदाची घटना त्याला कशी वाटेल याचा विचार होण्यापूर्वी ते म्हणाले,

" ह, गजू–एक सागू काय ? "

" आणखी काय, ते ? "

आप्पानी परत विचार केला. न राहवून म्हणाले,

" बाबासाहेबाच पत्र आल आहे . "

" शाम–प्रिटिंग ब्यूरोचे ? "

" हो. "

" अस्स. "

आपण पत्र हातीं पडल्यापासून लाडवत असलेल्या आनदाच असं स्वागत होईल याची आप्पाना कल्पना नव्हती. त्यामुळ त्यानी बळेच विषय चालू ठेवला,

" बघतोस काय ? "

" दाखवा. "

उशीखालच फुटक पाकीट आप्पानी हातीं ठेवल म्हणून गजून त्यातला कागद काढला. काढला म्हणून वाचू लागला,

" दिनाक ३–२–६४ रोजीं घेतलेल्या आपल्या आठ तासाच्या ट्रायलमध्ये आमच्या फोरमनचें समाधान झाले नाही. तथापि मुलाखतीत आम्ही आमच्या वतीने जे प्रश्न आपणास विचारले व त्याची आपण जी उत्तर दिलीत त्यानुसार आपणात पुढे जाण्याची चुणुक असावी असा आमचा कयास झाला आहे. त्यामुळ आणि ब्यूरोच्या नव्या मॅनेजमेन्टला तरुण माणसाची आवश्यकता असल्यामुळे आपणाला आपली प्रगति करण्याची सधि द्यावयाचें ब्यूरोने ठरविले आहे. तेव्हा आपण दिनाक १५–२–६४ रोजी कामावर रुजू होण्याचे करावें

" आपली ही नियुक्ति सध्या चार महिन्यापुरती असून पुढे आपल्या वर्तणुकीने ब्यूरोचे समाधान झाल्यास आपणास कायम करण्यात येईल. नतरच ब्यूरोकडून मिळत असलेल्या आणि वारवार बदलणाऱ्या सर्व सवलतीचा फायदा इतर कायम कामगाराप्रमाणे आपणास मिळेल

" ब्यूरोच्या नियमाप्रमाणें आपलें मासिक वेतन रुपये पच्याऐशी राहील यात महागाई–भत्त्याचा समावेश आहे, हें येथे मुद्दाम स्पष्ट करीत आहोत.

" तरी ब्यूरोने दिलेल्या तारखेस आपण कामावर हजर राहण्याचे करावें. आपणास कामावर राहणे शक्य नसल्यास अथवा काही कारणाने

ब्यूरोने दिलेली तारीख आपणास अडचणीची वाटत असल्यास तसे ब्यूरोला सात दिवसाच्या आत लेखी कळवावे—"

पत्राची घडी करताना बोलू शकला असता तर गजूच्या तोंडून, "धंदा पहावा तर लेकाचा भडभुजाचा अन् मिजास मात्र बादशहाची दिसते" असच बाहेर पडले असत.

पण आप्पासाठी असेल, तो एकदम बोलला नव्हता. घडी करता करता पत्र उलगडत होता वाचत नसला तरी बारकाईन न्याहाळत होता वारवार.

या दरम्यानच्या विचारान त्याला घेरत आणल क्षणापूर्वी केशवकडून मिळविलेल्या दिलाशाचा तकलादूपणा त्याला आठवू लागला. तो केशवला भेटल्यापासून त्याच्या घराबाहेर पडेपर्यंत केशव आपल्याशी कसाकसा वागला—बोलला तें आता बारकाईने आठवू लागला. ह्या आठवणीनी गजून मिळवलेला दिलासा धुवून काढला. शिवाय सनदशीर मार्गान जगणाऱ्यापैकीच गजू होता. वडिलभावडात राहून मिळवता—येणार शिक्षण त्याला अधिक प्रिय आणि हवस होत ते न मिळाल्यासच तो केशवसारख्या मतलब्यान सुचवलेला तकलदू आणि उपरा माग स्वीकारणार होता. जेव्हा केव्हा वह्यापुस्तकातून बाहेर फेकलो जातेशी भीति गजूला वाटत होती तेव्हा तेव्हाच भाबावून तो अशी अपुरी धावपळ करीत होता.

फेरविचार झाल्यावर बाबासाहेबाच पत्र गजूला ताळ्यावर आणू शकल. लगेच ही नोकरी मिळवण्यान आप्पाच देवपणच कारणीं लागत आहे, असहि त्या भाबड्या कच्च्या माणसाला वाटल. गजूच्या चेहऱ्यावर आप्पाबद्दलची कृतज्ञता चमकू लागली. पण तिलाच कुठतरी क्षणापूर्वी आप्पाना आपण उगाच नाहीं नाहीं तें बोललो ह्या खतेचा काळवटपणा होता. ही सारी कोंडी फोडण्यासाठीं गजू म्हणाला,

"कधी आल हें पत्र ?"

आप्पानी सांगितलं.

"पण त्यानीं इतका उशीर का केला ?"

"त्याच सार विचारपूर्वक चालत."

आप्पा खुशी लपवत म्हणाले,

"तुला कामावर घ्याव कीं नाहीं, घेतल तर शेवटपर्यंत निभवता येईल काय—

वगैरेबाबतींत बाबासाहेबानी खूप विचार केला असावा. मग कुठ—"

झाल. एवढ्यानच गजू फिरला. संशयान तो म्हणाला,

"का हो, आप्पासाहेब–तिथ तीन पाळ्या ह्या असतातच, नाहीं ?"

"ती ऽ न पाळ्या—"

खोट तर बोलवत नाहीं—पण बोलाव तर लागत म्हणून आप्पा रेंगाळत म्हणाले,

"हे तर मीं मागहि तुला सांगितल होत"

"तर मग माझ्या क्लासच कस ?"

"शिक्षणाबद्दल तुझ्या अंतःकरणात इतकीच तळमळ असेल तर तू या सर्वांतूनहि मार्ग काढू शकशील"

याच्यासाठी गजून विचारल नव्हत. तो त्याना सरळ त्याच्या शब्दाची आठवण देऊ लागला,

"पण तुम्हीं माग सांगितलं होत ना कीं बाबासाहेब मला या बाबतीत काहीं सूट देऊ शकतील म्हणून ?"

"अ . हो ना—"

आता आप्पासाहेब पळ काढू लागले,

"तीहि काहीं अजिबात अशक्य गोष्ट नाही. खर तर बाबासाहेबासारख मनुष्य मी अजून पाहिला नाहीं. फरक एवढाच की त्याच्या स्वभावाला दोन्हीं बाजू आहेत"

"मला हे नको आहे आप्पासाहेब—"

म्हटल तर विनवत नि म्हटल तर गर्जत गजू बोलला,

"तुम्हाला याबाबतींत निश्चित काहीं करता येण शक्य आहे काय ते सांगा मला !"

"मला ? अं–हो हो–हो. न करायला काय हरकत आहे ?"

"तर मग कराल काय ?"

"हो—"

"कधी ?"

"तू कामावर रुजू होणार असल्याच पत्र तर लिही . मग मींहि लिहितों"

" मला काय ! मी आता लिहितो—"

तरारा उठून गजून आपल्या वहींतल एक पान टरकावल. आप्पाना मजकूर सांगायला लावला. तो लिहू लागला. पत्र लिहून झाल्यावर वाचायच्या निमित्तान आप्पानी जवळ घेतल. वाचल्यावर मात्र आपल्या उशीखाली ठेवू लागले. तेव्हा गजू म्हणाला, " आणि तुमच पत्र ? "

" मीहि आताच लिहाव म्हणतोस काय ! "

" मग कधी तर ? "

" त्याच अस आहे—" आप्पा म्हणाले,

" याच पत्रासोबत माझहि पत्र पाठविण बर नाही. बाबासाहेब थोडे अहंकारी आहेत. माझ पत्र ही त्याना ' अट ' वाटेल. त्याचा ते गैरफायदा घेतील. म्हणून म्हणतो–तू आधी कामावर रुजू हो. चार आठ दिवस काम कर. मग एकतर मी प्रेसमध्यें जाऊन बाबासाहेबाना भेटेन किंवा त्याना पत्र लिहून देईन...मग तर झाल ना ? "

तरीहि गजू मानीना तेव्हा त्यानी परत बाबासाहेबाचा महिमा गाण सुरू केल त्याच्यातला ' ब्राम्हण ' कसा गजूला सवलत देऊ शकेल ते अनेक कल्पित उदाहरणावरून पटवून देऊ लागले.

' मोठ्या ' ब्राम्हणाबद्दल कोणत्याहि भाट-भिक्षुकी करणाऱ्या ब्राह्मणाला ' मोठा ' आपल्याबद्दल आपुलकी ठेवतो या कल्पनेत वाटतें त्या समाधानान असेल, पत्र लिहून त आप्पाच्या स्वाधीन झाल्यान असेल वा काहीच मार्ग नसतो त्यावेळी मनुष्य सारे प्रवाहावर सोपवितो–तस स्वतःच भविष्य प्रवाहाच्या स्वाधीन करून असेल, गजून आप्पावर विश्वास टाकला इतका कीं स्वतःहि तो ते पत्र पोस्टात टाकायला तयार झाला. तेव्हा मात्र आप्पा म्हणाले,

" तू कशाला घेतो त्रास ? मी घेईन बाळ. सुधाकडन टाकवून उद्या "

" आठवणीन ? "

" आठवणी ठेवण्याशिवाय दुसर कामच कोणत आहे मला ? "

गजूला आडव करायला सांगितल्यावर ते कधी नव्हे त्या मोकळ्या आवाजात म्हणाले,

" माझी हाक ऐकलीस रे ईश्वरा तू ! झाल. आता मी कधीहि तुझ्या हाकेला हजर होईन. "

# एक

शाम प्रिंटिंग ब्यूरोच्या टाईम कार्डावर गजू सही करीत होता काम झालेलं कार्ड टाईम कीपरच्या स्वाधीन करण्याशी अन् डॅनियल तिथ येण्याशी एकच गाठ पडली

डॅनिअल तिथला ट्रेडलमन होता वयान गजूपेक्षा चार–पाच वर्षांनी मोठा असलेला. पण विचारान गजूएवढाच असलेला त्यामुळ त्याच्यात मैत्री वाढत होती. नाहीं म्हणायला डॅनियलच लग्न झाल्यान तो दोन बच्चाचा पपा होता. हे कारण त्याच्या चेहऱ्यावर पोक्तपण पसरवून गेल होत. आता आपल्यासाठी गजला खोळंबवत तो म्हणत होता,

"आर यू गोईंग?"

"हो. मग काय कराव तर?"

"मी तर ऐकल की तुम्ही थांबणार आहे म्हणून?"

"थांबलो आतावर. आणखी किती थांबू?"

"तो फिर आपके पपा आज भी नहीं आए मालुम होते"

" नही ना हो "

गजू त्याच्यावरच सताप वाढवत म्हणाला,

" बहुदा ते येणारच नाहीं इथ—"

" पण त्यानी म्हटल होत ना ? "

" नुसत म्हणायला काय जात ! मी कामावर रुजू झाल्यापासून ते अस म्हणतात..."

तोवर सही घासून झालेल्या डॅनिअलन त्याच्या खांद्यावर हात ठेवला कुशीत दाबत त्याला दाराबाहेर काढताना म्हणाला,

" चला, चहा घेऊ—"

" लेकीन मुझे जाना है—"

" कहॉ ? "

" क्लासला—"

" ये तो मै भूलहि गया था यार तरी काय हरकत आहे ! मिण्टोमे तो मार देगे एकेक कप . चलो "

अन् त्यान परत गजूला कुशींत आवळल. त्यामुळ अन् चहा तर त्यालाहि हवा होता म्हणून तो चालू लागला. पण पुटपुटत होता,

" लौकर गेल पाहिजे अलीकडे एक तर फारस जाण नाही होत ह्या पाळयाच्या टाईमामुळ. महिन्यानले वीस–बावीस दिवस फुकट जातात त्यात आता परीक्षा जवळ आली आहे. अभ्यास पण खूप व्हायचा आहे "

हे नि अशासारख आटोपेपर्यंत त्याचा चहाहि पिऊन होत आला मग डॅनिअलन गजूला एकट सोडून सायकलवर टाग मारली. एकटा गजू क्लासच्या वाटेन चालू लागला. त्याचा क्लास फारशा अतरावर नव्हता. सुहास–छापखान्यातच आपल्याला मॅट्रिकपर्यंत काम कराव लागेल, या अंदाजान त्यान तिथच कुठ तरी चालणारा क्लास स्वतःला जोडून घेतला होता त्याच सुदैव इतक की शाम प्रिंटिंग ब्यूरो पण त्या परिसरातच होता

चालता चालता त्याच लक्ष नारायणरावाच्या होटलाशी गेल. खर तर बाहेरच कारण झकपक कपडे केलेला मारुती तिथ होता. त्याचे हात पॅटीत होते. केस जास्त चमकत होते. तसे ते नेहमीपेक्षा नीट–नेटकेहि होते. नेहमी रविवारी सायकाळीं असे तसा एकूण आज मारुतीचा थाट दिसत होता.

मारुतीच्या बाजूला देवकी उभी होती. आता ती साडी नेसली होती. साडीचा असराव तिच्या हालचालीवर सारखा सळसळत होता. मधूनच ती कमरेत ब्लाऊझ खोचल्यासारख करीत होती. मधूनच पदर सावरत होती. कधीं डोक्यावर तर कधीं खाद्यावर घेऊन स्वत:शीच कसा दिसतो ते बघत होती. आपल्याकडे कुणी बघत काय हे मात्र ती सतत बघत होती. तिच्या ब्लाऊझचा अन् मारुतीच्या पॅन्टचा, तिच्या साडीचा अन् त्याच्या मनिल्याचा रग सारखा होता.

मारुतीला, अजिबात न बदलेला गजू लाबून ओळखू आला होता. पण नेमक्या नजरानजरीच्या–क्षणीं–मुद्दाम असेल वा सहज असेल त्यान सडक धावणाऱ्या रिक्षावर हाका सोडायला सुरुवात केल्या होत्या. त्याच्या हाका न ऐकून असेल–रिक्षा निघून गेली होती. मग सडकेन रिकामी रिक्षा नसल्यान म्हणा, गजू आणखी जवळ आल्यान म्हणा वा त्याच्या सबधात मारुतीच्या डोक्यात काहीं घुसल्यान म्हणा, त्यान म्हटल,

"काय भडजी, कोनीकडे ?"

"क्लासला—"

देवकीच्या नट्यापट्याकडे पाहात गजू म्हणाला,

"आणि तू रे ?"

"कलास चालूच आहे अजून ?"

"मग काय तर ?"

"नेहमीं तर दिसत नसत—"

"कोण मी की तू रे ?"

"समज. आता तू मोठा मानूस झाला आहे !"

देवकीला डोळा घालत मारुती म्हणाला,

"मग कशी तुलें आम्हा गरीबाची आठवन राहीन, क्यौ ओ देवकी ?"

"सही तो बात है—"

श्याम प्रिंटिंग ब्यूरोतल्या नोकरींत इतर कामगाराना वाटतो–तो मोठेपणा गजूला कधींच वाटला नव्हता. पण आता देवकीकडे पाहून गजून तो पत्करला. तिच्याकडे पाहातच म्हणाला, "वेळच नसतो रे मला अलीकडे..."

"मून तर मनतो, तू आता मोठा मानूस झाला आहे मून. अच्छा, जान दे.

मार उस बातपे गोली ! दोस्तानेके खातीर एक काम करता क्या ?"

"कोणत ?"

तोवर मारुतीच्या डोक्यात दोन काम निघाली पहिल्यादा गजूला कोणत सागाव हे ठरण्याच्या आत तो म्हणाला,

"अपने लिए खोली देख एखादी "

गजू बोलण्यापूर्वीच मान हिसडत नि होटलात बघून घेत देवकी म्हणाली,

"चल रे, ऐशा भलत्या बाता मत कर किसीके भी सामने ! नही तो मै आऊगी नही भला तेरे साथ ! कह देती हू !"

"याच्यात कायची भलती बात आहे, लेक ? उद्या जर बुढ्यान मले घराबाहीर काहाडल तर मले राहासाठी घर नाही लागणार काय मनाव बोल ना ?"

"मेरोकू मत पूछ रे !"

"राह्यल—"

तो आता गजूला म्हणाला, "का रे भडजी, खर बोलतो का नाहीं ?"

हे ठरवण गजूला कठीण होत

मारुतीच म्हणाला, "मग, भेटन काय घर ?"

"पाहीन."

"खरीच ?"

"अ "

"देख भला, मै तेरे भरोसेपर रहूगा !"

"एकदम ?"

आता गजू सावध झाला, "एकदम भरवशावर नको राहू. आजकालच्या काळात घर मिळण तितकस सोप नाही !"

"फिर आई ना ओही बात ?"

म्हटल तर गजू नि म्हटल तर देवकीकडे बघत मारुती म्हणाला,

"दोस्तान्याच्या बाबतींत मारत्याच्या तखदीरात हेच बेईमानी लेहलेली आहे. साले मारत्या, तेरे लिए दुनियामे अभी दोस्त पैदाही हुआ नाही ! तू फिजुलही अलतेभलतेको गला लगाता !"

"तस नाहीं रे मारुती—"

नसलेल्याहि मैत्रीवरला अविश्वास सहन न होऊन गजू कळवळला,

"आजकालच्या काळात घर मिळण किती कठीण आहे, हे तुला काय माहीत नाहीं? शिवाय माझ्यावर घर शोधण्याची अजून कधी पाळी आली नाही तेव्हा त्याबाबतीत मी तुला नक्की कस सागू शकेन? तूच साग बर?"

"नाही. मी तुलेच मून मनत नाही माह्यवाल तखदीरच तस आहे दोस्ता-न्याच्या बाबतींत. ज्या भडव्याले मी ढुगनाची पॅन्ट सोडून देत होतो आन सिनेमा–होटलात नेत होतो, थोच साला आता बेईमान झाला आहे–मग तुही तर गोष्टच अल्लग! तुहा–माहा दोस्तानाच कमी होता मना—"

"अरे हो!"

आठवण होऊन आता गजू म्हणाला, "गोकूल नाहीं दिसत रे?"

"नाम मत निकाल सालेका!"

अन् तो पचकन् थुकला.

भीत भीत गजू म्हणत होता, "का, काय झाल रे?"

"हम उस मादरचोदकी औलादसे बात नही करते!"

"अरे, पण झाल काय?"

"कुछ नही रे! जल्लू है साला!"

तोच म्हणाला, "ऐसा मेरेकू पहले मालूम होता तो सालेकू पास खडा नही करता था! मै ही हू की सालेकू काम शिखाया! नाही तर जात होता दुधाच्या चग्या घालण्यात लेकाचा अखवा जलम"

"ओ देख रे, खाली रिक्षा आ रही!"

"ओ रिक्षावाला!"

"प्रायवेट है!"

"आज रिक्षा भेटते का नाहीं साली?"

"कुठ जातो पण?"

"पूछ देवकीको!"

"देख भला!"

नाकावरली माशी उडवताना कराव तस नाक उडवत देवकी म्हणाली,

"फिर तुने ओही रगबाजी शुरू कीई! ऐसेसे मै चल दूगी!"

"ॲहॅहॅ! तेरे नखरेमे गरम मस्साला तो!"

मारुती दात रगडत म्हणाला, "अब कहा जाती है मेरी जान!"

अन् तो तिच्याकडे खालपासून वरवर तिलाच कळेल अशा नजरेन पाहूं लागला यावर मात्र ती तिथन हलली नाहीं की फणकारली नाहीं. त्याच आव्हान स्वीकारणारे तिचे डोळे लपकन् खाली लोमकळले. हें पाहता पाहता आपल्याला रिक्षा लवकर मिळावी अस मारुतीला वाटून गेल; पण देवकी-सारखी रिक्षा काहीं त्याच्या ताब्यात नव्हती.

त्यामुळ गजूला सागावयाच्या दुसऱ्या कामावर त्याच लक्ष गेल,

"अपने लिए जमा ना रे तुम्हारे प्रेसमे नोकरीका. बोल जमाता क्या?"

"पण तिथल माझ्या हातीं काय आहे?"

गजू आठवून म्हणाला,

"सुहास छापखान्यात चालू आहे ना तुझी नोकरी?"

"आता थे मी सोडनार आहे "

"का रे?"

"ये साला बाबूरावका बच्चा वखतपे पैसे नही देता ना? आनखी—"

"तरी तर तू तिथ पुष्कळ दिवसापासून टिकून आहे रे!"

"होतो. पन आता नाहीं निभत आपल हस्त्याच्या हस्त्याला पैसे मिळाल्या-सिवा पयलेची गोष्ट अल्लग होती आता खर्च वाहाडला आहे. त्याच्यात थो परदेशाचा बच्चा तिथ झकमारी करत असते "

"कोण गोकूल?"

"नाहीं तर काय भडवा. चुगल्या खाते साला माह्यावाल्या बाबूरावपाशी! छापखान्यातल काहीं सामायन दिसल नाहीं तर माह्यावर आळ घेतात भडवीचे. जसा मी एकटाच तिथ काम करतो! बाकीचे मोठे साव लागून गेले आहे . !"

तशात त्यापैकी देवकीन एक रिक्षा थाबवली. प्रथम तिला आत लोटल्यावर, जवळ जवळ तिच्या अगावर बसताना मारुती गजूला म्हणाला,

"तो फिर, करेगा ना मेरा काम?"

गजूची मान हलते न हलते तर त्याची रिक्षा जोशानिशी धावत सुटली.

# दोन

डास, ढेकूण, चिंता आणि अपचन वगैरेनी आप्पाची झोप नाहीशीं केली होती. झोपेच्या अभावान त्याच्यात उष्णता वाढवली होती नि तिन त्याच जेवण उडवल होत. त्यामुळ आणि मुलाचा भार कमी करण्याच्या हेतुमुळहि ते एकदाच जेवत. तेहि दोनदा जेवत असताना एका साजेस जेवत त्याच्या एक-चतुर्थांश अन्न खात. याचा परिणाम त्याच्या शरीरावर उमटला होता. वर्षांनुवर्षं खाटेशीं झुजणाऱ्यासारखं त्याच शरीर झाल होत. आता त्याना नुसत पडून राहणदेखील जिवावर येत होत. पण टेकून नि बसूनहि राहण जमेना म्हणून ते आडवे होत होते. दहा मिनिटानी कूस बदलावी लागत होती. दहा मिनिट ते उपडे पडून बघत असत अकराव्या मिनिटाला त्याना उताण राहवत नसे. अशी चाळीस – पन्नास मिनिट गेल्यावर ते उठून बसत असत. अशा चाळीस–पन्नास मिनिटानतर परत झोपत – पडत असत. गेल्या काहीं महिन्यातला हाच त्याचा मुख्य कार्यक्रम होऊन बसला होता. बाळ – सुधावर आरडा – ओरड करण्या-पुरताच काय तो त्याच्या कार्यक्रमात बदल होत होता.

सिधी डॉक्टर काकानी अजून त्याच्याकडे देखभालीला येत होता. गजूचा भार कमी करायला म्हणून आप्पानी त्याची ट्रीटमेंट कधींच बद केली होती. ती होतस वाटताना तो म्हणाला होता,

" आपने ट्रीटमेंट जारी रखी तो बिलकुल पहले जैसे हो सकते है. अगर आपकी हेल्थ अच्छी हुई तो मै मेरे एक फ्रेन्डसे आपके आखोका ईलाज करवाके आपकी यहभी तकलीफ हमेशाके लिए दूर करवा दुगा ! मेरेपर आप भरवसा करो — "

झाल्यावर म्हणाला होता,

" कोई हर्ज नहीं. तोभी मै आपके यहॉ आया करूगा. मै पैसो केलिए दवा देता नही. इन्सानीयतके लिए आपकी ट्रीटमेंट जारी रखूगा ! आगे चलकर आपको आराम हुआ तो मुझे कुछ देना, वरना कौडीभी नहीं देना . "

कृतज्ञतेच्च हे ओझ आप्पातल्या माणुसकीला पेलेना ते त्याना शक्य ते डॉ. काकानीला हप्त्याच्या हप्त्याला देत राहिले पण पुढं हा पैसा अनाठायीं चालल्याच त्याना कळायला लागल तेव्हा त्यानी कमी कमी करीत आणून बद केला. तरीहि काकानी त्याच्याकडे येतच होता वाड्याबाहेर स्कूटरेट लावून स्वतःच्या घरासारखा साडसूड आप्पाच्या घरात घुसत होता. आप्पाची देखभाल करीत होता. 'अशा' पेशटला परवडेल ते औषधहि देत होता. निघून जात होता. त्याच्या ह्या लगटीचा अर्थ आप्पाना अजून लागत नव्हता. सुधा लहान होती. घरात दुसरी कुणी बाई नव्हती – तरीहि तो येत होता. तो येत होता, तरीहि वाड्यात काहीं बोबा उठत नव्हत्या. म्हणून तर आप्पाना त्याच्या औदार्याचा अधिकाधिक सशय येत होता

डॉ काकानीच्या दृष्टीन गोष्ट वेगळी होती. एखाद्या चाळींत शिरलेली मोलकरीण जशी त्या चाळींतल्या इतर घरचीं काम मिळण्याची आशा ठेवते – तीच गोष्ट डॉक्टर काकानीची होती. वाड्यातली दुसरी एखादी खाट त्याच्या तावडीत सापडली असती तर कदाचित् त्यान लगोलग आप्पावरच्या इन्सानीयतला गोळी घातली असती

सरावान असेल किंवा अनुभवान असेल अलीअलीकडे आप्पा डॉक्टराशी एखाद्या डॉक्टरासारखे बोलू लागले होते. आता डॉक्टर काकानीला जवळ पाहून म्हणाले,

" आपल्यापाशी झोपेच स्ट्रॉग औषध नाहीं काय ? "

" इसका मतलब आपको कलभी निंद नही लगी ? "

" कालच काय – गेल्या अडीच तीन महिन्यापासून मी आपल्याला हेच सागतों आहे.. "

" ओ तो होगया बोल ना ! "

स्वतःवरच अविश्वास असलेला तो डॉक्टर म्हणाला,

" लेकीन आपने ओ दवा ली थी न ? "

" अहो, घेतली म्हणजे काय ? "

आपल्या चेहऱ्यावरला गोंधळ डॉक्टरच्या चेहऱ्यावर उमटतो काय ते बघत आप्पा म्हणाले,

" विचारा ना गजूला आमच्या ! "

अशावर गजू घरी असता तरी त्या डॉक्टरन त्यानाच जे म्हटल असत तेच आताहि म्हटल,

" बिलकूल नीद नही लगी ? "

" आता काय सागाव बुवा "

ते म्हणाले,

" मी आपणाशी खोट बोलेन काय ? "

" वैसी बात नहीं देशकरसाब — "

तो म्हणाला,

" मैने कल दी थी वह दवा निंदके बारेमे बहोतही मशहूर है कल आपको दी थी उससे एखादे मरीजने थोडीभी जादा ली तो वह हमेशाके लिए निंद ले सकता है . आप जैसे कमजोर आदमीको तो उतनीही काफी थी "

" मलाहि तर तेंच म्हणायच आहे, डॉक्टरसाहेब ! "

" अच्छा तो कोई हर्ज नहीं. वही दवा आज मै थोडी जादा भिजवा देता हू ! आप लडकेको भेज देना दवाके पैसे लेकर ! "

डॉक्टर काकानीची खूप किक्स मारल्यावर कशीबशी सुरू होणारी स्कूटरेट भकाभका धूर सोडत निघून गेल्यावर थोड्या वेळान आलेल्या बाळला आप्पानी प्रथम काम सागितल होत ते डॉक्टर काकानीकडे जायच. तिकडे गेलेला बाळ अजून यायचा होता.

आप्पा एकटेच खाटेवर बसले होते आता त्याच्या पायाला अगडबंब बॅडेज नव्हत त्याना घरातल्या घरात चालता फिरताहि येत होत. तरी ते अली-कडे बसत तसे नुसते खाटेवर बसून होते. सवयीप्रमाण त्याचा दुखरा पाय ताणलेला होता. सवयीप्रमाणच त्यावर त्यानी दोन्ही हात ठेवले होते. जणूं पायावरल्या सकटाला त्याचे हात तोड देण्यास तयार होते. त्याचीं धूसर बुबुळ आतल्या-आत लुकलुकत होतीं. आधळ्यासारखी डोळ्याच्या या कोपऱ्यातून त्या कोपऱ्यात चाचपडत होतीं ती कदाचित् आप्पाच्या विचारानहि तशी चल-चलीत राहात असावींत.

अशात विस्तवासारखा गरम असलेला गजू घरात शिरला. मारायला धावावा तसा आप्पाच्या खाटेशी आला. थाबला. म्हणाला,

"का हो, आज येणार होते ना तुम्ही ?"

"अ हो. येणार होतो — "

"मग ?"

पण तोच म्हणाला,

"आज काय रिक्षा नाहीं मिळाली ?"

"अ . तसं — "

"मग, बाळ नसेल आला वेळेवर शाळेतून ?"

" . . "

"कीं जीव घाबरत होता ?"

" .. "

"सागा ना ? सागा ना यातलच काहीं तरी एखाद कारण ? नाहीं तर नव सागा काहीं."

"तस नाहीं रे गजू !"

"काय तस नाहीं – आणि अस आहे करीत असता आप्पासाहेब ? तुम्हाला तिथ तोंड दाखवायचं नसेल तर तुम्हीं मला तस चक्क का सागत नाहीं ? उगाच भरवशावर कशाला ठेवता मला ? उगीच माझी तिथ फजिती होते. सारे लोक मला विचारतात कीं, आप्पा येणार होते – त्याचं काय झाल म्हणून — "

"पण तूं सागतोसच कशाला त्याना—"

"सागतों–म्हणजे काहीं खोट बोलत नसतों—"

स्वतःला आवरत गजू म्हणाला,

"तुम्हींच नसता काय सागत मला? म्हणून मी त्याना सागतों त्यामुळं ते मला विचारतान . सागा, काय सागत जाऊ त्याना? आणि अस किती दिवस फसवत राहू?"

'फसवत' या शब्दाचा अर्थ आप्पाना–निदान गजून वापरला त्या अर्थी तरी लागला नाहीं कारण ते फसवत असले तर गजूला आणि स्वतःलाच फसवत होते.

शाम प्रिंटिंग ब्यूरोमध्यें गजू नोकरी करायला तयार झाला तो त्याला एकाच कोणत्या तरी पाळीची सवलत मिळवून देतो अस आप्पानी म्हटल होत म्हणून नोकरीवर रुजू होण्याच पत्र लिहायला त्यान घेतल होत तेहि आप्पा लगोलग त्याच्यासाठीं सवलत मागणार पत्र लिहिणार होते म्हणून. पण त्याचं पत्र ताब्यात घेतल्यावर त्यानी आपल पत्र लिहिल नव्हत. त्याच्याच पत्रासोबत त्याच पत्र पाठविण बर नाहीं हे त्यानी गजूला सागितल होत. ते पटल्यावर त्यानी या बाबतींत पत्रापेक्षा प्रत्यक्ष भेटल्यानच काम होईल असं त्याला पटवून दिल होत, तो कामावर जाऊ लागला होता. तरी आप्पा शाम प्रिंटिंग ब्यूरोत जात नव्हते. सुरुवातीला 'गरम खाऊ नये' असं सागून काहीं दिवस ढकलले होते. पण क्लास बुडत असल्यान गजू जसजसा गरम होत होता तसतसे आप्पा ब्यूरोत जायच ठरवत होते त्याला सागत होते. शात करीत होते. परतु प्रत्यक्षात मात्र आतावर गेले नव्हते हें ना ते निमित्त सागून काळ काढत आले होते. त्यामुळ आपण स्वतः नि गजूला फसवत असल्याच त्याना पटत असल तरी इतराना फसवण्याचा अर्थ लागत नव्हता. पण तो विचारण्याच त्याच्यात धाडसहि नव्हत

गजू आपला भडकत होता,

"त्यापेक्षा अस का नाहीं सागत––"

तो गचकन थाबला

आप्पानी आता त्याच्याकडे बुबुळ गरगरवली. तरी तो बोलेना तेव्हा म्हणाले,

"काय, बोल ना!"

"हो, हो. बोलत नाहीं तर—"

परत तो थाबला. थाबला, थाबला नि एकदम म्हणाला,

" त्यापेक्षा अस का नाहीं सागत की माझी तिथं काहींएक पत नाहीं म्हणून .."

आप्पानी मानच खाली घातली.

गजू आवाज चढवत होता,

" बोला ना ? आहे काहीं उत्तर ? "

आप्पानी मान हलवली.

" तर मग मला तस आधीं का नाही सागितल ? "

आता आप्पानी कपाळ खाजवण्याच्या निमित्तान डोळे पुसले हे गजूच्या नजरेतून सुटल नाहीं. असहि असल तरी तो आता क्षणिक सतापान असेल वा सहवासाच्या परिणामान असेल पूर्वीचा गजू नव्हता. पण माणून मात्र होताच,

" तस असत, तर मी स्वतःहून माझ काय ते करवून घेतल असत. मी कुणाला भीत नाहीं की कुणाच्या भरवशावर नाहीं वेळ पडली तिथ लाथ मारून पाणी काढण्याची धमक आहे माझ्या अगात पण तुम्ही मला उगीच फसवत आणल इतके दिवस! क्लासला फीची फी फुकट जात आहे आणि अभ्यासचा अभ्यास नाही होत.. हे केवळ तुमच्या भरवशावर राहून होत आहे. माझ्या-वर तुम्ही सार सोपवल असत तर मी कधींच बाबासाहेबाना भेटलो असतो. चागुलपणान त्यानी ऐकल नसत तर त्याच दिवशी नोकरीवर लाथ मारून बाहेर पडलों असतो. अगात धमक आहे तेव्हा कुणीहि नोकरीवर ठेवल असत. नसत तर कॉन्ट्रॅक्टन काम केली असती पण तुम्हीं मला हे सार आधींच सागून टाकायला हव होत "

ओसरत आल्यावर गजूला आप्पाची कींव आली. इतकी की त्याच्या दुबळेपणावर सतापण्याचाहि त्याला कमीपणा वाटू लागला. त्यामुळ शेवटलं म्हणून म्हणाला,

" मग, घेऊ ना मी स्वतःच बोलून बाबासाहेबाशी ? "

" .. "

" आप्पासाहेब! "

" बोलतो म्हणतोस ? "

" मग काय तर ? किती दिवस वाट पाहू आणखी ? इकडे वार्षिक परीक्षा

जवळ येताहेत "

"चला, जेवण करू आपण "

"जेवण होत राहील. माझ काय ?"

"सागतो ना, तेहि सागतो, थाब जरा "

तशात बाळ तिथ आला. खिशातल फुटक पाकीट आप्पाजवळ दिल आप्पानी जरा हावरटपणानच ते घेतल. त्यात एक लहानशी लाबट पुडी होती. आप्पानी ती उकलली. आतल औषध बोटानी चिवडून पाहताना म्हणाले,

"एवढच रे ?"

"हो. डॉक्टर म्हणाले, पुरे होत--"

"काय पुरे होत म्हणा शाहण्या--"

"काय आहे हो ?"

"काही नाही. शौचाच औषध आहे "

आप्पानी पुडी परत बाधली. फुटक्या पाकिटात टाकली. त्या पाकिटावर डॉ. काकानीचा सपूर्ण पत्ता लिहिला होता. पण त्याकडे लक्ष घालू देण्याची आप्पानी कुणालाच सधि दिली नाही. पाकीट बाजूच्या रूकेवर व्यवस्थितपणे ठेवून दिल. मग खाटेखाली पाय सोडताना म्हणाले,

"हं, चला गजाननराव जेवायला !"



# तीन

ब्यूरोच्या कार्यालयात पगार—वाटपाचं काम सुरू होतं. पोतनीस क्रमाकाप्रमाणं पट्टेवाल्याकडून कामगाराना निरोप पाठवीत होता. पगाराच्या प्रतीक्षेत बसलेल्या कामगाराच्या घोळक्यात पट्टेवाला येत होता. नाव घेऊन ओरडत होता. कामगाराला पोतनीसाकडे नेत होता.

कामगाराच्या ह्याच घोळक्यात गजू आणि डॅनिअल बसले होते. एका बाकावर. कधी तरी पासून कसली तरी गंभीर फुसफुस करीत. आता गजू डॅनियलला विचारीत होता,

" फिर, तुम्हारी क्या राय है ? "

" आपण तर पहिलेच सांगितलं— "

डॅनिअल शुष्कशा आवाजात म्हणाला,

" जे काय करायचं, ते माणसानं विचारपूर्वक करायला हवं—"

" ते झालं हो ! पण विचार तरी किती दिवस करायचा ? इथं लागल्यापासूनच मी सतत विचार करतो आहे. म्हणून इतके दिवस लोटलेत "

गजूचा आवाज कातावल्यागत होऊ लागला,

" अहो, मी म्हणतों–मीं ज्याच्यासाठीं ही नोकरी पत्करली ते साधल नाहीं तर मग मला तिचा उपयोगच काय ? जुन्या नोकरींत वेळेवर पैसे मिळत नव्हते म्हणून क्लास बद पडेल की काय अस वाटत होत आता की भरण होत–पण क्लासमध्यें जाण होत नाहीं एकूण आगीतून निघून फुपाट्यातच घुसल्यासारख नाहीं काय हें ? अस असेल तर या नोकरीचा मला फायदा कोणता ? सागा ना तुम्हींच ? "

आपल्या कोंडमाऱ्याला सर्वस्वी डॅनिअलच जबाबदार आहे अशा अर्थी त्याच्यावर गजून डोळे रोखले याच डॅनिअलला हसु आल संसार रेटण्याच मुख्य साधन म्हणून तो नोकरीकडे बघत होता. सर्वांप्रमाण. गजू तिच्याकडे इतक्या क्षुल्लक हेतून बघत असेल–अशी गजूच्या तळमळीची त्याला कल्पना नसल्यान, अपेक्षा नव्हती. गजू आपला आग्रह सोडावयास तयार नसल्याच पाहून पण इथल्या नोकरीच्या महत्त्वामुळ अखडत्या सुरात तो म्हणाला,

" असच आहे, तर तुम्ही तुमच बघा बुवा! मी काय बोलणार ? "

आता मात्र गजूला आपल्या नोकरींतला दुवा तडकत असल्यासारख वाटल. असहाय्य, एकट पडत असल्याच्या जाणिवेन म्हणा वा घराच्या चिंतेन म्हणा त्याच्यातल तिच महत्त्व वाढल, पण क्षणातच त्याच्या जिद्दीन बोलवल,

" तुम्हाला काय वाटते, बाबासाहेब अजिबात नकार देतील ? "

" अ— "

खर तर बाबासाहेबाना त्याच्या तरुण सेक्रेटरीनहि ओळखल नव्हत ती सधि मिळण्याइतपत ते कुणालाच जवळ करीत नव्हते. तेव्हा डॅनिअलसारख्या ट्रेडलमनवर हा प्रश्न म्हणजे एक कोड होता. तो म्हणालाच,

" आपण काय सागाव बुवा ! "

हे गजूला सोसवल नाहीं. आप्पाकडून त्यान बाबासाहेबाचा जो चागुलपणा ऐकला होता तो पॉलीश करून डॅनिअलपुढ पसरवला. तो ऐकून डॅनिअल म्हणाला,

" असच असेल तर विचारा जाऊन प्रत्यक्ष ! "

" मीहि तेच म्हणतो— "

" लेकीन जरा सभालके, ह— "

" साभाळून म्हणजे काय ?"

यावेळीं गजूचा उत्साह इतका वाढला होता की बाबासाहेबापाशी त्याच वाकड होण्यासारख काही असू शकते यावर तो विश्वास ठेवायला तयार नव्हता,

" जास्तींत जास्त ते काय करतील असं वाटत तुम्हाला ? फार तर नोकरी-वरूनच काढून टाकतील ना ? वाघ नाहीं–तर एकदम गिळून टाकतील ! कुणी लाट–गव्हरनरहि नाहीं तर गोळी घालून शूट करतील एकदम "

गजूचा आवाज डॅनिअलला आजूबाजूला बघायला भाग पाडत होता तो खाली आणण्यासाठी डॅनिअल पुटपुटला,

"तुमची इतकीच तयारी असेल तर मग एवढा विचार तरी कशाला करायचा ? उठाव, सरळ कपार्टमेन्टमध्यें जाव आणि विचाराव स्पष्ट स्पष्ट "

" तेच ठरवलं आहे आता मी बस, एक घाव आणि दोन तुकडे ! इस पार या उस पार ! बाप दाखवा नाहीं तर श्राद्ध करा !"

गजूचा आवेश पाहून, त्याच्या कणवेन न राहवून डॅनिअल म्हणाला,

" लेकीन सभालके भला . "

" नाही तर काय करतील ? "

तोच उत्तरलाहि,

" नोकरीवरून काढतील, एवढच ना ? लाथ मारीन तिथ पाणी काढण्याची धमक आहे माझ्यात ! "

इथ डॅनिअलच्या तोंडात आल होत, " असच होत तर मग क्लास बुडवून इतके दिवस कसे काढले मुकाट्यान ? "

पण गजूला भडकवण त्याला अव्यवहार्य वाटल तो गप्प राहिला.

अशातच चपराशान गजूच नाव पुकारल. गजू पोतनीसच्या टेबलकडे निघून गेला. पोतनीस–प्रकरण मिटवल्यावर आवेशानिशीच कपार्टमेटशी आला. तसा त्याचा आवेश स्टुलावरल्या देवरावन थोपवून धरला त्याच्यापुढ कोर स्लीपबुक धरल. त्यावर नाव, हुद्दा, खात व मजला वगैरे लिहून घेतल. मग त्याला बाजूस थाबायला सागितल.

गजू देवरावसारखाच कंपार्टमेटच्या वडेला उभा होता. त्याला तस अर्धा–पाऊण तास तसच तिष्ठत राहाव लागल. मग आतली बडीं माणस अच्छा–

अच्छा करू लागलीं. आवाजावरून देवराव जागचा उठला. दार ओढून धरल. मडळी बाहेर पडत होती. सोबत कपार्टमेन्टच्या दारापर्यंत तरी बाबासाहेब येतील अस गजला वाटल. कारण बाबूराव गुप्ते साध्या पत्रिकेच्या गिऱ्हाईका-मागं सडकेपर्यंत पोंचवायला जात असत. तेव्हा बाबासाहेबानी त्याच्यासारखा पोषाख करणाऱ्या नि कोऱ्या गाड्यानी तिथ येणाऱ्या गिऱ्हाईकामाग कपार्टमेन्ट-पर्यंत जाण गजूला आवश्यक वाटल होत. पण बाबासाहेब खुर्चीतून उठलेहि नव्हते. कसेबसे ‘ अच्छा–अच्छा ’ काय ते करीत होते.

पाहुणे गेल्यावर आतून परतलेल्या देवरावन मुक्या माणसाला करावी तशी गजूला आत जाण्याची खूण केली. जाव की न जावस ठरवत गजू आत गेला.

गजू आतला प्रकार बघत होता. तो तर त्यान यापूर्वीहि पाहिला होता. पण त्यावेळची त्याची मनःस्थिति वेगळी असल्यान जी टापटीप आणि जो व्यवस्थितपणा त्याच्या लक्षात आला नव्हता तो आता अगदी वेगळ्या तऱ्हेन त्याच्या नजरेंत भरत होता. स्वतःच्या विचाराला विसरून गजू बाबूरावाच्या टेबलाशी बाबासाहेबाच्या टेबलाची तुलना करीत होता. बाबूरावाच्या टेबलवर नेहमी धुळीचा विरळ थर असे. कधी गॅली तर कधी पेजेसच्या प्रुफाची भेंडोळीं हवी तशीं टेबलभर पडलेली असत. टेबलरॅकमध्ये तर ती इतकी खुपसलेली असत की तो दिसेनासा होत असे. बाबासाहेबाच्या टेबलवर न्यूजप्रिंटचा कोराहि तुकडा दिसत नव्हता. त्याना कधीं काळीं लिहाव लागेल म्हणून जे पॅड दिसत होत, तेहि जपानी आर्टपेपरच होत. तीन रगात छापलेल. टेबलवर त्याच्या आकाराची काळसर रगाची जाड जपानी काच होती. तिच्या मधोमध अजूनदेखील ताज्या टवटवीत दिसणाऱ्या फुलाचा गुच्छ होता त्याचा किंव आणखी कुठून तरी येणारा सुगध कपार्टमेटभर पसरला होता. रूमभर गालीचा पसरला होता. टेबलभोंवतीं लोखडी खुर्च्यांची राग होती. रूममधल्या जवळ जवळ सर्वच वस्तूचा रगहि एकच होता.

याच वातावरणाला साजेशा बाबासाहेबाच्या व्यक्तित्वामुळहि असेल गजूचा उरला सुरला आवेश छाटला गेला होता. रूममध्यें तो शिरलाच होता म्हणून बाबासाहेबाच्या सवालाना खालच्या मानेन उत्तर देण्याचा हिय्या करू लागला,

“ मला आपल्याला एक विनति करायची होती. ”

“ कोणती ? ”

" मी नाईट-क्लासमध्यें शिकत असतो — "

" बर, मग ? "

" माझी मॅट्रिक व्हायची खूप इच्छा आहे — "

" आल लक्षात. पुढ ? "

" पुढ — "

बोलाव की न बोलाव या विचारात तो म्हणाला,

" आपल्या प्रेसमध्यें तीन पाळ्या असतात — "

" पण तुला काय म्हणायच आहे ? "

" मला, मला आपणाला एक विनति करायची आहे — "

बाबासाहेब मध्येंच अडवतीलशा धाकान तो एकदम बोलू लागला,

" की मला कोणत्या तरी एका पाळीला काम द्याव — "

" म्हणजे काय होईल ? "

" म्हणजे मला नियमितपणे क्लासला हजर राहता येईल आपण नेहमी-करिताहि मला रात्रींची पाळी दिल्यास तर मी करीन. दिवसा कोणत्या तरी शाळेत जात जाईन दिवसपाळी असली तरी माझी तयारी आहे "

" म्हणजे, हें तुझ जुनच रडगाऱ्हाण म्हणायच ? "

" नाहीं हो, शहा ? "

शहाला हें आठवत नव्हत पण ती म्हणाली,

" दुसर काय तर — "

म्हणून गजूलाहि मान हलवावी लागली,

नि म्हणूनच बाबासाहेबानीं त्याला विचारल,

" ही अडचण तू नोकरीचा अर्ज करताना का नाहीं माडली ? "

गजू बोलला नाहीं

" निदान मुलाखतीला आला तेव्हा तरी सागितल होत ? "

" त्यावेळीं मला आठवण नव्हती — "

" रॉग. तुम्हाला आठवत का हो शहा, कीं मीं ह्याला त्याच्या शिक्षणाबद्दल काय ठरवल आहे ते विचारल होत म्हणून ? "

" हो — "

खर तर शहालाहि आताच आठवल,

" त्यावर हे म्हणाले होते की मी शिक्षण सोडीत आहे म्हणून —— "

" का रे खर आहे ना ? "

गजू वरमल्यासारखा झाला.

" इथ हे नाहीं चालायच बर का ? तू धडधडीत खोट बोलतो आहेस. आमच्या मतें ही चोरी आहे जो शब्दाची चोरी करू शकतो तो पुढमाग वस्तूचीहि करण्यास मागपुढ पाहणार नाहीं.

" जाऊ दे घाबरू नकोस. या वेळीं ह्या गुन्ह्याबद्दल ब्यूरो तुला काहीं करणार नाहीं. "

आता राहिला तुझ्या तक्रारीचा प्रश्न त्याबद्दल ब्यूरोच्या वतीन मलाच तुला जाब विचारायला हवा कारण कामगारान आपली कोणतीहि तक्रार त्याच्या खात्यामार्फत करायला हवी असा ब्यूरोचा नियम आहे. आहे ना ? मग तू डायरेक्ट माझ्याकडे का आलास ? कोण आहे तुमच्या डिपार्टमेंटचा फोरमन ? "

" श्रीधरपत दिवाणजी —— "

" तर तुझी लेखी तक्रार प्रथम त्याच्याकडे जायला हवी होती. ते तू केल नाहीस. हा तुझा दुसरा गुन्हा तुझ्या ह्या वर्तणुकीन तू ब्यूरोजवळ स्वतःबद्दल आपुलकीच ठेवली नाहीं. तेव्हा तू ब्यूरोकडून कोणतीहि सवलत मिळविण्यास पात्र नाही, अस ब्यूरोच्या वतीन मी ठरवीत आहे. तू जाऊ शकतोस —— "

" पण एवढ वर्ष तरी पूर्ण करायची माझी खूप इच्छा आहे बाबासाहेब ! "

आता बाबासाहेब चिडले,

" आणि आम्ही परवानगी नाही दिली तर ? "

यावर मात्र, मागल्या जबाबदारीमुळ असेल नाहींतर बाबासाहेबाच्या धमकीदार डोळ्यामुळ असेल गजूच तोड बद पडल. तसे आपल्या अपुऱ्या कामाला लागताना बाबासाहेब म्हणाले,

" यू मस्ट गो ! "

तरी गजू हलेना तेव्हा शहाला वाटल गजूला हे समजल नसाव. ती म्हणाली,

" तुम्हाला जायला सागतात, साहेब ! "

तरीहि काहीं सेकद गजू हलला नाहीं.

# चार

कम्पार्टमेन्टबाहेर पडल्यावर गजला संताप आवरेनासा झाला होता. सवलत न मिळण्याच्या कारणापेक्षा बाबासाहेबांची वागणूकच त्याला अधिक भडकवून गेली होती. अशा वेळीं, त्याच्यासारख्या वाढत्या रक्तात संचारावा तो अविचाराचा भस्मासूर त्याच्यात संचारला होता. युनियनच्या ऑफिसबाहेर तरुण कामगार तावात येऊन मालकाबद्दल बोलत ते गजू आता स्वतःशी बडबडूं लागला होता.

अर्ध्या वाटेत येईपर्यंत तो सतत बेफाम होत राहिला होता. मग केशव जोशीच्या आठवणीनं त्याला थोडं आवरलं. तसं पहिल्याला भडकवलंहि. पण अति संतापलेला मनुष्य होतो तसा तो वरवरून शांत झाला. तावानिशी वाड्यात घुसला. एकदम केशवच्या दारात डोकं घालून म्हणाला,

"अहो, नानासाहेब!"

तिसऱ्या हाकेवर लीला दारात आली,

"नानासाहेब घरीं नाहीं—"

" कुठ गेले ? "

" माहीत नाही. "

" आत विचार बर ! "

तोच आतून आवाज आला,

" त्यान सांगितल नाही रे गजू ! तो सांगून नसतो जात सहसा. का, काय काम होतं ? "

" काम नानासाहेबाशीच होत काकू ! कधी येतील ते ? "

" काय सांगाव ! आतापर्यंत तर यायला हवा होता . "

" गावातच आहे ना पण ? "

" हो. असेल तर गावातच. नाहीं ग, लीला ? "

" मला नाहीं माहीत—"

" तर आल्यावर मला सांगाल काय ? "

" हो तू घरींच आहेस ना ? "

" अगदी घरींच. वाटल्यास कायमच समजा "

तिथच थबकून त्यान वाड्याबाहेर बघत म्हटल,

" पण ते रात्रीं कधींहि आले, तरी मला सांगायला विसरू नका काकू—"

" एवढ रे काय काम होत ? "

" काम जाऊ द्या. त्यानाच सांगेन बर, मी घरीच आहे. जातो—"

घरात घुसताच तो चपलासह आप्पाच्या खाटेवर टेकला टेकला कशाचा, चांगला ढुंगणावर आदळलाच. त्याचसरशी बोललाहि,

" सांगून ठेवतो आप्पासाहेब, काय वाटेल ते झाल तरी चालेल—पण आपण त्या नोकरीचा राजिनामा देणार ! "

नि तो आप्पाकडे न पाहता छातीवर फुकर घालू लागला. यात कटाळल तेव्हा कधीं आढ्याकडे घर कधी कशाहिकडे पाहून-न पाहू लागला.

दरम्यान डोळ्यात प्राण आणणारे आप्पा त्याच्याकडे बघत होते. खून करायला निघणाऱ्याकडे किंवा तो आटोपून आलेल्याकडे बघावेत तशा भय अन् अचंब्यान तो तर त्याच्याकडे बघायला तयार नव्हताच पण त्याची मान हलली कीं तो आपल्याकडे बघणार अशा समजुतीन ते झटकन् मान वळवत होते. हें सोसवेना तेव्हा त्याचा श्वास नेहमींसारखा जलद सुरू झाला.

थड-लाब उसासे आत-बाहेर होऊ लागले. त्यासरशी एकदा त्याच्या तोडून निघाल होत,

" ईश्वरा, तूच आहेस ! "

दुसऱ्यादा म्हणाले होते,

" नारायणा, किती अंत पाहतोस रे ! "

तिसऱ्यादा काहीं तरी ते बोलणार होते पण गजून त्याना श्वासासहच अडवलं,

" आता तुम्हाला काय झाल ? "

" मला नसल, तरी माझ्यामुळ "

" पण मीं तुम्हाला म्हणतोय काय ? "

" मी तरी तुला कुठ काय म्हणतोय ? "

" तर मग हे काय आहे ? "

" कुठ काय ? मी आपला स्वतःलाच म्हणतो आहे "

" तें का ? "

यावर गप्प राहण्याची हिंमत नव्हती, म्हणून आप्पा बोलले. आजारान आपण कसकसे कष्टी होत आहोत तें सागितल. छातीवर फुकर मारीत नि आढ्याकडे बघत गजू ते ऐकू लागला. खर तर सताप झटकारण्याची आप्पाकडून सधि मिळते की काय ते शोधू लागला. बरंचस बोलून होईस्तोवर गज बोलला नाहीं तेव्हा आप्पानी हिंमत करून पाहिली,

" का, काहीं झाल आहे काय आज ? "

" काय होणार ? "

" तरी पण ? "

" दैव माझ. आणखी काय असणार त्यात ? "

आणि त्याचा आवाज चढत गेला,

" आप्पासाहेब, मी तुम्हाला चक्क सागतो, आपल्याकडून त्या फॅसिस्टची नोकरी होत नाही. "

" कोण रे ? "

मुद्दाम की सहज कुणास माहीत, आप्पानी विचारल,

" कोणता फॅसिस्ट ? "

" तो--तो, साला बाबासाहेब फडके ! "

भयभीत नजरेन आप्पा आजबाजूला पाहू लागले.

" मी नोटीस द्यायच ठरविल आहे. "

" ऑ ? "

" हो. मी राजिनामा द्यायच नक्की केल आहे. "

" पण दिला नाहीं ना अद्याप ? "

" त्याला काय लागत ? उद्या सकाळी देणार आहे. "

" नशीब—"

म्हणत आप्पानीं मनातल्या मनात ईश्वराला हात जोडले मग म्हणाले,

" हे मला आधी सागतोस, तेवढच माझ नशीब. मला तू सावध केलस—"

" म्हणजे ? तुम्हाला न सागता मीं आजवर काय केल आहे ? "

गजू परत भडकू लागला. कारण एरव्हींचे आप्पा मुकाट्यान त्याचे वार झेलून सतापाला वाट देत असत आताहि ते नेहमींचे राहून वागले असते तर कदाचित् उद्याला तो भावनावश प्राणी करणार होता तो अविचार त्यान केलाहि नसता पण आता आप्पाहि नेहमींचे कुठ होते म्हणा. ते कोणत्या तरी तद्रीत असल्यासारखे दिसत होते. गजू बोलत होता,

" सागा ना, तुम्हाला न सागता मी काय केल आहे आजवर, तर हें करणार होतो ? "

" अ तस काही केल नाही म्हणा—"

" मग ? "

" अ मला म्हणतोस ? "

" मग, आहे कोण दुसर इथ ? "

" नाही. इथ एका ईश्वराशिवाय दुसर कोण असणार म्हणा— "

" मी तुमच्याशी बोल्तोय आप्पासाहेब! ईश्वराशी नाहीं. एवढ जीवन घालवल तुम्ही, पण अजून धड बोलताहि नाही येत तुम्हाला— "

करकचून ब्रेक्स दाबले असताना वाहन थाबेल तसा गजू थाबला. कारण त्यावेळी आप्पाचें धुसर डोळे चमकत असल्याच त्याच्या लक्षात आल. यान त्याच त्यालाच वाईट वाटायला लागल. त्याचा परिणाम एवढाच झाला की त्यान बोलण बंद केल.

एरव्हीं त्याच्याच्यान अस काही झाल असत तर कदाचित् तो आप्पापाशी

घुटमळत राहिला असता. आपल्या चुकीवर दिलगिरी व्यक्त करण्याच त्याच्यापाशी हेच साधन असे. आज मात्र त्यान ते वापरल नाहीं. फार तर मुकाट राहिला.

नेहमी त्याचा मुकाटपणा आप्पाना सोसवत नसे. वेळ प्रसगी त्याचे वार सोसायलाहि ते तयार होऊन त्याला बोलक करण्याचा प्रयत्न करीत असत. भडाभडा बोलल्यान माणसाच दुःख कमी होऊन तो मोकळा होतो, असा त्याचा अनुभव होता. पण आज प्रयत्नानहि ते तो राबवत नव्हते. त्याची जेवण मुकाट्यान होत होतीं. ताटातल सपल कीं वाढल जात होत. वाढल गेल की सपवल जात होत नको त्याला हातान अडवल जात होत. आटोपल की एकेकजण न्हाणींत जात होता. कुणी कुणाला आग्रह करीत नव्हत. कुणी कुणाला काय–क्स झाल ते विचारीत नव्हत. जेवणी आटोपल्यावर घुसत घुसत आप्पा आपल्या खाटेवर आले. कुणाच्याहि मदतीवाचून वर चढले

तोड कोरडवत गज केशवकडे डोकावला होता. केशव यायचा होता. तोवर काय करावशा विचारात गजून पुस्तक काढली. केशवकडे कान ठेवून पुस्तकात पाहू लागला. दार वाजल्यावर परत केशवकडे डोकावून पाहिल तो आला होता पण त्याचा चेहरा पाहून असेल गजून त्याला जवण करून घ्यायला सागितल. स्वतः पुस्तकात पाहू लागला पण आता त्याच्याच्यान पाहण देखील जमेना तेव्हा त्याचा पसारा आवरला घरातच आत–बाहेर करू लागला. येता–जाता त्याची नजर आप्पावर जायची. ते उताणे चित पडले होते पापण्याच्या सालपटाखेरीज त्याच काहीं हलत नव्हत त्याच अस पडण गजूला पूर्वी आवडेना. पण आता स्वतःला आवरायला तो म्हणे,

" मला काय करायच आता त्याच्र पडेना कसेहि "

केशवन ढेकरसह मारलेल्या हाकेपर्यंत गजूच हे चालल हाकेसरशी महत्त्वाच्या निकालाची तार स्वीकारण्यासारखा तो केशवच्या घरात जाऊन घुसला. त्याच्या ह्या भरतीच, अशाहि अवस्थेत आप्पाना नवल वाटल. नजर पुरेपर्यंत नि ती सपल्यावर कान लाववून ते गजूकडे पाहात–ऐकत राहिले केशवच दार बद झाल तेव्हा मात्र त्याच्याच्यान राहावेना.

जोशीबुवाकडे भविष्य बघायला आलेल्या सकटग्रस्त माणसासारखा गजू केशवपुढ बसला होता. आय्. सी. एस्. मुलाच्या बापासारखा केशव भितीला

टेकून बसला होता. वधुपित्यापुढं बोलावा तशा रुबाबात गजूशी बोल्त होता. गजू शक्य तितक्या लाचार अन् दबक्या आवाजात बोलत होता. वारवार आपल्या दारावर कान घालत होता. अशा तऱ्हेन पधरा–वीस मिनिटात त्यान आपल सार गाऱ्हाण केशवपुढं माडल. मुद्द्याचं बोलायला वातावरण तयार केल. सार ऐकल्यावर म्हणण्यापेक्षा, गजूचा उद्देश लक्षात आल्यावर केशव मुद्दाम म्हणाला,

“ तर यावर आता मीं काय कराव अस तुमच म्हणण आहे ? ”

ह्या पवित्र्यान आतावरच सार फुकट जात की कायसा गजूला हादराच बसला. पण ते जाऊ नये म्हणून तो बोलला,

“ माग, तुम्हीं नव्हत सागितल काय नानासाहेब–की तशी गरज पडल्यावर माझ्याकडे या म्हणून ? ”

“ अ, हो. पण माझ्याकडे तस नुसत येऊन काय उपयोग आहे ! बाकीची तयारी नको ? ”

“ सर्व तयारी करून आलो आहे. ”

“ मला तर काहीच दिसत नाही ! ”

“ तुम्ही सागा ना, काय–काय तयारी हवी आहे ? मी घर सोडायला तयार आहे. नोकरीचा राजीनामा म्हणाल तर आता लिहितो . तसा तर तो मीं कधीचाच लिहिला असता–पण म्हटल, नानासाहेबाचा सल्ला घेतल्याशिवाय लिहिण बर नाही–म्हणून आतावर थाबलो होतो ! बोला, आता लिहू ? ”

“ खरोखर इतकी तयारी आहे तुमची ? ”

गजूच्या डोळ्यात खोलवर बघत केशव म्हणाला,

“ सर्व गोष्टींचा अगदी पूर्ण विचार केला आहे ना ? ”

“ अगदीं पूर्ण–तुमचाच तवढा सल्ला हवा आहे ”

“ आप्पाच, बाळ–सुधाच कस होईल वगैरे बाबी लक्षात घेतल्यात ? ”

“ त्याचं, त्याच दैव जाणे. मी काहीं सर्वाना पोसण्याचा हवाला घेतला नाहीं घेतलाहि असता पण माझ्या मार्गात ते अडमडले नसते तर... पण आज माझी खात्री झाली आहे. जो–तो आपापल्या दैवानच खात असतो. मग मी कशाला वाहात बसू त्याची काळजी आणि माझ्या आयुष्याच मातेर करीत बसू ? तुम्हीच नव्हता म्हणालात काय माग ? ”

"हळू, हळू. हळू बोला!"

केशव म्हणाला,

"कुणी ऐकल तर ते मलाच म्हणतील की गजूला पढवण सुरू केल म्हणून!"

"आता गजू काहीं शेण खाणारा मुलगा नाहीं म्हणा. बाकीच्याना जसा आपला स्वार्थ कळतो तसा त्यालाहि कळायला लागलाय्-"

"मीहि तेच म्हणतोय. पण या जगात कुणाच बर करण बर नसत- म्हणून म्हणतों-"

"जाऊ द्या"

आपण इतका वेळ इथ काय करीत आहोत याची आप्पाना शका येईल म्हणून तो म्हणाला,

"तर तुम्ही मला काय मदत करू शकाल या बाबतीत?"

"सर्वच कबूल केल ते सार करीन मी तुमच्यासाठी. त्याची तुम्ही अजिबात काळजी करू नका. आपला शब्द म्हणजे शब्द असतो हे तर तुम्हालाहि माहीत आहेच—"

"नोकरी मिळेपर्यंत माझी कुठ तरी राहण्याची व्यवस्था कराल?"

"अवश्य. जागेला काय कमी आहे हो—"

"आणि—"

गजू भीत भीत म्हणाला,

"तोवर खर्चायला पैसे?"

"अहो, ते आलच ओघान —"

"हे मी एवढ्यासाठी विचारतोय् - सध्या परीक्षा आली आहे जवळ - तेव्हा मध्येंच या बाबीची चिंता नको म्हणून —"

"ते साऽर आल माझ्या लक्षात. अहो, मनात आणल तर चोवीस तासाच्या आत मी तुम्हाला नोकरीहि लावून देऊ शकतो! आधळ्या-पागळयाना मुली मिळवून देण्यापेक्षाहि हें काम कठीण वाटत की काय तुम्हाला?"

"तर मग लिहू मी राजिनामा?"

"खुश्शाल!"

तरीहि गजू म्हणाला,

"बघा बर?"

" माझ्यावर तुमचा विश्वास — "

" त्याशिवाय काय ! "

म्हणत गजून सदऱ्याच्या खिशातून कागद काढायशीं नि त्याच्या व्हराड्यात आप्पाचा खोकला उसळायशीं एकच गाठ पडली. भाबावून त्यान केशवकडे पाहिल. त्याच नजरेन केशवहि त्याच्याकडे बघत होता. या दरम्यान व्हराड्यातला खोकला धिम्मेधिम्मे आत चालला होता. तो दूर जात असल्यामुळ कमी कमी वाटत होता पण खर तर तो वाढत होता. छातीवर हात आवळून खोकणाऱ्या-सारखा आप्पाचा आवाज येत होता. तो थाबेचना. तरीहि पेन सावरून गजू म्हणाला,

" काय लिहू ? "

" लिहा — "

" श्री रा रा व्यवस्थापक, शाम प्रिंटिंग ब्यूरो यास – सा. न. वि. वि.—"

पण आप्पाच्या खोकण्यान केशवची तद्री अडवली तो म्हणाला,

" आप्पा खूपच खोकताहेत हो ! "

" मरू द्या. काय कराव लागत आता आपल्याला त्याच्याशी ? "

" ह, सागा. पुढ काय लिहू ? "

" पुढ . कुठवर आल ? "

गजून वाचून दाखवल. पण केशवच्या कानी आप्पाच्या खोकण्याखेरीज काहीं येत नव्हत. तेव्हा तो म्हणाला,

' गजाभाऊ, आप्पाकडे जाऊन बघायला हव. हें खोकण काही साध वाटत नाहीं बुवा ! "

" मरू द्या ना हो ! "

" ते झाल हो मरणार असेलच तर तुमच्या गेल्यान वाचायचे नाहींत. पण उगाच आपल्यावर बोल नको लोकाचा की हे इथंच बसले असताना "

हे केशवच सागण होत, म्हणून गजूला ऐकण भाग वाटल. उठताना तो म्हणाला,

" मग हा राजिनामा ? "

" होईल मग. उद्याहि लिहिला तरी काहीं हरकत नाहीं. आता तर रवाना करताच येत नाही — "

हे गजूच्या आता लक्षात आल. त्यान लेखनाच साधन तिथच कुठतरी दडपून ठेवल 'आप्पाना जास्तच काहीं झाल तर बोलावयला या' हा केशवचा हुकूम झेलून गजू घरीं आला.

पाहतो तर आप्पाचा खोकला कमी झाला होता. ते खाटेखाली पाय सोडून बसले होते. नुकत्याच खोकण्यान त्याचा चेहरा अंधारातहि जाणवण्याइतका तावडला – लाल झाला होता. ते पूर्वीसारखेच कुठ तरी बघत होते. गजूकडे बघत नव्हते. यामुळ गजू खूपच चिडला होता. त्याच्या बोलण्याच निमित्त साधून तो चिडेला मोकळ करणार होता. कदाचित् त्याचमुळ असेल, आप्पा बोलत नव्हते.

आदळ – आपट करून गजून अथरुण टाकल. पाघरुणाच्या फटींतून तो आप्पाकडे एकटक पाहात राहिला. तसाच त्याचा डोळा लागला – पण आप्पा श्वास घेण्याइतकेहि हलले नाहींत.

तो घोरू लागला तेव्हा मात्र आप्पाची मान हलली. त्यानी प्रथम पाहिल – ते गजूच्या अथरुणाकडे. मग हाक मारली,

"गजानन!"

"अरे, माझ्या गजानना!"

बस, नतर अंगात काहींतरी सचारल्यासारखे ते आपल्या कामाला लागले. बाळच्या दप्तरातून कागद आणि गजूच्या खिशातून पेन काढला.

# पांच

त्या घरात एरव्हीं सर्वांत उशिरा गजूच उठत असे. पण आज तो, आपल्या वेळेपेक्षा उशीर करूनहि अगदी सर्वांत पहिला ठरला. पाहतो तर सारी दार-खिडक्या, अगदीं मध्यरात्री असाव्यात तशा बंद होत्या. कोंडलेल्या अंधारात दिवालगिरी आपलं काम बजावत होती. सुधा नि बाळ आपापल्या अथरुणावर लोळत पडली होती.

दूर कशाला, आप्पासुद्धा खाटेवरच होते.

एरव्हीं त्या घरात सकाळीं पाच पासून आप्पाच्या हाका घुमू लागत असत. त्याची इच्छा नसून गजूची झोपमोड होत असे. तरी ते भीत – दबकतच सुधा–बाळवर ओरडत असत. हलूं लागल्यापासून पोरांना खलाखला हलवून, दात–ओठ रगडून जागं करीत असत. चळफळत सतापत तीं पोर कामाला लागत असत. बाळ अथरुण काढत असे. अलीकडे अंगण झाडण्याची लाज वाटते, म्हणून त्यानं घर झाडण्याचं काम आपल्याकडे घेतलं होतं मग तो नळावर खेपा घालीत असे. सुधा भांडीं – कुंडी घासत असे. चूल पोतेरत असे. वेळ असला तर ती नाहीं–तर बाळ चुलीवर चहा ठेवत असे. ती वेणीफणी करीत असे. आप्पाचा ज नरेख

त्याना भाडू देत नसे. चहा उकळल्यावर ते गजूला उठवत असत. गजूच्या हातात चहा ठेवून सुधा शाळेच्या वाटेन लागत असे.

अजून अंथरुणात असलेल्या गजूला अबकारी अधिकाऱ्याच्या घरातल्या सिलोनन वेळेची जाणीव दिली. एव्हाना गजू ब्यूरोंत असयाला हवा होता तो चिडला,

" काय साली घरातली माणस हीं! ज्याच्या माथ्यावर जगायच त्याला वेळेवर उठवूनदेखील देत नाहींत! अशान नोकरी सुटली म्हणजे, मला खातील काय ?"

हे तो म्हटल तर बाळ नि म्हटल तर आप्पाकडे बघून बोलत होता कुणीच हलेना, तसा ओरडला,

" बाळ ! "

" ये, बाळटल्या ! "

त्यानच परत आप्पाच्या अथरुणावर बघत म्हटल,

" ये, सुवटले ! मेलीस कीं काय कार्टे ? "

ही आरडाओरड बाळला चाळवू लागली होती.

पण तोवर गजूला रात्रींचा प्रकार आठवला. त्यान त्याला एकदम ताजं केल अगावरल्या पाघरुणासह त्यान नोकरीची काळजी झटकून टाकली. जागचा उठताना सर्वांना उद्देशून म्हणाला,

" झोपा आता असंच "

न्हाणीत त्याला केशवची आठवण झाली. तो बिळाबाहेर पडू नये म्हणून गजून तोंडावरून नुसता हात फिरवला. कशाबशा गुरळ्या पिचकारत तो माग फिरला सैपकाघरातला बाळ म्हणत होता, " किती वाजले रे दादा ? "

" दहा ! "

गजू म्हणाला, " झोपा ना, का ? "

" अरे, बापरे ! "

" झोपा, झोपा मस्तपैकीं ! "

" आजपासून सकाळची शाळा आहे रे ! "

" बघतोय्, किती दिवस चालतेय् तर — "

" तोंवर गजू न्हराड्यात आला होता. मग केशवच्या. केशव तिथ नव्हता.

तो स्वयपाक – घरात चहा ढवळत होता गजला त्यान तिथच बोलावून घेतल. पाट माडून बसता बसता गजूला कालच्या साधनाची आठवण झाली तीं घ्यायला तो कोनाड्यात आला. परतला तेव्हा केशव विचारीत होता,

" ह काय ठरवल आहे ? "

" कशाबद्दल ? "

" रात्रीच्या निर्णयाबद्दल, आणखी कशाबद्दल ? "

" त्याबद्दल आता आणखी काय ठरवायच आहे ? "

लगोलग गजूला केशवचाच सशय आला. तो म्हणाला,

" तुमच नक्की आहे ना ? "

" अहो, हे काय विचारण झाल ? तुम्हाला सागितल ना, आपला शब्द म्हणजे शब्द !

" मी तुम्हाला अशासाठीं विचारल—रात्रीत तुमचा विचार बदलला की काय ? "

" कारण ? "

" कारण तस काहीं नाहीं. पण भावनाप्रधान माणूस आवेश ओसरल्यावर बदलत असतो–म्हणून म्हणतो ! "

" मी हा निर्णय विचारपूर्वक घेतला आहे नानासाहेब याच्यात आता कधीं बदल व्हायचा नाहीं ! समजले ? "

" तेच म्हणतो ! "

कसल्या तरी विचारात अडखळत तो म्हणाला,

" ह, आधी चहा घ्या—"

गजू चहा घेऊ लागला. केशव म्हणत होता,

" काल आप्पासाहेब काही म्हणाले होते काय ? "

" नाही. आणि म्हटल असत तरी ऐकणार कोण होत ? उलट, मी तर हेंच बघत होतो की त्यानी काहींतरी बोलाव म्हणजे मला चागल सुनावता आल असत त्याना ! "

गजूची ही मजल पाहून केशव निर्धास्तावला. मोठ्याच मोकळेपणान म्हणाला,

" मग आता, घ्या बर राजिनामा लिहायला लवकर ! "

नि तो राजिनाम्याचा मजकूर सागू लागला. गजू भराभरा लिहू लागला.

तशात व्हराड्यापासून ' दादा ' ' दादा ' करीत आलेली बाळ–सुधाची जोडी गजूलाच अडली. सवड सापडली तस तो बोलला,

" दादा, आप्पा बघ कसे वाकडे–तिकडे झोपले आहेत—"

" मग मला काय सागतो ? झोपा ना म्हणाव बारा वाजेपर्यंत "

" तस नाही रे ! "

कस सागाव हे न सुचून सुधा म्हणाली,

" ते मेल्यासारखे झोपले आहेत ! "

" चल, काहींतरी नको बोलूस ! "

केशव म्हणाला, " अस कुठ बोलत असतात कधीं ? "

एवढ्यातच गजूत शका भिनली होती रात्री आप्पा कसकसे वागले ते सार त्यालाच ठाऊक होत. तरी पण त्याचा अर्थ असा निघावा, हे त्याला पटायला वेळ लागला. तो केशवकडे पाहू लागला.

बाळ सुधाची घाबरट विनवणी सुरूच होती. त्याचे चेहरे पाहवेनासे झाले होते. तेव्हा गजूला केशवची आई म्हणाली,

" अरे, जाऊन तर बघा काय आहे ते––"

म्हणून नव्हे तर एकमेकाशी न बोलता गजू–केशवचहि ठरत आल होत. म्हणून ते जागचे उठले. पाहता पाहता गजून सर्वांना माग टाकल. सुधा–बाळ मध्यें राहिली. नतर केशव चालत होता.

खाटेवर पाहतात तर आप्पाची मान उशीच्या एकीकडे कलली होती. तोडाचा मोठा ' आ ' झाला होता. आत कसल तरी चिकट–निळसर थारोळ साचल होत. गजूच्या धक्क्यान तोड आणखी कलल थारोळ हिंदकळल. गजून तोड खलाला हलवल तस थारोळ आणखी आणखी हिंदकळायच. पण आप्पाच तोड मिटल, सावरल जात नव्हत. तरीहि गजू–केशवन आप्पाना बोटी बोटीत चाचपून पाहिल. शेवटला उपाय म्हणून गजून त्याच्या दुसऱ्या पायाला जोराचा हिसडाहि देऊन पाहिला

तोवर बाळ–सुधाहि रडण्याच्या घाईला आली होतीं कधी कुणास माहीत, गजहि त्याच्यात सामील झाला होता. आप्पाच्या अगावर आडव पडून तो आकाश–पाताळ एक करीत होता.

तरीहि केशव साशकच होता. समाधानासाठी आजूबाजूला बघत होता. पाहता पाहता त्याला एक चुरगळलेला कागद दिसला. पण ते तोड फुटक पाकीट होत. डॉ काकानीचा संपूर्ण पत्ता त्यावर लिहिला होता. मथळयावर औषधाच्या एका फर्मच नाव छापल होत पाकीट उलटवल गेल तेव्हा त्यात निळसर-पाढुरकची पावडर कोपऱ्यात अडकून बसल्याच केशवच्या लक्षात आल आप्पाच्या तोडातहि ह्याच रगाच थारोळ साचल होत.

यान केशव आणखी बावचळला खाटेच्या खालवर आजूबाजूनी तलाशी घेऊ लागला. आप्पाच्या उशीखाली बाळची वही सापडली. तिच्यात खुणेसारखा गजूचा पेन होता. तिथूनच केशवन वही उघडली. फार ठळक आणि वाकड्या-तिकड्या ओळीत खालील अर्थ भरला होता. बाहेर उजेडाशीं वही धरून केशव तो उलगडू लागला,

" माझ्या गजानना !

" काल तू मला खूप बोलला. चालायचच तुझ्याएवढा मी होतों—तेव्हा इच्छेविरुद्ध नोकरी करताना मीपण आई वडिलावर असाच सतापत असे कधी कधी ! पण इतक सतापण आपल्यासारख्या दुबळ्याना पचत नाही. माणसान स्वत ला काबूत ठेवाव. एवढ्या-तेवढ्यान राजिनाम्याच्या गोष्टी करीत राहशील तर तुला कुणी नोकरीवर घेत जाणार नाही. फिरत्या वाचनालयासारखी तुझी नोकरी सतत या घरची-त्या घरीं फिरत राहील.

" कालवर, लगडा-आधळा का होईना-मी होतो म्हणून तुझी समजत काढीत होतो. उद्यापासून तुझी समजूत कोण काढीत जाईल ? तुला जगात माणस मिळणार नाहींत असं नाही. सल्ला देणारी खूप माणसं असतात. पण ती कोणत्या हेतून आणि उद्देशान सल्ला देतील ते ओळखण्याइतका तू अजून मोठा झाला नाहीस अस मला वाटत. खर तर भावनावश माणूस कधीच प्रौढ होत नाहीं म्हणा ! तरी काय करायच, वागायच हे तुला यापुढ स्वत च ठरवायच आहे—ते तुला शिकायला हव—"

केशवन ग्लोलीत पाहिल. त्याच्या हालचालीची कुणालाच दखल नव्हती सारीजण आक्रोशात वाहात होती. केशवला बर वाटल. तरी तो आणखी पुढ

सरकला पण उजेडात धरण्याच्या निमित्तानच. वाचू लागला,

" आता तरी माझ म्हणण तुला मानवत की नाहीं कुणास महीत. त्यासाठी बापान आयुष्यात कराव लागत तें माझ्याच्यान, तुझ्या तरी बाबतींत काहीच घडल–झाल नाही. उलट न पेलणारा ससार मी तुझ्यावर टाकून पळ काढीत आहे.

" आता माझी इच्छा म्हण, मागण म्हण वा सागण म्हण–एकच आहे. तू बाळला मॅट्रिक करू शकला तर आपल्या कुटुबाची गाडी, जी गेल्या तीन पिढ्यापासून घरगळत आहे—ती कशीबशी रुळावर येईल. हे नाहींच जमल, तरी सुधाकडे मात्र लक्ष असू दे. तिला आता बाराव लागत आहे. एक–दोन वर्षांत ती चागली बाईच दिसायला लागेल.

बाळ–सुधा माझ्या लाडाची आहेत म्हणून मी त्याचा कळवळा घेतो अस नाहीं तीं छोटीं आहेत. तुझ्याइतकदेखील सामर्थ्य–हो, आता त्याला सामर्थ्यच म्हणाव लागेल–त्याच्यात नाहीं कदाचित् ते बाळमध्ये असत तरी मी त्याच्यावर तुझ्याइतका भरवसा टाकला नसता. सुधाच आयुष्य तर त्याच्यावर मुळींच सोपवल नसत.

" खर तर त्याच्या भवितव्याची विल्हेवाट लागेपर्यंत मला जगायच होत. पण जो बाप आपल्या मुलाना त्याच्या काळच जीवन जगण्यास समर्थ करू शकत नाहीं, त्या बापाला त्याच्या मिळकतीवर जगण म्हणजे हातावर आणून पानावर खाणाऱ्याकडे निकामी पाहुण्यान ठाण ठोकण्यासारख आहे.

" म्हणून मी जात आहे. तुझा, आप्पा— "

पत्र सपताच केशवन माग पाहिल. त्याची आतल्या कुणालाच दखल दिसत नव्हती. हेच हव असलेला केशव आता आजूबाजूला बघत होता. विशेषतः शेजारच्या माड्यावरील खिडक्या–दारात. त्या उघड्या असून त्याच्या खाली बद होत्या. तस त्यान मृताच्या देहाखाली सापडलेल ऐवज हडपाव तस ते पत्र आपल्या खिशात दडपल. मग सावपणें हलकल्लोळाशीं आला.

तोवर तिथ जवळ जवळ सारी चाळ जमा झाली होती सुधा ते गजूपर्यंतच्या सर्वांना समजावत होती.

## सहा

पाहता पाहता गजूच्या घरातली सारी सूत्रं जोशी-कुटुंबानं ताब्यात घेतली होतीं. केशवनं खिसाच मोकळा ठेवला होता. त्यामुळं त्या घरातला खरा करता-करविता तोच दिसत होता. बायकांत लीलाची आई आणि पुरुषांत केशव अन् त्याचे वडील राबत होते खरं तर ते बाप-लेक गजूला राबवत होते. हे कर, तें कर, असं करू नये, तसं करावंच लागतं वगैरे सांगत होते. त्यांनी सांगितलेलं कधीं गजूला जमत नव्हतं. निदान अनुभवी जोशीबुवांना तसं वाटत होतं, तेव्हा ते स्वतः मध्यें पडत होते. दिग्दर्शकासारखं करून, समजावून दाखवत होते. मग ते गजू करीत होता. मुक्या-बहिऱ्यासारखा राबत होता. सुरुवातीचे चार-पाच दिवस त्याचा शब्दसुद्धा कुणाला ऐकायला मिळाला नव्हता. नंतर तो बोलू लागला होता. जबरीनं बोलवलेल्या माणसासारखा. अलीअलीकडे कुठं त्याचा आवाज मोकळा सुटू लागला होता. पण आप्पाची क्रियाकर्मं मध्येच तो आवळत होता. एखादी क्रिया आटोपल्यावर दोन-दोन तास गजू अबोल राहात असे.

केशव मात्र लग्नघरात वावरावा तसा वागत होता. कोपऱ्यात कुठ कुणी कुजबुजत असल तर कान टवकारत होता. डोळे वासत होता. पहिल्या ऐकल्यातून अर्थ ओरबाडत होता. नच जमल तर विचारत होता,

" का हो, काय हव आहे ? "

एकदा कुणीतरी म्हणाल होत,

" न्हावी धोतर नेतो म्हणतो ! "

" नेऊ द्या ना ! तो त्याचा हक्कच आहे ! "

एकदा कुणी तरी गजूपाशी फुसफुसत असताना केशवन विचारताच म्हणाल होत, " काही नाहीं लाकूडवाल्याला पैसे द्यायचे होते—"

" तर मग मला सागा ना—"

केशव बाजूच्या अण्णावर चिडत म्हणाला होता,

" का हो, अण्णा ! तुम्ही इथ असून गजाभाऊना पैसे मागू देताहात ? अशा मन:स्थितीत त्याना काहीं सुचणार आहे काय ? "

" ह, सागा–किती पैसे झालेत लाकडाचे ? "

" इतके ?

" काय भाव लावला हो ?

" तुम्हालाहि कमवायचे हेच दिवस आहेत काय ? "

बोलता बोलता, केशव खिशातून पैसे काढत होता. नसले तर घरातून आणत होता. मागणाऱ्याच्या हातावर ठेवत होता. त्याची बोळवण करीत होता

खर तर गजू यामुळच बोलायला लागला होता. अगदीं पहिल्यादा म्हणाला होता, " तुमच्यावर फार ओझ पडत आहे, नानासाहेब, आमच ! "

" अहो, याला कुठ ओझ म्हणतात काय ? ह्या साऱ्या गोष्टी, माणसानीच माणसासाठी करायच्या असतात. पशू नसतात करीत एकमेकासाठी काहीं-काय, कस म्हणतो ? "

दुसऱ्यादा गजू म्हणाला होता,

" तुमचे हे उपकार, माझ्याच्यान कधीं फिटतील, कुणास माहीत—"

" फिटतील, फिटतील ! "

न जाणे कोणत्या हेतून केशव म्हणाला होता,

" तुमच्यात ही भावना शेवटपर्यंत राहिली, म्हणजे मिळवल. बस ! "

तिसऱ्यादा गजू म्हणाला होता,

" खर्चाचा हिशोब ठेवताहात ना, नानासाहेब ? "

" हिशोब काय ठेवायचा त्यात ? तुमच्या घराला मी वेगळ समजतों, असाच तुमचा अजून समज आहे काय ? मग मात्र मेलो, ठार ! "

" तस नाही नानासाहेब—"

" तेच म्हणतो. मग काहीं हरकत नाही. आहेत आप्पाच्या दैवान, म्हणून करतोय खर—"

" तरी पण—"

" ह, असे बसू नका ते बघा, अण्णा काय म्हणतात—"

अस केशवच सतत चालू होत.

आता काहीं मडळींसह गजू स्मशानात होता, बाळ – सुधा शक्य तितकी गजजवळ राहण्याचा प्रयत्न करीत होती. आप्पा गेल्यापासून त्याच्याकडून गजूला सोडवत नसे. बाळहि परमेश्वराच्या शब्दासारखा गजूचे शब्द मानीत असे. इतका की गजून विहिरीत उडी घ्यायला सांगितली असती तरी त्यान का – कशाला केल नसत. आतावर नव्हतहि. केशव नि जोशीबुवा तर हाता-पायासारखे गजूच्या सोबत असत. त्याच्याखेरीज तो जागचा हलूच शकत नसे. याशिवाय आणखी काहीं माणस गजूभोवती बसली होती. अबकारी अधिकारी, जमादार, वॉचमेकर, बकाराम न्हावी वगैरेहि होतेच. हीं सारी आता एका दाट चिंचेच्या झाडाखाली बसली होती उन्ह नुकतींच तापू लागली असून तीं मे – जूनातल्या उन्हासारखीं तडतडत होतीं. हा कदाचित् तिथल्यां वातावरणाचाहि परिणाम असावा.

पुढ्यातल्या दगडावर पिंडासाठी भात खदखदत होता. मधून – अधून गजू भाताशीं जात होता. त्याखाली कधी कधी गोवऱ्या लावत होता, तर कधीं फुंकर घालत होता. तर कधीं विस्तव कोरत होता. हें करताना उडणारी राख गजूच्या तुकतुकीत टाळक्यावर सर्वभर लागली होती. ओल्या पचा धोतराला चिकटली होती. बसायची जागा मातींत घुसळल्यासारखी झाली होती

जाभयीसरशी भात शिजला असल्याचा केशवन निर्वाळा दिला. सर्वांनी तें मानल. तोंडाप्रमाण तीं गजूला हलवू लागली. गजू स्नानाला गेला. सुधान पळस ओरबडला, बाळन बाभळीचे की कशाचे तरी काटे आणले. कुणी तरी

पत्रावळी वळू लागल. चारी अंगानीं चर्रर थबथबत गजू तिथ टेकला. तेव्हा जोशीबुवाची शास्त्रोक्त हालचाल सुरू झाली. मंत्रोच्चाराच्या गजरात पिंड पाडून झाले. पूजापाती केली. आकाश अन् आजूबाजूच्या झाडाझुडपाकडे बघत नि कावळयासारखे वाटणारे सारे आवाज बारकाईन ऐकत गजूसह बाळसुधाना पिंडापाशी लोटांगण घालायला लावल तोवर एकान पिंडासाठीं टपून बसलेल्या कुत्र्याला लाबवर हाकलून लावल. लांबच्या सावलीत कुत्र दोन पायावर टेकल्या-वर त्याच्याकडे बघत बघत तो बाकीच्या सोबत्यात येऊन टेकला.

आता तीं सारी एका बाभळीच्या झाडाखाली येऊन बसली होतीं

वेळा जात होती. चाळा म्हणून एकजण लांबच्या कुत्र्यावर डोळा ठेवून होता. एका लाबवरल्या जळत्या प्रेताकडे बघत होता. एक त्या प्रेताच्या भट्टींत वासा कोरणाऱ्याकडे बघत होता. एक एका कोपऱ्यात खोदल्या जाणाऱ्या खड्डयाकडे बघत होता. एक खड्डयाची वाट पाहणाऱ्या माणसाच्या घोळक्याकडे बघत होता. हा घोळका गोन्नीच्या झाडाखाली बसला होता. त्यातल्या एकाच्या कवेंत कोऱ्या तुसान लपेटलेला खड्डयाचा मालक होता – त्याच्याकडे गजूचा एक सोबत टक लावून बसला होता. दोघ – चौघ वेड लागल्यासारखे सारीकडे बघत होते. कुठलहि झाड फडफडल की या वेडयाच्या जिवात जीव येत होता. फडफड थाबली की वेड वाढत होत. बाकीची सारीं आप्पाच्या पिंडाभोवतीं बघत होती. तिथून अगरबत्तीचा धूर निघत होता. हातभर उंचीपर्यंत स्पष्ट दिसत होता वाऱ्याची लहर तोहि उमटू देत नव्हती. अगरबत्त्या विझल्यात की काय अशी बाळ – सुधाला शका येत होती.

पाच – सात मिनिटानतर गजूचा घोळका चुळबुळू लागला बैठका हलल्या. कुणाच्या जाम बसल्या, बकारामन विडी पेटवली अबकारी अधिकाऱ्यान काडी मागवली. जमादारान तबाखू चोळायला घेतला. वॉचमेकर वेडयासारखा चारी-कडे बघत म्हणाला, “ अ, म्हणण तरी काय म्हाताऱ्याच ? ”

“ काय असणार आहे ? ”

केशवन घाई केली, “ सार तर केल आहे आम्ही चष्मादेखील दिला होता, सोबत – का हो, गजूभाऊ ? ”

यावर बावळटासारखा दिसणारा गजू काहीं बोलला नाहीं. आतल्या आत चुळबुळत राहिला

दुसरा कुणी दर्दी आवाज उत्तर देत होता,

“ मग, इतका उशीर का तर ! ”

“ ते त्यानाच माहीत -— ”

“ अहो, लक्ष नसेल ! ”

“ वा ! तीनदा तर येऊन गेले इकडल्या बाजून ”

“ आमच काहीं चुकल असेल – तर क्षमा करा आप्पासाहेब ! तुमची मुल लहान आहेत – त्याना काहीं कळत नाही ”

“ कुणाला म्हणतात रे, दादा ? ”

“ आप्पासाहेबाना, आपल्या आप्पासाहेबाना ”

“ त्याना ऐकायला जात काय ? ”

“ हो. ”

“ वा ! हें काय त्याना सागायला हव काकासाहेब ! तो जीव आता सर्वज्ञ नाही काय झाला ! ”

“ मीहि तेच म्हणतो ! ”

“ वर्षश्राद्धाला सवाष्ण – ब्राह्मण घालीत जाऊ आम्ही ! हो ना रे, गजू ? ”

“ हो. ”

“ म्हण – मी दरवर्षी तुमच्या नावें सवाष्ण – ब्राह्मण घालीत जाईन — ”

“ हो. घालीत जाईन ना ! ”

“ अहो, तसं नाही. ”

कस ते करून दाखवीत केशव म्हणाला, “ ह, आता म्हणा — ”

गजून तसं केल नि म्हटलहि

तो टेकतो न टेकतो तर कुठून तरी दोन पक्षी पिंडावर येत असल्यासारखे दिसले. अवतींभवती घिरट्ू लागले. ते ओळखू येण्याच्या आत एकजण अबकारी अधिकाऱ्याकडे तोंड करून म्हणाला,

“ पहा, पहा. अशा आहेत जुन्या रुढी. तुम्हाला नाही पटत अलीकडल्या लोकाना — ”

पण बोलून सपायच्या आत पिंडाभोवतीचे पक्षी आल्या वाटेन निघून गेले. बोलणाऱ्याचा चेहरा कसनुसा राहिला.

दहा – पधरा मिनिट पुन्हा तशींच गेली.

नतर सर्वांतला कटाळा परत बोलका झाला,

" म्हाताऱ्याच म्हणण तरी काय आहे ?"

" काय सागाव ! का रे, गजू ?"

गजू नुसताच चुळबुळला.

" अरे बोल ना ? मरतेवेळी काहीं सांगितल होत काय आप्पानी ?"

आप्पा गजूला खूप सागत असत. ते सार इथ, निदान या क्षणी अन् त्याला तरी सागण शक्य नव्हत. आग्रह वाढल्यावर त्याला पुटपुटाव लागल,

" त्या रात्रीं ते माझ्याशी काहींच बोलले नव्हते ––"

" काही भाडण – भिडण झाल होत काय रे ?"

" भा  ड . ण ––"

गजूला खोट बोलवल नाही,

" हो  थोडासा मी सतापलो होतो त्या रात्री ––"

यावर मध्येच केशव म्हणाला, " काहींतरीच  अहो, त्याला  काय सतापण म्हणतात काय, गजाभाऊ ! घर तिथ हे सार आलच ––"

" तरी – जे  काय बोलला असेल  तो – तेच लागल  असेल म्हाताऱ्याला ! का हो जमादारसाहेब ?"

" सही तो बात है —"

" तर मग मागून  बघ क्षमा ! म्हण, माझ्याच्यान तुम्हाला काही  वाकड – तिकड बोलल गेल असेल तर त्याची  क्षमा करा. मी लहान आहे ! चूक झाली माझ्याच्यान ! का हो ?"

" हा – हा, बरोबर आहे —"

" तसा तो  म्हातारा समजदार  होता. पोराना  क्षमा करणार नाही तर मग कुणावर करील ! माग रे गजू क्षमा —"

म्हटल तर  झाड नि म्हटल  तर पिंडाकडे तोंड  करून, हात जोडून – गजून क्षमाहि मागितली. खाली बसला   नतरची चार–दोन मिनिट सर्वांची उत्सुकता वाढली. पाहता, पाहता वाढली – तशीच अकारण दबूनहि गेली.

आणखी चार – सहा मिनिट गेल्यावर लाब श्वास घेत एक आवाज म्हणाला,

" कठीण आहे, पाडुरगा कठीण आहे !"

" का हो, आप्पासाहेब विशेष कशाची काळजी करीत ?"

" विशेष...तसे तर ते सर्वच गोष्टीची काळजी करीत. माझ्या नोकरीपासून तर आपल्या डोळ्यापर्यंत — "

" तुझी नोकरी चालूच आहे. त्याच्या डोळ्याचा आता प्रश्नच नाहीं. दुसर कांहीं ? "

" . "

" आठवा, आठवा नीट !"

" मला तर काहीं आठवत नाहीं, बुवा—"

तो केशवकडे बघत म्हणाला, " का हो, तुम्हाला काहीं ? "

" मला कस शक्य आहे हो !"

केशव गजूला डोळा घालत म्हणाला," मी तुमच्या घरातला आहे की—"

" तर मग होणार कस ? मला आता एके ठिकाणी महत्त्वाच काम होत–"

" तुम्हाला पण जायच आहे ? मी पण एव्हाना ड्यूटीवर हजर व्हायला हवा होतो— "

" आणि तुला रे बाळ ? "

" मला–मला पण काहीं नाहीं आठवत "

" मी सागू ? "

खेळात काहीं ओळखताना करावा तसा चेहरा करून सुधा म्हणाली,

" सागू काय मी ? "

यावेळी केशव तिच्याकडे रोखून बघत होता. पण त्याच्याकडे लक्ष नसलेल्या तिला कुणीतरी बोलायला परवानगी देताच ती म्हणाली,

" आप्पासाहेब मला म्हणायचे,

" पोरी, मला तुझीच काळजी आहे ग– तू मुलगा असती तर, मी कधींच मेलो असतो— "

" हा, हा–हा बरोब्बर आहे ! हेंच असल पाहिजे. का हो जोशीबुवा ? "

" अ हो . हो. का हो, गजाननराव ? "

यावर बाळ–सुधासह जवळ जवळ सर्वांनी गजूकडे पाहिल. त्यामुळ त्याचीसुद्धा चुळबूळ वाढली. तरीपण बोलण सुरू करण्यापूर्वी तो केशवकडे बघत होता. कारण मधल्या काळात, सवड सापडेल तेव्हा–कधी कधी ती काढून केशवन त्याच्यावरली जबाबदारी कमी झाल्याच बोलता बोलता सुचवल होत.

अगदी आज सकाळपर्यंत तो गजूला सुचवत आला होता. तोंवरच्या केशवच्या जबाबदारीचा अर्थ काय होता कुणास माहीत--पण गजून जो गृहीत धरीत आणला होता त्यानच त्याला आता बोलवेनास केल. सोबती त्याच्याकडे नुसते पाहून थाबेनात तेव्हा पुन्हा गजून केशवकडे पाहिल. सल्ल्याच्या अपेक्षेन. ते समजून असेल, वेळ मारून न्यावा म्हणून असेल किंवा याबाबत गजूला गप्प ठेवल तर आपल्यावर पातक लागू नये म्हणून असेल वा सहजहि असेल--गजूला केशव म्हणाला, " बोला, बोला लवकर ! "

तेव्हा, जवळ जवळ केशवच्या हिंमतीन गजू म्हणाला,

" हो. आजारी पडल्यापासून आप्पा मलाहि नेहमी म्हणत की, मी सुधा-बाळला साभाळाव बाळच शिक्षण कराव. सुधाच लग्न कराव- "

" तेच म्हणतो ! आत्ता लागली लिंक ! हेंच कारण असाव ! म्हाताऱ्याचा जीव यातच घुटमळला असावा ! का हो, पटत की नाहीं ? "

गजू केशवकडे बघत होता. त्याचा चेहरा उतरला होता. दुसरच कुणी तरी म्हणत होत,

" दुसर काय असणार आहे ! गजू, हो बाळ उभा. कर म्हाताऱ्याला कबूल ! आटोप लवकर, उशीर होतोय्— "

गजू उभा झाला. पूर्वीसारखा हात जोडले. पढवल्याप्रमाण बोलू लागला,

" मी बाळच शिक्षण करीन. "

तो थाबला. मग म्हणाला,

" बाळ कुठ आहे ? "

" हा काय तर— म्हण, पुढ- "

" आणि सुधा ? इकडे ये ग, सुधा ! "

" अरे, आणखी किती जवळ बोलावतोस ? म्हण ना, पुढ— "

" मी बाळला अंतर देणार नाहीं.

" त्याच्यावर रागावणार नाहीं.

" त्याला निभावून घेईन.

" त्याचा साभाळ करीन.

" सुधाला पण मी दूर करणार नाही. "

तो डोळे पुसण्यासाठी थाबला. पण बाळचे डोळे पुसू लागला. सुधाच्या

खाद्यावर हात ठेवले. म्हणाला, " का ग, उन्ह लागतात काय ? "

" अरे, असं मध्यें थाबू नये. म्हण, पुढ– मी– "

" वेळप्रसगीं मी उपाशी राहीन– पण याना उपास पडू देणार नाहीं. त्याना, माझ्या जिवात जीव असेपर्यंत कोणत्याच गोष्टीची ददात पडू देणार नाहीं ! "

डोळे पुसायला गजू थाबला.

कुणी तरी त्याला ढकलल,

" तुमची शपथ घेऊन सागतों, मी इथ बोलतो, ते सार प्रामाणिकपणान पाळीन. आता तरी मला क्षमा करा, आप्पासाहेब ! "

बोलता बोलता गजून बाळ–सुधाभोवतीं मिठी मारली. त्याच्या सोबतच तो कधीं रडायला लागला ते त्याच त्याला कळल नाहीं. सारी माणस त्याना समजावत होतीं. गजूला गप्प राहायला सागत होतीं.

यामुळ झालेल्या गलबलाटान असेल, बऱ्याच वेळापासून पिंडाशी माणसाचा थारा नसल्यान असेल किवा तिथला अगरबत्तीचा धूर नाहींसा झाल्यान असेल वा लोक समजतात त्या रूढ समजुतीमुळहि असेल चुकत–माकत उडत असलेला एक कावळा पिडाशीं टेकला न टेकला तसा चोंच खरकटी करून उडून जाऊ लागला. त्याला दाखवत एकजण सर्वांना म्हणाला,

" बघा, बघा हो ! आप्पासाहेब जेवताहेत ! आटोपा आता— "

सर्वांप्रमाण गजून झाडावर पाहिल तो मघाचा कावळा चोंच चाफलत होता.

तशी गजूची मिठी भावडाभोंवतीं अधिक घट्ट झाली. एकजीव झालेले तिघाचे आवाज स्मशानभर घुमू लागले. लोक त्याना ' आटोपा–आटोपा ' करीत होते. बाळ–सुधा उठूहि पहात होतीं. पण गजू त्याना सोडत नसावा.

# सात

आप्पाच्या गोड जेवणाच्या दुसऱ्या दिवशी गजून कोरी टोपी डोक्यावर ठेवली होती. तो कामावर रुजू झाला होता. क्रमाप्रमाण पाळ्या पाळू लागला होता. एखाद्या चार मुलाच्या बापाप्रमाण तो नोकरीचे सारे नियम काटेकोरपणे पाळू लागला होता. त्याच्या नव्या वागणुकीवर बाबासाहेब खूष झाले होते. तो कामावर रुजू होताच त्यानी त्याला दुखवट्याच पत्र लिहिल होत आप्पाच्या निधनामुळ त्याच्यावर कोसळलेल्या दुःखात ब्यूरो समाविष्ट असल्याच पत्रात लिहिल होत. मृतात्म्यास शाति देऊन पत्र पूर्ण करण्यात आल होत.

या काळात गजू केशवची भेट टाळत आला होता. प्रेसमध्ये जाताना तो मोरीच्या पड्यालल्या हद्दीतून जात होता. निघण्यापूर्वी केशवच दार बद असल्याची कधी बाळ–सुधाकडून तर कधी स्वतः खात्री करून घेत होता. येतानाहि हीच काळजी घेत होता अलीअलीकडे तो या सर्वांना सरावलाहि होता.

तसाच गजू आताहि आपल्या दारात घुसणार होता पण केशवच्या हाकेन त्याला मार्ग बदलावा लागला.

केशवच्या घरात बहुतेक सारीं हजर होती कदाचित् तीं गजूला पाहूनहि व्हराड्यात गोळा झाली असावींत.

गजू म्हणत होता,

" बोला, नानासाहेब ! "

" अहो, बसा तर जरा—"

" भूक लागलीय ! "

" पाचहि मिनिट धरवत नाहीं ? "

" बाळ-सुधा वाट बघत असतील ! "

पण केशवच्या उपकारान त्यान बसताना म्हटल,

" बोला, काय म्हणता ? "

" ह, परीक्षा काय म्हणतेय् ? "

" परीक्षा ?—"

सताप आवरत गजू म्हणाला,

" तुम्हाला माहीत नाही, अस थोडच आहे कशाला हिणवता आम्हा गरीबाना ! "

" हिणवतो ? मी ? आणि तुम्हाला ? तेहि असल्या बाबतींत ? काय बोलता-हात गजाभाऊ हे ? तुम्हीच सागा, तुमच्या शिक्षणाबद्दल मी आजच विचारपूस करतो आहे काय ?—"

" तस नाहीं म्हणा—"

" काय, तस नाहीं म्हणता गजाभाऊ ! "

" पण त्या वेळची गोष्ट वेगळी होती. आताची वेगळी आहे— '

" ऑ ? ती हो कशी ? "

" जाऊ द्या—"

" सागाल तर ? "

तोच म्हणाला,

" ही तुमची कल्पना आहे मी तर म्हणतो, पूर्वीपेक्षा आता तुम्हीं अधिक वेगळे आहात. मोकळे आहात ! पूर्वीं काळजीसोबत धाकहि तुमच्या माग होता. आता फक्त काळजी राहिली आहे. तीहि थोडीशी—

" मग, बोला आहे काय तयारी ! का हो अण्णा ?

" शिवाय ही आता शेवटली संधि बर काय, गजाभाऊ! आणखी एक सागू? सागतोच मी तुमच्यासाठी एक झकास नोकरी पाहून ठेवली आहे "
'कोणती?' अस गजू विचारील या समजान केशवन थाबून पाहिल. पण त्यालाच बोलाव लागल,
" काळेसाहेब आहेत ना? अहो, ते नाही काय? क्लबचे सेक्रेटरी होते? ते कॉलेज काढताहेत. काय नाव बुवा त्या कॉलेजच–हो, विद्या–विकास–महाविद्यालय तिथ तुम्हाला नोकरी निश्चित मिळेल!—"
" पण आता त्याचा उपयोग काय?"
बोलाव म्हणून गजू म्हणाला,
" दिवसभर नोकरी करून शेवटीं नाईट–क्लासमध्यें जाण आलच की नाहीं?
" मुळीच नाहीं. ते मॉर्निंग की काय म्हणतात तस कॉलेज आहे. अकराला दार–खिडक्या बद करून तुम्हीं शाळा गाठू शकता "
" अहो, मी तर म्हणतो, ही फार मोठी सधि आहे तुमच्यासाठी मॅट्रिक झाल्यावर त्याच कॉलेजात पुढ पुढल शिक्षण सुरू करता येईल. दिवसभर कुठं तरी नोकरी करता येईल. माझ्यासारख्याच्या कवडीचीहि गरज पडणार नाही.
" काय, कशी आहे, आयडिया?"
गजू खालीच बघत होता. या ठिकाणीं दुसर कुणी असत किंवा केशवचेहि त्याच्यावर काहीं उपकार शिल्लक नसते तर त्यान असा विषय निघताच त्याला उडवून लावल असत. पण आता तो स्तब्ध होता.
केशव विचारत होता,
" आल नाहीं अजून लक्षात?"
" तस नाही—"
" मग कस तर?"
" "
" बोला, बोला?"
" . . "
" अण्णाना आत जायला सागू?"
" नाहीं–नाहीं—"
" तर मग?"

“ . ”

“ बोला ना ! ”

“ मी लगेच ब्यूरोंत परमनट होणार आहे--”

“ म्हणजे, बीए किंवा एमे तर नाहीं ना ? ”

“ . ”

“ शेवटी प्रेस-कामगारच राहाल की नाहीं ? ”

“ ........ ”

“ आणि किती दिवस हो ? ”

आता गजूशी बोलण्याचा केशवचा हेतू आणि त्यामुळ आवाजहि बदलला,

“ अहो, पण बोलायलाहि काहीं जात ? ”

“ जवळ, जवळ नेहमीसाठीच. ”

“ इतकी तयारी आहे तुमची ? ”

“ अ हो. आता ती करावीच लागेल—”

“ पण मी म्हणतो, ती का ? ”

“ जाऊ दे रे नाना. त्याची नसेल इच्छा. मग आपण कशाला आग्रह करायचा ? ”

“ अशी कशी इच्छा नसेल हो ? ” तस असत तर ते तडकाफडकीं नाहीं म्हणून मोकळे झाले असते.

“ का हो, खर ना ? ”

“ अ, हो. पण आता नाहींच. ”

“ का नाही ते तर सागाल ? ”

“ त्याच अ ा आहे--”

गजू बोललाच,

“ मला आता बाळ-सुधाकडे लक्ष द्यायला हवे—”

“ का ? ”

“ तें नाहीं सागता येत हो, नानासाहेब. पुन्हा पुन्हा काय विचारता ? ”

“ मी सागतो—”

इथं मात्र तो सूर खाली आणत म्हणाला,

“ कावळ्यापुढ कबूल केल म्हणून—

“ बरोबर आहे ना ? ”

“ हो. समजा वाटल्यास तसं—”

“ काय, बोलताय् तरी काय गजाभाऊ ?

“ तेवढ्यासाठीं तुम्ही आपल्या जीवनाच मातेर करायला तयार झालात ?

“ माझ ऐका या थोताडात काहीं अर्थ नसतो. लोकानी गणपती म्हणून पूजेंत ठेवलेली सुपारी घरीं आणल्यावर अण्णा व ती आडकित्त्यान कचाकचा फोडतात. असे आजवर आम्ही शेकड्यानी गणपति खाल्लेत. झाल आहे आमच काहीं वाकड ? मागाल तेव्हा शे-दोनशें सापडतातच की नाही, आमच्या घरात ?

“ का हो, अण्णासाहेब ? ”

हे मान्य करण जोशीबुवाना बर वाटल नसाव. तें धरून ठेवलेलच आळवू लागले,

“ जाऊ दे रे ! नसेल त्याच्या दैवात शिक्षण, त्याला तो तरी काय करणार आणि तूं तरी काय करू शकतोस ?—”

“ वा ! अस कस दैवात नसेल ? दैव नेहमीं प्रयत्नाच गुलाम असत—

“ का हो, खर आहे ना ? ”

“ अ–हो ”

“ तर मग बोला लवकर ? ”

“ पण मुलाच कस होईल ? ”

“ त्याच ते पाहून घेतील—”

इथ गजू परत चिडला,

“ म्हणजे काय हो ? ”

“ म्हणजे—”

केशवच म्हणून बोलू धजला,

“ असेल त्याला शिकायच तर करील बाळ कुठं तरी नोकरी—”

“ अस्स. आणि सुधाच ? ”

“ सुधा–सुधा—”

आता मात्र तो केवळ बोलणं चालू ठेवण्यासाठीं बोलला,

“ तिचहि जमेल, कुठ ना कुठ—”

" पण कुठ ? बोला ना ? कुण्या साहेबाकडे मुल खेळवायला ठेवता काय तिला ? "

" मग, त्यात काय बिघडल ? "

" काहीच नाही ? "

बोलाव की न बोलावशा विचाराना न जुमानणारा गजूतला कामगार आता बोलून गेला,

" तर मग तुमच्या लीलाला का नाहीं ठेवत अस कुठ तरी ? "

" अस्सं ! "

काळा तांबडा होत केशव म्हणाला,

" तिच्या भावाला अजून भीक नाही लागली. "

" मग मी काय तुमच्याकडे भिक्षा मागायला येऊन बसलो, काय नाना-साहेब ! "

अन् सर्व प्रकारची तयारी करून गजू केशवकडे पाहूं लागला. पण संतापाला बळी न पडणारा तो व्यवहारी माणूस अगदीं सहज आवाजात म्हणू लागला,

" मग प्रश्नच खुटला म्हणायचा ! "

" अर्थात्च—"

यावर केशवन गजूवर डोळे काढल्याच वाटवून असेल, गजूला ओळखून असेल वा संधि आली म्हणून असेल–जोशीबुवा जवळ जवळ दोघानाहि उद्दे-शून म्हणाले,

" मीं म्हटल नव्हतं की, ह्याच्या पत्रिकेत शिक्षण नाहीं म्हणून मागच ? याला तो काय करणार बिचारा ! जाऊ दे. "

" बरोबर आहे तुमच भविष्य—"

बापाला थांबवल्यावर केशवन ज्यासाठीं गजूचा राग शात ठेवला होता ते तो आता म्हणाला,

" ते जाऊ द्या. तुमच्याकडले पैसे कधीं येणार ? "

" पैसे ? "

" ते नाहीं हो, आप्पाना लावलेले ? "

" असस—"

ज्याला गजू आतावर ' उपकार ' समजत आला होता ते शेवटीं ' पैसे '

ठरले हें गजूला आता कळल. तो म्हणाला,

" किती आहेत ? "

" असतील, दोन-अडीचशे—"

" इतके ? हिशोब आहे काय माडलेला ? "

" हिशोब हो-असेल."

" बघू—"

" आता कुठ ठेवला आहे ते मला नक्की आठवत नाहीं. उद्या काढतो शोधून. पण तुम्ही पैसे देणार कधीं, ते नाहीं सागितल ? "

" देतो, लवकरच . "

" तें झाल हो. पण कधीं ? "

" ओव्हर-टाईमच काम बघतो कुठ मिळालं तर. ."

" काम मिळाल्यावर तुम्हीं पैसे मिळवणार कधीं, आणि देणार कधी ? "

' शक्य तितक्या लवकर ! तुम्ही आधीं कल्पना दिली असती तर आतावर काहीं फिटतहि आले असते "

" पण मला पैसे लवकरात लवकर हवे आहेत "

" करतो व्यवस्था. वाटल्यास ब्यूरोकडून कर्ज काढीन, पण तुमचा पैसा ठेवणार नाहीं—"

" ठीक. जा—"

गजू तीच वाट बघत होता.

आपल्या घरात घुसताना लीला त्याच्या टोपीखालच्या टक्कलाची टिगल करून हसत असल्याच त्याला ऐकू येत होत.

# आठ

आज प्रथमतःच गजून बाळ अन् सुधाला जवळ बसवल होत. त्याच्या खाद्यावर हात ठेवून बोलत होता,

" सकाळी काय काय जेवले ?

" शिळ–पाक नेहमीं खाऊ नये

" तुम्हीं आपसात भाडला बिडलात तर नाहीं ना ?

" तेच म्हणतो !

" तुमच्याशीं कुणी भाडल काय !

" भाडतील तर मला सागा.

" लोक फार बदमाश असतात.

" भावाभावात वैर वाढवण्याचा प्रयत्न करतात. त्याच ऐकत जाऊ नका.

" तुम्ही लहान आहात. ते काय बोलतील ते तुम्हाला कळणार नाही ..

" म्हणून आपण आपलं जपून राहाव ..

" आपल जगात कुणीच नाहीं..."

अशाच अर्थाचं, कधी तुटक तर कधी विसगतसं गजू बोलत होता

बाळ सुधा त्याच्याकडे बघत होती. न समजून. पण त्याच्याच्यान गजूपासून उठवत नव्हतं. कदाचित् त्यानं त्याना खूप आवळून धरल्यानहि असेल.

• • •

## नवीं प्रकाशनें

| | | | |
|---|---|---|---|
| १ | भरतीची लाट | ना. सी. फडके | ५—०० |
| २ | शाकुंतल | ना. सी. फडके | ५—०० |
| ३ | निवडक गणूकाका | अनंत काणेकर | १—५० |
| ४ | आभाळाची सावली | दत्त रघुनाथ कवठेकर | १२—०० |
| ५ | नांदत घर | उद्धव ज. शेळके | ३—०० |
| ६ | आकड्याची मौज आणि फौज | कुलकर्णी | १—५० |
| ७ | तालपुष्कर | शान्ता ज. शेळके | १—५० |
| ८ | निळादिवा | शान्ता ज. शेळके | १—०० |
| ९ | सगे सोयरे | वि. वि. बोकील | २—५० |
| १० | येथे जिद्द संपते | उद्धव ज. शेळके | ८—०० |

## छापत आहे

| | | |
|---|---|---|
| १ | सुटका | शंकरराव खरात |
| २ | खुळ्याची चावडी | शंकर पाटील |
| ३ | सत्यकाकू | वि. वि. बोकील |
| ४ | कथाभारत | वि. वि. बोकील |
| ५ | लाडक्या लेकी (भाग पहिला) | संपा. पंडित अनंत कुलकर्णी |

कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २